# नवभारत

वर्ष ९ वें ] ऑक्टोबर १९५५ [ अंक १ ला



वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.




नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

---

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका






सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाचें मासिक

वर्ष नववें | अंक पहिला

# नवभारत

ऑक्टोबर १९५५

संचालक : **श्री. शंकरराव देव**

संपादक-मंडळ

आचार्य शं. द. जावडेकर–आचार्य स. ज. भागवत–श्री. हरि कृष्ण मोहनी–प्रा. गोवर्धन पारीख

प्रा. वि. म. बेडेकर का. संपादक



**वार्षिक रु. ९** | **सहामाही रु. ५** | **अंकास रु. १**

हें मासिक श्री. म. शं. साठे यांनीं दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथें छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनीं सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक, ९०६ शिवाजी नगर, पुणें ४

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, ' नवभारत ' मासिक, C/o प्राज्ञ प्रेस वा[illegible] )





# 'नवभारत' मासिक, ऑक्टोबर १९५५

## —लेखक-परिचय—

**श्री. वा. रं. सुंठणकर** बी. एजी. ( वेळगांव ) — 'महाराष्ट्र-संत-मंडळाचें ऐतिहासिक कार्य' या पुस्तकाचे लेखक.

**श्री. ना. य. डोळे** एम्. ए. — पुणें विद्यापीठांतील राज्यशास्त्रविभागामध्यें रिसर्च फेलो.

**श्री. मो. द. ब्रह्मे** एम्. ए. एल्एल्. बी. ( अमळनेर ) — 'आश्रित', 'आघात' या नाटकांचे लेखक. 'रांगणेकर आणि त्यांचीं नाटकें' यावरील त्यांचें पुस्तक प्रकाशनाच्या मार्गावर आहे.

**श्री. रा. द. अरगडे** — कोल्हापूर येथील राजाराम कॉलेजमध्यें विद्यार्थी.

**आचार्य शं. द. जावडेकर** (इस्लामपूर) -- सुप्रसिद्ध राज्यनीतिशास्त्रज्ञ आणि ग्रंथकार. महाराष्ट्र साहित्य संमलेनाचे माजी अध्यक्ष. 'नवभारत' मासिकाचे एक संपादक.

**डॉ. ना. ग. जोशी** एम्. ए. पीएच्. डी. ( बडोदें ) -- 'जीवनयोग', 'विश्वमानव' इत्यादि काव्यांचे लेखक. 'मराठी छंदोरचना (लयदृष्ट्या पुनर्विचार)' हा त्यांचा मुंबई विद्यापीठाची पीएच्. डी. मिळालेला प्रबंध नुकताच प्रकाशित झाला आहे.

**श्री. ग. न. पंडित** ( ग्वाल्हेर ) — न्यायखात्यांतील सेवानिवृत्त अधिकारी. ग्वाल्हेर येथील शारदोपासक-मंडळाचे अध्यक्ष. यांच्या निवडक कवितांचा 'पायल' या नांवाचा संग्रह प्रकाशनाच्या मार्गावर आहे.

**डॉ. शं. गो. तुळपुळे** एम्. ए. पीएच्. डी. -- पुणें विद्यापीठांत मराठी विभागाचे प्रमुख. 'पांच सन्त कवी', 'महाराष्ट्र–सारस्वत ( पुरवणी )' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

**प्रा. दे. द. वाडेकर** ( पुणें ) -- फर्ग्युसन कॉलेज व पुणें विद्यापीठ येथें तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक. 'आधुनिक मानसशास्त्र: इतिहास व संप्रदाय' या पुस्तकाचे लेखक.

**त. ती. लक्ष्मणशास्त्री जोशी** ( वाई ) -- 'धर्मकोशा'चे मुख्य संपादक. 'हिंदुधर्मसमीक्षा', 'जडवाद', 'वैदिक संस्कृतीचा विकास' इत्यादि पुस्तकांचे लेखक. महाराष्ट्र-साहित्य-संमलेनाचे अध्यक्ष.

**प्रा. य. र. आगाशे** ( पुणें ) — मराठीचे प्राध्यापक, हल्लीं सेवानिवृत्त. 'सारस्वतसमीक्षा' या पुस्तकाचे लेखक.

**श्री. सी. श्री. उपाध्ये** ( वालावल, जि. रत्नागिरि ) — चित्रकलाध्यापक.

**प्रा. गोवर्धन पारीख** -- मुंबई येथील रामनारायण रुईया कॉलेजमध्यें अर्थशास्त्राचे प्राध्यापक. 'महात्मा गांधी', 'नवमानवतावाद' या पुस्तकांचे लेखक. 'नवभारत' मासिकाचे एक संपादक.

---

चुकीची दुरुस्ती—

'नवभारत'च्या गेल्या सेप्टेंबर अंकांतील प्रा. श्रीनिवास दीक्षित यांच्या 'बुद्धिप्रामाण्याची सदोषता' या लेखांत पान १८ वर तिसऱ्या परिच्छेदांतील "पण बुद्धिप्रामाण्यवाद ही जीवननिष्ठा होऊं शकते असें मानणाऱ्याकडे मात्र वरील प्रश्नाचें उत्तर आहे" हें वाक्य "पण बुद्धिप्रामाण्यवाद ही जीवननिष्ठा होऊं शकत नाहीं असें मानणाऱ्याकडे मात्र वरील प्रश्नाचें उत्तर आहे" असें वाचावें. -- का.



अनुक्रमणिका

श्री. वा. रं. सुंठणकर

# संत-चळवळीचें मूल्यमापन

संतवाङ्मय हा चर्चेचा जुना विषय आहे. पण त्यांतील नवेपणा अद्याप संपला नाहीं. गेल्या पाऊणशें – शंभर वर्षांत मराठी संतांच्या वाङ्मयाचें संशोधन आणि संकलन बरेंच झालें आहे. केवळ भाविकतेच्या दृष्टीनें या वाङ्मयाकडे पहाण्याचा काळ मागें पडत चालला आहे, असें म्हणावयास हरकत नाहीं. आतांपर्यंत झालेल्या संकलनाच्या आधारानें संतवाङ्मय, संत-संप्रदाय आणि संतांची चळवळ यांचा अर्थ ( Interpretation ), समीक्षा व मूल्यमापन करण्याचा काळ सुरूं झाला आहे. संतवाङ्मयाचा सामाजिक आणि ऐतिहासिक दृष्टीनें विचार करणें अवश्य आहे हें अभ्यासकांना पटूं लागलें आहे.

महाराष्ट्राच्या इतिहासांत संतवाङ्मय आणि संत-संप्रदाय यांना विशिष्ट स्थान आहे. महाराष्ट्रांतील संत-कार्याचें महत्त्व प्रथम **न्यायमूर्ति रानडे** यांनीं जाणलें. त्यांच्या जवळ व्यवस्थित असा दृष्टिकोन होता. त्यामुळें शिवाजीनें केलेली मराठी राज्याची स्थापना आणि संतांनीं केलेलें कार्य यांची इतिहासाच्या दृष्टीनें त्यांनीं संगति लावून दाखविली. शिवकार्यपार्श्वभूमि संतकार्यांत शोधली पाहिजे हें त्यांनीं दाखवून दिलें. संत-चळवळीच्या समीक्षेचा पाया महाराष्ट्रांत न्यायमूर्ति रानडे यांनीं घातला. पण पुढच्या काळांत हा पाया ढासळून टाकण्याचे प्रयत्न झाले. संतांच्या कार्याला इतिहासाचे निकष लावण्याऐवजीं भलत्या निकषावर तें घासून पहाण्यांत येऊं लागलें. वर्तमानकालाच्या प्रासंगिक चष्म्यांतून संतांच्या इतिहासाकडे पहाण्याची प्रथा सुरूं झाली. **इतिहासाचार्य राजवाडे** हे या प्रथेचे मोठे पुरस्कर्ते होते. १९ व्या शतकांत आपल्या देशांत बद्धमूल होऊं लागलेल्या राष्ट्रवादी दृष्टिकोनांतून संत-वाङ्मयाचें परिशीलन होऊं लागलें. त्यामुळें ऐतिहासिक दृष्टिकोन ढळला आणि संतांवर चुकीचे आरोप लादण्यांत येऊं लागले. टाळकुट्या संतांनीं देशाचा घात केला, देश बुडविला, समाजाला त्यांनीं दुबळें केलें आणि त्यामुळें तो परकी आक्रमणाला बळी पडला, अशी मीमांसा राष्ट्रवादी हिरीरीनें सुरूं झाली. सामान्यतः भाविक जन वगळले तर संतकार्यासंबंधींचें हें विधान मान्य करण्यांत येऊं लागलें. त्यांतहि संतासंतांत भेद पाडण्यांत आले. रामदास हा इतरांहून निराळा आणि श्रेष्ठ असें मानण्यांत येऊं लागलें. इतिहासाची आणि कालक्रमाची ओढाताण करून रामदास हा शिवकार्याचा प्रेरक आणि स्फूर्तिदाता होता, अशी संगति लावण्याचा अट्टहास सुरूं झाला. राष्ट्रवादी पंथीयांचें हें प्रतिपादन अमान्य करून नव्या आणि ऐतिहासिक दृष्टिकोनांतून संत-कार्याची समीक्षा गेल्या कांहीं वर्षांत सुरूं झाली आहे. अभ्यासकांना आणि चिकित्सकांना न्या. रानडे यांनीं समीक्षेचा जो पाया घातला त्यावर उभें राहूनच पुन्हा सुरवात करावी लागत आहे. महाराष्ट्रांत संतसमीक्षेच्या नव्या काल-खंडाला आतां सुरवात झाली आहे. जितक्या विविध प्रकारें अशी समीक्षा होत जाईल तितकें तें हितावहच ठरणार आहे.

### भागवत-धर्माचा उगम व विकास

संतांनीं ज्या धर्माचा पुरस्कार केला तो भागवत-धर्म किंवा वैष्णव धर्म होय. या भागवत-धर्माला भारताच्या इतिहासांत विशिष्ट स्थान आणि महत्त्व आहे. भागवत-धर्माची परंपरा ही फार मोठी आणि दीर्घकाल चालत आलेली आहे. त्याचा उगम शोधतां शोधतां ३००० वर्षांपेक्षांहि मागें जावें लागतें. लो. टिळकांच्या मताप्रमाणें इ. सनापूर्वी १४०० वर्षें इतकें मागें जातां येईल. त्यापूर्वींहि दीर्घकालपर्यंत या धर्माची परंपरा चालूं असणें संभवनीय आहे. कांहीं विद्वानांच्या मतें आर्यपूर्व आणि अ-वैदिक समाजांत भक्तिमार्गी परंपरा चालूं होत्या, त्याच आर्यांनीं उचलून त्यांना पुढें विस्तृत स्वरूप दिलें. आज उपलब्ध असलेल्या साधनांवरून पहातां भगवद्गीता हा या धर्माचा आद्य ग्रंथ होय. सामान्यतः उपनिषत्-काळानंतर








भागवतधर्म विशेषें करून प्रसृत झाला असावा. याच काळांत गीतेची रचना झाली असावी. वेदांतील निसर्ग-धर्म विचारवंतांचें समाधान करूं शकेना. त्या अ-समाधानांतून उपनिषदांतील चिकित्सा सुरूं झाली. उप-निषत्-कालीन ऋषि-मुनींनीं चिंतन आणि मनन यांच्या जोरावर सृष्टीचें कोडें उलगडण्याचा प्रयत्न केला. 'तत्त्वमसि' ( ' तें तूं आहेस ' ) या तत्त्वाप्रत पोंचून माणसांत ईश्वर पहाण्यापर्यंत मजल पोहोंचली. माणसा-ला ईश्वरपदाला नेऊन पोंचविण्याचें कार्य उपनिषदांनीं केलें. उपनिषदांचा ज्ञान-मार्ग हा जाणत्यांचा आणि विचारवंतांचा होता. सामान्य माणसाला हा झेपण्या-सारखा नव्हता. सामान्य माणसांच्या दृष्टीनें उपनिषदां-तील ज्ञानमार्गाची प्रतिक्रिया भक्तिमार्गांत झाली. भक्तिमार्ग हा सामान्य जनांना सुलभ आणि झेपण्या-सारखा होता. म्हणून भक्तिमार्ग हा सामान्य जनांचा मार्ग म्हणून पुढें आला.

सामान्य माणसाचा धर्म म्हणून श्रीकृष्णांनीं गीता सांगितली. जुन्या धर्मांत उपेक्षिल्या गेलेल्या स्त्री, वैश्य, शूद्र यांना, थोडक्यांत म्हणजे समाजांतील खालचे गणले गेलेले सारे थर आणि वर्ग यांना सामावून घेण्याकरितां गीता-धर्म पुढें आला. हा धर्म भक्तीचा धर्म होता. तेव्हांपासून पुढच्या काळांत सामान्य लोकांचा धर्म असेंच स्वरूप त्याला प्राप्त झालें. त्या बरोबरच धर्म-सुधारणेचेंहि कार्य तो धर्म करीत होता. भागवत-धर्माच्या साऱ्या इतिहासाचें अवलोकन केलें तर असें दिसून येतें कीं, जुन्या वैदिक धर्मावरची लोकांची श्रद्धा ज्या ज्या वेळीं ढळूं लागते, त्या त्या वेळीं जुन्या चौकटींत सुधारणा करून समाजांतील सर्व वर्गाला सामावून घेण्याकरितां सुलभ असा धर्म सामान्य जनांना प्राप्त करून देणें हें या धर्माचें कार्य आहे. हिंदुधर्माच्या इतिहासांत असा प्रसंग प्रथम उपनिषदुत्तर काळांत आला होता, असें दिसतें. जुना वैदिक समाज आणि संस्कृति ही मोडकळीला आली होती; उद्ध्वस्थ होण्याच्या मार्गावर होती. तिच्या विरुद्ध खालच्या वर्गांत असंतोष पसरला होता. धर्मानें उपेक्षिलेल्या वर्गांना नव्या धर्माचें आश्रयस्थान हवें होतें. अशा वेळीं जुन्या वैदिक धर्माला सांवरून धरून सर्व समाजाला एकत्र गोवण्याकरितां भागवत-धर्माची स्थापना झाली. या आंदोलनाचा पुरस्कर्ता श्रीकृष्ण हा होता. कांहीं काळपर्यंत हा धर्म वैदिक समाजाची धारणा करूं शकला. पण पुढें वैदिक धर्मा-विरुद्ध फार मोठीं बंडें उभीं राहिलीं. या बंडाचें नेतृत्व करणारे बौद्ध आणि जैन धर्म उदयाला आले. भारताचा बराच मोठा भाग त्यांनीं व्यापून टाकला. वैदिक धर्माची पीछेहाट होत होती. त्या धर्माला अव-कळा प्राप्त झाली होती. त्या वेळीं जुन्या वैदिक धर्मा-ची खिळखिळी झालेली चौकट नव्यानें पुन्हां बांधून ती पुनरुज्जीवित करण्याकरितां भागवत-धर्माचें पुनरु-त्थान झालें. जुना वैदिक धर्म जशाचा तसा आणणें शक्य नव्हतें. नव्या स्वरूपांत आणि नव्या संघटनेच्या द्वारें तो पुढें येणें अवश्य होतें. हें कार्य इ. सनापूर्वी चौथ्या शतकाच्या सुमारास झालें असें दिसतें. डॉ. भांडारकर सांगतात त्याप्रमाणें गंगानदीच्या पूर्वेकडे वैदिक धर्माला विरोधी असे पाखंडी धर्म प्रसृत झाले होतें. आणि पश्चिमेकडे आणि भारताच्या वायव्य प्रदेशांत भागवत-धर्माचें प्राबल्य होतें. भागवत-धर्मा-ची पुनर्घटना होत होती. भक्ति-मार्गाचे अनेक संप्र-दाय एकत्र होत होते. सात्वत, नारायणीय, पांचरात्र, वैष्णव, भागवत या भिन्न भिन्न संप्रदायांचें संमीलन होत होतें. या सर्व संप्रदायांच्या एकत्रीकरणांतून पुढ-च्या काळांतील भागवत किंवा वैष्णव-धर्म तयार झाला. या धर्मानें स्वतःच्या पुराणकथा ( Mytho-logy ) तयार केल्या. जुन्या महाभारताचें पुनः-संस्करण होऊन नवें महाभारत तयार झालें आणि भागवतधर्माला पायाभूत होणाऱ्या कथा निर्माण झाल्या. अशा प्रकारें भागवत-धर्मानें वैदिक धर्माला सांवरून धरलें आणि संकटांतून त्याला बाहेर आणलें. गीतेंत सांगितलेल्या ' यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत । ' या श्लोकांत श्रीकृष्णाच्या ' मी ' ऐवजीं भागवत-धर्म असे शब्द घातले तर भागवत-धर्माच्या इतिहासाला हा श्लोक यथार्थतेनें लागूं पडतो. डॉ. भांडारकरांनीं श्रीकृष्णाबद्दल असें म्हटलें आहे कीं " He came to fulfil the law and not to supersede it. " हे त्यांचे उद्गार भागवत-धर्मालाहि बरोबर लागूं पड-तात.

यानंतर या भागवत-धर्माच्या पुनरुज्जीवनाचा काळ १० व्या शतकाच्या सुमारास पुन्हा [illegible]







दिसतो. नव्या परिस्थितीला अनुसरून वैष्णव-धर्माचें पुनरुत्थान दक्षिणेंत रामानुजादि आचार्यांनीं केलें. रामानुजाचार्यांच्या वेळेला धार्मिक क्षेत्रांत फार मोठी खळबळ माजून राहिलेली दिसते. शंकराचार्यांनीं पाखंडी धर्मांना नामशेष करण्याच्या उद्देशानें सर्वंकष स्वरूपाचें तत्त्वज्ञान मांडण्याचा प्रयत्न केला होता. 'ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या, जीवो ब्रह्मैव नापरः।' हा सिद्धान्त त्यांनीं मांडला. पण पुढच्या काळांतील विचारवंतांना हा सिद्धान्त सर्वस्वीं मान्य करतां येईना. जग मिथ्या मानायला ते तयार नव्हते. शंकराचार्यांच्या तत्त्वज्ञानाविरुद्ध एक मोठी प्रतिक्रिया तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रांत सुरू झाली. रामानुजाचार्य हे त्याचे प्रारंभीचे अध्वर्यु होते. त्यानंतर अनेक आचार्य पुढें आले आणि त्यांनीं आपल्या वेगळया स्वतंत्र अशा पद्धती मांडल्या. रामानुजांनीं विशिष्टाद्वैत मांडलें. शंकराचार्यांचा माया-मिथ्यावाद आणि अद्वैत-सिद्धान्त हीं त्यांना मान्य नव्हतीं. जीव, जगत् व ईश्वर ही तीन तत्त्वें भिन्न असलीं तरी जीव व जगत् ही दोन्हीं एका ईश्वराचेंच शरीर असल्यामुळें चिदचिद्विशिष्ट ईश्वर एकच होय असें त्यांनीं सांगितलें. भागवतधर्मांत हें विशिष्टाद्वैत मत शिरण्यास रामानुजांचें तत्त्वज्ञान कारणीभूत आहे असें लो. टिळकांनीं म्हटलें आहे. रामानुजानंतर निंबार्कांचा द्वैताद्वैती संप्रदाय पुढें आला. जीव व जगत् हीं स्वतंत्र नसून तीं ईश्वरेच्छेवर अवलंबून असतात व मूळ परमेश्वरांतच तीं अंतर्भूत आहेत, असें निंबार्कांचें मत आहे. मध्वाचार्यांना हीं दोन्हीं मतें मान्य नव्हतीं. त्यांनीं आपलें द्वैत-मत मांडलें. परब्रह्म व जीव हे सदैव भिन्नच असतात, त्यांचें ऐक्य होणें शक्य नाहीं, असें मध्वाचार्यांनीं सांगितलें. शंकराचार्यानंतर विचारांची जी एक प्रक्रिया सुरू झाली होती, त्याचेच हे विविध टप्पे होते. महाराष्ट्रांत १३ व्या शतकांत होऊन गेलेले ज्ञानेश्वर यांनीं मांडलेलें तत्त्वज्ञान हें सुद्धां या प्रक्रियेचाच एक भाग होता. ही प्रक्रिया शंकराचार्यांनंतर चालू झाली, ती ज्ञानेश्वरानंतरहि पुढें चालली होती. अनेक विचारवंतांच्या विविध विचारसरणी जन्माला येत होत्या.

### ऐतिहासिक गरज भागविणारा धर्म

महाराष्ट्रांत ज्ञानेश्वर, नामदेव आदि संतांनीं भागवत धर्माचा फार मोठ्या प्रमाणावर पुरस्कार केला. पण त्यांच्याहि पूर्वीं एकादें-दुसरें शतक पुंडलीक होऊन गेला. तो मराठी भागवतधर्माचा आद्य संस्थापक म्हणून गणला गेला पाहिजे. मराठी भागवत-धर्माला तत्त्वज्ञानाची बैठक ज्ञानेश्वरांनीं निर्माण करून ठेवली. त्या बैठकीवर महाराष्ट्राचा भागवत–धर्म उभा राहिला. ज्ञानेश्वरांपूर्वी वर सांगितलेली विचारांची जी एक प्रक्रिया सुरू झाली होती तिचेच धागे घेऊन आणि 'भाष्यकारांतें वाट पुसत' ज्ञानेश्वरांनीं आपली सरणी रचण्याचें कार्य केलें.

हें येथें कांहींशा विस्तारानें सांगण्याचें कारण म्हणजे ज्ञानेश्वरांचें तत्त्वज्ञान इस्लामी आक्रमणाच्या प्रतिक्रियेंतून निर्माण झालें, इस्लाम-धर्माच्या शिकवणुकीचा परिणाम ज्ञानेश्वरावर झाला होता असें मत प्रा. न. र. फाटक यांनीं मांडलें आहे, तें मत मान्य करतां येत नाहीं. ज्ञानेश्वरांच्या आधींच दोनतीन शतकें विचारांची प्रक्रिया चालू होती. तत्त्वज्ञ विचारसंशोधनांत मग्न होते. जुना धर्म मोडकळीस आला होता. तो समाजाची धारणा करूं शकत नव्हता. सर्व समाजाला एकत्र बांधायला तो असमर्थ ठरला होता. समाजाची छकलें पडलीं होतीं. वर्णभेद, जातिभेद, उच्चनीच भेद खूप माजले होते. अशा विस्कळित समाजाला एकत्र कसें गोवावें हा विचारवंतांपुढें प्रश्न होता. अनेक विचारवंत पुढें येत होते. आणि आपापल्या परीनें नवे मार्ग सांगत होते. या सगळया मार्गांत भक्तिमार्ग हा प्रमुख होता. इतकेंच नव्हे तर सर्वांना तो सामान्य होता असेंहि म्हणावयास हरकत नाहीं. संन्यास-मार्ग हा मार्ग पडत होता. सर्वसामान्य माणसापुढें ध्येय म्हणून त्याचा उपदेश करायला कोणी तयार नव्हते. सामान्य जनांना अव्यवहार्य अशा संन्यास-मार्गाला पर्याय म्हणून भक्तिमार्ग पुढें आला. भक्तिमार्गाच्या पुनरुज्जीवनाची ही जी क्रिया चालू होती, ती थेट ज्ञानेश्वरांपर्यंत चालत आली होती. त्याच क्रियेला हातभार लावून ज्ञानेश्वरांनीं महाराष्ट्रांत तिला जोरानें चालना दिली. या कामीं नामदेवादि संत मंडळींचें त्यांना अतोनात साहाय्य झालें. भारताच्या इतिहासांत चालत आलेली ही प्रक्रिया अवलोकन केली म्हणजे प्रा. फाटकांचें मत ग्राह्य करणें कठीण वाटतें.

मध्ययुगांत रामानुजांनीं वैष्णव धर्माचें पुनरुज्जीवन







केलें. तत्पूर्वी दक्षिणेंत अळवारांची एक फार मोठी जुनी परंपरा चालत आली होती. ही परंपरा नितांत भक्तीची होती. या परंपरेचा वारसा रामानुजांकडे आला. आणि त्यांनीं तो वैष्णव धर्म म्हणून पुढें चालविला. या काळीं भागवत-धर्माची जी पुनर्घटना चालली होती, तिला आधारभूत म्हणून भागवत-पुराणाची रचना झाली. कृष्णभक्तीचा गौरव वाढविण्या-करितांच हें पुराण रचलें गेलें. या पुराणानें भक्तांचे अनेक आदर्श लोकासमोर ठेवले. कृष्ण हा ईश्वराचा अवतार ही कल्पना गृहीत धरून तें रचलें गेलें. भक्तिमार्गाकडे लोकांना आकर्षित करून घेण्याकरितां कृष्णाच्या लीलांचें रसभरित वर्णन त्यांत करण्यांत आलें आहे. भागवतपुराण हें भक्तिमार्गाचें कोठार म्हणून गणलें जातें. या पुराणानें मध्ययुगांतील भक्तिमार्गाला एक आधार ( sanction ) निर्माण केला. त्याच्या आधारावर विविध भक्तिपंथांचा प्रसार होत होता. दक्षिणेंत रामानुज आणि मध्व यांचे संप्रदाय वाढले. पण हे मुख्यतः ब्राह्मणवर्गापुरते मर्यादित होते. कर्नाटकांत मध्वापासून स्फूर्ति घेऊन पुढें दासांचा मोठा संप्रदाय वाढला हें खरें असलें, तरी त्यांचा पंथ ब्राह्मण-वर्गापुरताच मर्यादित होता. महाराष्ट्रांतला संतांचा संप्रदाय हा व्यापक होता. सर्व समाजाला तो व्यापून राहूं इच्छीत होता.

याच काळांत भारतीय समाजांत एक फार मोठें स्थित्यंतर चालूं झालें होतें. भारताच्या क्षितिजावर नव्या शक्ती उदयाला येत होत्या. भारताच्या निर-निराळ्या भागांत जनतेच्या बोली बोलणारे जे प्राकृत जन होते, त्यांचें उत्थापन होत होतें. सामान्य जनांची नवी शक्ति उदयाला येत होती. त्यांच्या बोली विकास पावत होत्या. स्वतःचें वाङ्मय निर्माण करण्याइतक्या त्या प्रगल्भ आणि समर्थ झाल्या होत्या. प्रादेशिक जन, त्यांच्या भाषा, त्यांची संस्कृति आणि या सवांना व्यापणारे त्यांचे प्रदेश यांचें उत्थान होण्याची क्रिया समाजाच्या पोटांत चालूं झाली होती. जुना धर्म या साऱ्या नव्या शक्तींना सामावून घ्यायला, आत्मसात् करण्याला असमर्थ होता. साऱ्या भारतीय समाजाची धारणा करण्याच्या कामीं तो निरुपयोगी ठरला होता. विस्कळित आणि विरघळण्याच्या अवस्थेंत तो होता. उत्तरेकडे इस्लामचें जोरदार आक्रमण होतांच तो कोसळून पडला. अशा परिस्थितींत समाजाची धारणा करायला नवा धर्म निर्माण होणें अवश्य होतें. तो काळच असा होता कीं कोणतेंहि मोठें आंदोलन किंवा क्रिया धर्म-मतांतूनच होणें अपरिहार्य होतें. भारताला अशा नव्या धर्ममताची त्या वेळीं ऐतिहासिक गरज वाटत होती. महाराष्ट्रापुरती ही गरज भागविण्याचा प्रयत्न संतांनीं केला. महाराष्ट्रांतील संतकार्यांचे पडसाद पुढें भारताच्या इतरहि भागात उठूं लागले.

## जनतेला पटणारा मार्ग

संतांच्या काळीं महाराष्ट्रीय समाजांत धर्मांचे दोन भाग पडले होते : एक उच्चवर्णीयांचा आणि दुसरा नीच-वर्णीयांचा. हे दोन्ही धर्म भिन्न असून त्यांचा परस्पराशीं संबंध नव्हता. उच्चवर्णीयांचा धर्म हा कर्मठपणाचा होता. होमहवनें, विधी, व्रतें-वैकल्यें यांत तो बुडून गेला होता. पैठण हें या धर्माचें मुख्य पीठ होतें. देवगिरीच्या यादवांच्या दरबारीं मुत्सद्दी म्हणून गाजलेल्या हेमाडपंत या पंडितानें ' चतुर्वर्ग-चिंतामणि ' या नांवाचा जो ग्रंथ लिहिला आहे त्यांत वर्षाच्या ३६५ दिवसाकरितां २००० व्रतें सांगण्यांत आलीं आहेत. यावरून ब्राह्मण-वर्गातील त्या काळच्या रूढ धर्माचा कर्मठपणा चांगलाच दिसून येईल. याच्या उलट, खालच्या कनिष्ठ वर्गांचा धर्म प्राथमिक अवस्थे-चा होता. शेंकडों दैवतें, जारण-मारण-तारण, जादूटोणा, भूतपिशाच्च इत्यादींसंबंधींच्या अनाचारानें तो भरलेला होता. प्राथमिक अवस्थेंतून तो अद्याप बाहेर पडला नव्हता. ईश्वराच्या आणि धर्माच्या प्रगल्भ कल्पनांचा मागमूसहि त्यांत सांपडला नसता. शेंकडों वर्षांच्या रूढी आणि परंपरा यांना तो चिकटून होता. उच्च-वर्णी-यांचे सारे धर्मग्रंथ, त्यांच्या विद्या आणि ज्ञान हीं सर्व संस्कृत भाषेंत होती. ज्ञानाची, संस्कृतीची सर्व मक्ते-दारी पुरोहित आणि पंडित वर्गाजवळ होती. कनिष्ठ वर्ग या सर्वांपासून अलिप्त आणि दूर होते. साऱ्या समाजाला एकत्र गोंवण्याकरितां एकाद्या समान धर्मा-ची आवश्यकता होती. त्याकरितां धर्माचीं द्वारें सामान्य जनाला खुलीं होणें अवश्य होतें. धर्माचा असा एक नवा मार्ग सर्वांना मोकळा व्हायला पाहिजे होता, कीं जो उच्च आणि नीच, श्रेष्ठ आणि कनिष्ठ या दोघांच्याहि धर्मप्रवृत्तीची भूक भागवूं शकला असता. मराठी संतांनीं हेंच कार्य केलं. [illegible] सर्व








जनांना समजेल आणि आचरतां येईल अशा सुलभ धर्माचा मार्ग सांगितला. हा मार्ग भक्तीचा होता. भक्तिमार्गाचा आद्य ग्रंथ जो गीता तोच त्यांनीं आधाराला घेतला. गीतेंत भक्तीला प्राधान्य आहे. पण कममार्गाचा त्याग करायला गीता सांगत नाहीं. ज्ञानाचें महत्त्व गीतेला मान्य आहे. मराठी संतांनीं गीतेंतील भक्तिमार्गावरच सारा भर दिला. कर्ममार्गाला मात्र त्यांनीं थारा दिला नाहीं. ज्ञानयुक्त भक्ति असेल तर उत्तमच. ती ज्ञानयुक्त नसली तरी चालण्यासारखी आहे, पण भक्ति हीच प्रधान आहे. त्यावरच संतांचा मुख्य भर होता. या भक्तिमार्गाचें वैशिष्ट्य म्हणजे पुरोहित-वर्गाला त्यांत स्थान नव्हतें. ल्यूथरनें पोपशाहीविरुद्ध बंडाचा मोठा उठाव केला त्या-प्रमाणें संतांनीं केलें नाहीं. पण पंढरपूर येथें स्वतःचें स्वतंत्र असें केंद्र निर्माण करून संतांनीं नव्या संप्रदायाची स्थापना केली. या त्यांच्या संप्रदायानें पुरोहित–शाही आणि तिचें पैठणचें केंद्र यांना शह दिला. संतांच्या पंढरपूरच्या केंद्राभोंवतीं सर्व जातींचे, पंथांचे आणि दैवतांचे उपासक गोळा झाले. एकाच उद्दिष्टानें ते सर्व एकत्र येत होते. एकाच स्फूर्तीनें ते वावरत होते. महाराष्ट्रांत उदयाला येत चाललेल्या नव्या शक्ती आकार घेऊं लागल्या होत्या. संतांचा संप्रदाय हा या शक्तींना धर्माच्या स्वरूपानें मूर्त स्वरूप देण्याचा प्रयत्न करीत होता. संतसंप्रदायामुळें या नव्या शक्तींना संघटित स्वरूप प्राप्त होऊं लागलें होतें.

त्या काळच्या एकंदर सामाजिक परिस्थितींत भक्तिमार्ग हाच जनतेला पटणारा मार्ग होता. संतांचें वाङ्मय बारकाईनें वाचलें म्हणजे तत्कालीन समाजाची दैन्यावस्था प्रत्ययाला आल्याशिवाय रहात नाहीं. हीन जातीमुळें येणारें न्यूनत्व आणि जीवनांत निर्माण झालेली अगतिकता यांचे पडसाद बहुतेक साऱ्या संतांच्या वाङ्मयांत उमटलेले आहेत. संसाराच्या वैतागांतून देवाकडे आणि भक्ति-मार्गाकडे संतांनीं धाव घेतलेली दिसून येते. जीवनाच्या आणि समाजाच्या अवनत अवस्थेंत भक्तिमार्ग हेंच संतांचें अखेरचें आश्रयस्थान झालें होतें. व्यक्ति-जीवनांत, त्याचप्रमाणें समाजजीवनांत जी कोंडी निर्माण झाली होती तींतून बाहेर पडण्याकरितां संतांनीं ईश्वराचा धांवा सुरू केला. स्वतः तरण्याकरितां आणि दुसऱ्याला तारण्याकरितां भक्तीच्या नावेंतून संत भवसागर पार करूं इच्छीत होते. या त्यांच्या प्रयत्नांतून कांहीं सामाजिक शक्ती मोकळ्या सुटल्या. आणि त्या शक्ती पुढच्या इतिहासांत उपकारक ठरल्या. तात्त्विक दृष्टीनें विचार केला, तर भक्तिमार्ग हा कांहीं एकच पर्याय नव्हता. तसें पाहिलें तर भक्ति ही भावना बुद्धीला आणि तर्काला सोडून आहे. भक्ति-मार्गांत ईश्वरापुढें संपूर्ण शरणागति असते. विवेक किंवा बुद्धिवाद यांना त्यांत स्थान नसतें. अगतिक झालेला मानव इतर सारे मार्ग टाकून ईश्वर या कल्पनेशीं एकात्म होऊं इच्छितो. प्रत्यक्ष जीवन विसरण्याकरितां भक्ति हा एक प्रकारचा विरंगुळा असतो. ईश्वर, जीव व जगत् या प्रश्नांच्या चिकित्सेला त्यांत वाव नसतो. भक्त हा भक्तीच्या गुंगींत सतत रममाण होऊं इच्छितो. संतांच्या वाङ्मयांत याचे हवे तितके दाखले सांपडतात. तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें भक्ति ही ('Irrational') बुद्धिवादविरोधी ठरते हे विसरून चालणार नाहीं. पण जीवन हें सारें ('rational') बुद्धिवादी असतें असें थोडेंच आहे? 'Rational' आणि 'Irrational' यांचें सरसकट मिश्रण जीवनांत झालेलें असतें. आणि बऱ्याच वेळां Irrational गोष्टींचाच जीवनांत अधिक प्रभाव पडत असतो. जीवनाला Rational गोष्टींनींहि जशी प्रेरणा मिळते, तशी Irrational गोष्टींनींहि ती मिळते.

## मराठी संतसंप्रदायांतील तीन कालखंड

मराठी संत-संप्रदायांत तीन मुख्य कालखंड पड-तातः ज्ञानेश्वर, नामदेव आदि संतमंडळाचा पहिला कालखंड; एकनाथाचा दुसरा कालखंड; तुकाराम-राम-दासांचा तिसरा कालखंड. पहिल्या कालखंडांत मराठी भागवत-धर्माचा पाया घातला गेला. हा पाया भक्कम रीतीनें घातला गेला होता. त्यामुळें पुढें अनेक शतकें या पायावरच भागवत-संप्रदायाची इमारत रचली जात होती. या पहिल्या कालखंडानंतर महाराष्ट्रावर इस्लाम-चें जोरदार आक्रमण झालें. दुष्काळादि इतर आपत्तीं-नीं जनता गांजली होती. त्यांतूनहि हा भाग-वत-संप्रदाय तग धरून राहिला. इस्लामच्या आक्र-मणाची प्रतिक्रिया एकनाथाच्या वाङ्मयांत झालेली









स्पष्टपणें दिसून येते. इस्लामच्या आक्रमणाला थोपवून धरण्यासाठीं एकनाथ आणि इतर संतांनीं भागवत-संप्रदायाची ढाल पुढें केली. आणि त्याचा परिणामहि झाला. उत्तर हिंदुस्थान जसा इस्लामच्या आक्रमणाला बळी पडला, तसा महाराष्ट्र पडला नाहीं. अनेक शतकें येथें इस्लामी राजवटी राज्य करीत असूनहि महाराष्ट्राचें इस्लामीकरण त्यांना करतां आलें नाहीं. सर्वंकष आणि आक्रमक अशा इस्लामी संस्कृतीला थोपवून धरण्याच्या कामीं संतांच्या कार्याचा फार उपयोग झाला. इस्लामी आक्रमणाच्या तडाख्यांतून भारतीय संस्कृतीचें संरक्षण करण्याचें श्रेय भारतांतील संतांना दिलें पाहिजे.

तुकारामाचा कालखंड हा मराठी संत-संप्रदायांतील वैभवाचा कालखंड होता. तुकाराम हा महाराष्ट्रांतील सगळ्यांत मोठा लोककवि होऊन गेला. भक्तिमार्गाचें परिणत स्वरूप जणूं तुकारामाच्या रूपानें अवतरलें होतें. तुकारामानें महाराष्ट्रांतल्या साऱ्या जनतेच्या अतःकरणांत स्थान मिळविलें. तुकारामाच्या प्रभावापुढें इतर संत पुढच्या काळांत झांकळून गेलेले दिसतात. तुकारामाच्या शिकवणुकीचा फार मोठा परिणाम मराठी जनतेवर झाला आहे. आपल्या अमोघ आणि स्पष्टवक्त्या वाणीनें सामान्य जनांना त्यानें जागें केलें आणि नवी स्फूर्ति निर्माण केली. ब्रिटिश लोक आपल्या इतिहासांत अशी प्रौढी मारीत असतात कीं, वॉटर्लूची लढाई ही पब्लिक स्कूलच्या क्रीडाङ्गणावर जिंकली गेली. यांत असलेला अतिशयोक्तीचा भाग पतकरून महाराष्ट्राला असेंहि म्हणतां येईल कीं शिवाजीचे सैनिक रणाङ्गणावर शत्रूंना नामोहरम करीत होते, त्याची पूर्वतयारी देहू, लोहगांव आणि त्याच्या आसपासचा प्रदेश यांत तुकाराम-कीर्तनाच्या ज्या फेरी झडत होत्या त्यांत होत होती. महाराष्ट्रानेंहि असा अभिमान कां बाळगूं नये ? महाराष्ट्राच्या इतिहासांत तुकारामाच्या कालखंडाची परिणति शिवाजीच्या राज्यस्थापनेंत झालेली दिसून येते. ऐतिहासिक दृष्ट्या या दोन्हींचा अन्योन्यसंबंध जोडणें कठीण जाऊं नये.

## समाजाची नैतिक पातळी उंचावली

भक्तीचा सुलभ मार्ग सांगूनच संत थांबले नाहींत. महाराष्ट्रांतल्या त्या काळच्या मानवाचें झालेले अधःपतन त्यांना स्पष्ट दिसत होतें. माणुसकीचा लोप होत चाललेला पाहून त्यांना हळहळ वाटत होती. चहाडी, निंदा, चोरी, खोटेपणा, शिंदळकी, परस्त्री-अभिलाषा, म्याडपणा, दांभिकता इत्यादि दोषांनीं माणसें ग्रासलीं गेलीं होतीं. समाजांतील हे दोष नाहींसे व्हावेत, माणसें सुधारावींत, त्यांच्यांत माणुसकी यावी, थोडक्यांत म्हणजे मानव्याची पातळी वाढावी या तळमळीनें संतांनी सतत उपदेश केला आहे. सारें संतवाङ्मय हे नीतीच्या उपदेशांनीं भरलें आहे. शुचिर्भूतपणा, शुद्धाचरण आणि निष्ठामय जीवन यावर सर्व संतमंडळींचा कटाक्ष होता " देह आणि मन हीं शुद्ध आणि निर्मळ ठेवून ईश्वरचरणीं लीन व्हा, ढोंगबाजी करूं नका, आत्मवंचना आणि परवंचना करूं नका " असे संत मोठ्या आर्जवानें सर्व समाजाला सांगत होते. संतपण आणि संत-संगति यांना संतवाङ्मयांत फार महत्त्व आहे. संतपण प्राप्त करून घेणें हा त्यांचा जीवनादर्श होता. त्याकरितां सतत त्यांचा प्रयत्न असे. संत हे आधी स्वतः संत होत असत आणि मागाहून इतरांना संत करीत असत. समाजांतील संतपणा द्विगुणित होऊन वाढत जावा आणि सारा समाज संतांचा व्हावा अशी तळमळ त्यांना लागली होती. म्हणून प्रत्येक संत आपल्याभोंवतीं संतांचीं वलयें निर्माण करीत होता. या त्यांच्या प्रयत्नांमुळें समाजाची नैतिक पातळी उंचावत होती. आत्मविकास करावयाचा आणि त्याच्या द्वारें समाजविकास घडवून आणावयाचा, हा समाजसुधारणेचा राजमार्ग संतांनीं स्वीकारला होता. त्यामुळें समाजांतील मानव्याची पातळी संत वाढवूं शकले. महाराष्ट्रांत जागोजाग संत आणि संत-मंडळें हीं उदयाला येऊं लागलीं व वाढूं लागलीं.

## ईश्वर हा सखा, सांगाती, संवगडी

संतांचें आणखी एक वैशिष्ट्य त्यांच्या देवाविषयींच्या कल्पनेंत आहे. देवाविषयींच्या निरनिराळया कल्पना, निरनिराळया काळांत प्रसृत होत आल्या आहेत. वेदांचा देव निराळा, उपनिषदांचा देव वेगळा, भागवत-धर्माचा देव निराळा, ज्यू, ख्रिस्ती, महंमदी इत्यादि धर्मपंथांचे देव वेगळया स्वरूपाचे आहेत. संतांचा ईश्वर हा या सर्वांहून वेगळा आणि परिणत स्वरूपाचा होता असें म्हणावयास हरकत नाहीं. ज्यू-धर्म हा जगांतील पहिला एकेश्वरी मताचा धर्म असें मानलें जातें. त्याचा देव कठोर शासकावर








त्याचा वचक असतो. ईश्वराविषयीं एक प्रकारची भीतीची भावना त्यांत असते. ख्रिस्त्यांचा देव हा 'आकाशांतला बाप' असतो. त्याच्याबद्दल आदरयुक्त भीति बाळगिली पाहिजे. 'पापी' मानवाचा तो उद्धारकर्ता असल्यामुळें त्याचें भवितव्य आकाशांतल्या बापावर अवलंबून असतें. महंमदी धर्म हा कडवा एकेश्वरवादी आहे. या धर्माचा ईश्वर हा 'कर्तुमकर्तुम्' असून त्याच्या इच्छेवर हें विश्वच नव्हे तर असलीं असंख्य विश्वें अवलंबून आहेत या विश्वांना तो सहज खेळवूं शकतो. उपासकानें त्यांना वचकून राहून आळवण्याचा प्रयत्न केला पाहिजे. हिंदु धर्मांतील ईश्वराची कल्पना ही याहून वेगळी आहे. या धर्मांतून निर्भेळ असें एकेश्वरी मत निर्माण होऊं शकलें नाहीं. वेदांतील निसर्गपूजेच्या धर्माची परिणति सर्वेश्वर-वादांत झाली. तेव्हांपासून हिंदुधर्मीयांत 'सर्वां भूतीं परमेश्वर' पहाण्याची वृत्ति बद्धमूल झाली आहे. उपनिषदांनीं 'आत्मन्'चें अंतिम तत्त्व शोधून काढलें आणि 'तत्त्वमसि' हा सिद्धान्त सांगून ब्रह्मपद प्राप्त करून देण्याची प्रतिज्ञा केली. मानवानें ईश्वरपद प्राप्त करून घेणें, माणसांत ईश्वराचा साक्षात्कार करून घेणें हें उपनिषदांच्या तत्त्वज्ञानाचें सार होतें. गीतेचें वैशिष्ट्य हें आहे कीं, उपनिषदांतील ही क्रिया फिरवून ईश्वर भूलोकांत अवतार घेतो आणि मानवाच्या स्वरूपांत वावरतो ही कल्पना गीतेनें मांडली. ही कल्पना मांडणारा गीता हा पहिलाच ग्रंथ होय. गीतेच्या कल्पनेप्रमाणें ईश्वर हा मानवी स्वरूपांत अवतरतो आणि माणसासारखा वावरतो, वागतो, सुखदुःखें भोगतो आणि इतर माणसांसारखेंच सारे व्यवहार करतो. गीतेनें ईश्वर आणि मानव यांच्यांतील निकट संबंधांवर भर दिला आहे. देव आणि भक्त असा संबंध तिनें निर्माण केला. भक्तानें देवाची आराधना करावी, त्याच्याबद्दल नितांत आदर आणि प्रेम बाळगावें, ईश्वर हा सृष्टीचा निर्माता आणि धनी असूनहि तो सर्वांचा सुहृद् आहे हें गीतेच्या कल्पनेचें वैशिष्ट्य आहे. गीतेंतला ईश्वर हा मित्रभावानें भक्ताला वरच्या पायऱ्याप्रत नेतो आणि त्याचा उद्धार करीत असतो. भक्ति हें उद्धाराचें साधन सांगून गीतेनें भक्तीवर भर दिला आहे. संतांनीं ईश्वराविषयींची हीच कल्पना उचलली आणि ती परिणत अवस्थेला नेऊन पोहोंचविली. संतांचा ईश्वर हा सखा, सांगाती, संवगडी आहे; माणसाचा तो सतत काळचा सोबती आहे. इतकेंच नव्हे तर मानवाबरोबर तो त्याचीं सुखदुःखेंहि अनुभवीत असतो, भोगीत असतो; संतांचा देव हा 'Companion and fellow-sufferer' आहे; त्यामुळें नाथांच्या घरीं तो पाणी भरतो, जनीचें दळणकांडण करतो. संतांच्या जोडीनें तो कष्ट उपसतो, भक्ताची तो सतत साथ करीत असतो; त्याच्याशीं तो समरस होत असतो--ही भावना निर्माण झाली. सृष्टींतील ईश्वर हें तत्त्व माणसाची सतत पाठराखण करीत असतें. त्याचा सतत त्याला आधार असतो. त्या आधारामुळें माणसाला जीवनाला यशस्वी रीतीनें तोंड देतां येते, अशी संतांची श्रद्धा होती. संतांच्या ईश्वराच्या कल्पनेंत अन्योन्यभाव आहे. भक्ताला जसा देवाचा आधार, त्याप्रमाणेंच देवालाहि भक्ताचा आधार लागतो. भक्त देवाचा धांवा करतो आणि देव भक्ताला शोधीत येतो. असा हा अन्योन्यसंबंध आहे. या अन्योन्यसंबंधाची पुढची पायरी म्हणजे साऱ्या विश्वांत देवच भरून राहिला आहे ही कल्पना होय. स्वतःमध्यें, दुसऱ्यामध्यें, सृष्टींतल्या साऱ्या वस्तूंत आणि साऱ्या विश्वाला व्यापून ईश्वर राहिला आहे – अशी दृढ समजूत साऱ्या संतांची होती. विश्वाला व्यापून राहिलेल्या या तत्त्वाशीं एकरूप होणें, विश्वांतील एकत्वाची जाणीव होणें, त्याचा साक्षात्कार अनुभवणें हें संतांचें अंतिम उद्दिष्ट होतें. हें उद्दिष्ट गांठण्याकरितां परमभक्ति हें त्यांचें साधन होतें. ईश्वराचा साक्षात्कार आणि भक्ति असा हा साध्यसाधन-भाव आहे. या साध्य-साधन-भावांतहि एकता होती. कारण भक्ति या साधनाची परिणति ईश्वरपद प्राप्त करून घेण्याच्या साधनांत होत असते.

संतांची ईश्वराविषयींची ही कल्पना अत्यंत महत्त्वाची आहे. संत-संप्रदायाच्या कार्यावर ती एक नवा प्रकाश टाकते. संतांनीं स्वीकारलेली कल्पना ही, विल्यम जेम्स या प्रसिद्ध अमेरिकन तत्वज्ञानें वर्णिल्याप्रमाणें, सर्वांत परिणत स्वरूपाची कल्पना आहे. त्याच्यापुढें ईश्वराविषयींची कल्पना अद्याप जाऊं शकली नाहीं. या कल्पनेमुळें संतांना नवी स्फूर्ति, नवी प्रेरणा, नवा जोम, नवें ओज प्राप्त झालेलें दिसतें. संतांच्या ठायीं असलेला जबरदस्त आत्मविश्वास [illegible] आणि










अनुक्रमणिका

तुकारामाच्या वाङ्मयांत ओसंडून वहात असलेला दिसतो. तो संतांना या ईश्वराच्या कल्पनेंतून प्राप्त झाला असें म्हटलें पाहिजे. या आत्म-विश्वासामुळें आणि ईश्वराच्या या कल्पनेच्या जोरावर संतांनीं आपल्या संप्रदायाचें फार मोठ्या प्रमाणावर मानसिक उद्दीपन केलें. त्याचा साऱ्या समाजावरहि परिणाम झाल्याशिवाय राहिला नाहीं. संतांनीं जी धर्मजागृति केली आणि ईश्वराची आपली कल्पना समाजाला दिली, त्यामुळें समाजाचें एक प्रकारें मानसिक उद्दीपन झालें. हें उद्दीपन धार्मिक क्षेत्रांत होतें. त्याचा परिणाम समाजाच्या एकंदर जीवनावर झाल्याशिवाय राहिला नाहीं. धर्म-जागृती-नें उद्दीपित झालेलीं आणि स्फुरलेलीं मनें इतर क्षेत्रां-तहि पुढें सरसावूं लागलीं. महाराष्ट्रांतील समाज याच काळांत जीवनाच्या इतर क्षेत्रांत पुढें सरसावूं लागला होता. भय आणि न्यूनगंड टाकून तो पुढे पुढें पावलें टाकीत होता. मागसलेल्या मावळ्याचा बारगीर होत होता. बारगीरांचे शिलेदार, शिलेदारांचे सरदार आणि सेनापति होत होते. राजदरबारांत ते प्रतिष्ठा पावत होते. मुत्सद्देगिरीच्या क्षेत्रांतहि त्यांनीं पदार्पण केलें होतें. वाङ्मयाच्या क्षेत्रांत तर भाषा आणि मनांतील भावना सहज रीतीनें ते खेळवूं शकत होते. अशा-प्रकारें विविध क्षेत्रांत मराठी समाज आणि महाराष्ट्र यांचें उत्थापन होत होतें. या उत्थापनाला संतांनीं केलेली धर्मजागृति ही एक महान् प्रेरणा होती.

### धर्मांत केलेली क्रान्ति

संतांच्या भागवत-धर्माचें आणखी एक मोठें वैशिष्ट्य होतें. संतांनीं ईश्वर आणि मानव यांचा साक्षात् संबंध निर्माण केल्यामुळें व्यक्ति ही धर्मसंस्थेला बांधली न जातां मोकळी राहूं शकली. जुन्या धर्मांत व्यक्ति ही स्वतंत्र नव्हती. जुनी धर्मसंस्था, पूर्वापार चालत आलेल्या धार्मिक परंपरा, पुरोहितवर्ग, जुनीं धार्मिक कर्में आणि आचार इत्यादि बंधनांनीं व्यक्ति जखडली जात असे. तो धर्म सामुदायिक स्वरू-पाचा होता. त्यामुळें सामुदायिक बंधनें प्रत्येक व्यक्ती-वर येत होतीं. त्या धर्माचें नेतृत्व पुरोहित-वर्गाकडे होतें. तोच वर्ग धार्मिक बाबींचें नियंत्रण करीत असे. अशा या धर्माच्या स्वरूपांत संतांनीं फार मोठें परि-वर्तन घडवून आणलें. जुन्या परंपरा, कर्मठपणा, पुरोहित-वर्गाचें वर्चस्व यांतून त्यांनीं व्यक्तीची मुक्तता केली. कर्ममार्गाऐवजीं भक्तिमार्गाचा उपदेश केला. पुरोहितवर्गाला रजा देऊन ईश्वर आणि मानव यांचा सरळ प्रत्यक्ष संबंध निर्माण केला. संत-संप्रदायांत गुरूला महत्त्व आहे. पण तें दीक्षा घेण्यापुरतेंच. गुरूबद्दल आदर असावा, निष्ठा असावी. पण प्रत्येक बाबतींत गुरूच्या नियंत्रणाची आवश्यकता नसते. ईश्वराच्या आराधनेसाठीं निष्ठापूर्वक नामस्मरण करणें हा अगदीं साधा सोपा उपाय त्यांनीं सांगितला. या नामस्मरणा-करितां कोणतेहि विधी नको होते, आचारांची गरज नव्हती. देवळें किंवा मूर्ति यांचीहि आवश्यकता नव्हती. बसल्या ठिकाणीं किंवा कोणतेंहि काम करीत असतां ईश्वराचें नांव घ्या, ईश्वरार्पणबुद्धीनें कामें करा म्हणजे तीं त्याला पोंचतात—अशी संतांची शिकवण होती. जुन्या वैदिक धर्माच्या मानानें पाहतां धर्ममतांत ही एक फार मोठी क्रान्ति होती. धर्माच्या आचरणांत जशी क्रांति होती, त्याप्रमाणेंच धर्माच्या स्वरूपांत आणि उभारणींतहि ही क्रांति अनुस्यूत होती. म्हणून संतांचा भक्तिमार्ग हा धार्मिक क्षेत्रांत एक प्रकारें क्रांतिकारक ठरला आहे असें म्हणावें लागतें. या भक्तिमार्गाचें अधिष्ठान समु-दाय किंवा परंपरा यांत असण्याऐवजीं व्यक्ति हें होतें. समाजाच्या दृष्टीनें हें अतिशय महत्त्वाचें होतें. व्यक्ती-वर लादलीं जाणारीं धार्मिक बंधनें ढिलीं पडलीं होती. आणि व्यक्ति ही धार्मिक बाबतींत स्वतंत्र झाली होती. हीच गोष्ट महाराष्ट्रांतील मानवाच्या उत्थापनाला कारणीभूत होत होती.

### राजकारणाकडे संतांनीं कां लक्ष दिलें नाहीं ?

संत-मंडळींवर एक फार मोठा आक्षेप घेतला जातो : तो म्हणजे संतांनीं राजकारणाकडे मुळींच लक्ष दिलें नाहीं. देशांत मोठमोठ्या घडामोडी आणि उलथापालथी होत होत्या. पण संत त्याबद्दल अगदींच उदासीन होते ! या आक्षेपाचें निराकरण होणें आवश्यक आहे. या आक्षे-पांत पहिली मोठी चूक म्हणजे आपण आजच्या युगां-तील पूर्वग्रहांनीं संतांच्या काळाकडे पहातो, ही होय. आजच्या युगाचे निकष संतांच्या काळाला लावतां येणार नाहींत. राजकारण हें संतांचें क्षेत्र नव्हतें. राजकारणांत लक्ष घालण्याची संतांना कधीं गरजहि वाटली नाहीं. संतांच्या काळांत राजकारणाला [illegible] फारसें



अनुक्रमणिका





महत्त्व आणि स्थान नव्हतें. आधुनिक काळांत राजकारणाला फार महत्त्व प्राप्त झालें आहे. जीवनाचा फार मोठा भाग राजकारणानें व्यापलेला आहे. इतका कीं, बऱ्याच वेळां जीवनाच्या इतर अंगांची उपेक्षा होत असते. आधुनिक काळाचा हा विशेष संतकालाला लागूं पडत नाहीं. संतकालीन समाज हा ग्रामपद्धतीनें बांधलेला होता. समाजाचें सारें नियंत्रण, सारे व्यवहार ग्रामपद्धतीच्या परंपरांना अनुसरून चालत असत. ग्रामपद्धतीच्या चौकटींत सारा समाज बसलेला असे. या चौकटींत राज्यसंस्थेला महत्त्व नव्हतें. राज्यसंस्था ही या चौकटीवरील आवरणासारखी असते. या ग्रामपद्धतींत तिला हस्तक्षेप करतां येत नसे. त्यामुळें कोणी राजा आला काय, गेला काय, कोणतीं राजघराणीं आलीं काय आणि गेली काय, त्यांचें सुखदुःख या ग्रामपद्धतींत रहाणाऱ्या लोकांना नसे. त्यामुळें राज्ययंत्र बदललें तरी ग्रामपद्धतींची चौकट आहे तशीच रहात असे. त्यांत कोणताहि बदल होत नसे. राजाला राजाचा वांटा दिला म्हणजे प्रजा मोकळी होत असे. प्रजा आणि राजा यांचा संबंध एवढ्यापुरताच असे. या व्यतिरिक्त सामान्य जनांचा राज्ययंत्राशीं फारसा संबंध येत नसे. राजकारण करणारा एक विशिष्ट वर्ग असे आणि तो अगदीं मर्यादित असे. राज्य करणारा, राजदरबारीं वावरणारा, सैन्यांत दाखल होऊन लढाया खेळणारा असा ठराविक वर्ग असे आणि तो राजधान्यांत रहात असे. ग्रामपद्धतींत या वर्गाला महत्त्व नसे. एकादा जुलमी राजा अगर त्याचे जुलमी अधिकारी प्रजेला उपद्रव देत असत. त्यांचा जाच सहन करण्याची पाळी प्रजेवर येई. पण त्यामुळें ग्रामपद्धतींत कांहीं बिघडलें असें होत नसे. अशा ग्रामपद्धतीच्या विशिष्ट मर्यादेंत संत कार्य करीत होते. त्यांचा संबंध येत असे तो या ग्रामपद्धतींतील समाजजीवनाशींच. या समाजजीवनांतील व्यक्ति अधःपतित होत चाललेली त्यांना दिसत होती. त्या व्यक्तीला सुधारून सन्मार्गावर आणण्याच्या उद्दिष्टानें संत कार्य करीत होते. संतांच्या या उद्दिष्टांत राजकारण येत नव्हतें. व्यक्तीची नैतिक पातळी उंचावणें या ध्येयानें संत प्रेरित झाले होते. राजकारणाची प्रेरणा त्यांना उत्साहित करूं शकत नव्हती. संतकालीन विशिष्ट सामाजिक परिस्थितीकडे लक्ष दिलें. म्हणून संतांनीं राजकारण केलें नाहीं या आक्षेपांत तथ्य वाटत नाहीं.

## युरोपांतील धर्मसुधारणाचळवळीशीं तुलना

मराठी संतांचें आणखी एक मोठें वैशिष्ट्य होतें, आणि त्याकडे दुर्लक्ष होत असतें. धर्माव्यतिरिक्त राजकारणांत किंवा इतर बाबतींत न पडून संतांनीं आपल्या धार्मिक आंदोलनाचें मूल्य राखलें ही गोष्ट आपण विसरतों. संतांनीं आपली धार्मिक चळवळ शुद्ध राखली. ती राजकारणासारख्या गोष्टींनीं भ्रष्ट होऊं दिली नाहीं. धार्मिक मूल्य या दृष्टीनें संतांच्या चळवळीकडे पाहिल्यास हें श्रेय संतांना दिलें पाहिजे. संतांच्या चळवळीचा विचार धार्मिक मूल्याच्या दृष्टीनें झाला पाहिजे. कारण धर्म हेंच संतांचें क्षेत्र होतें. युरोपांतील धर्म-सुधारणेच्या चळवळीशीं संतांच्या चळवळीची या बाबतींत तुलना करून पहाण्यासारखी आहे. युरोपांतील धर्मसुधारणेची चळवळ ही प्रारंभीं धर्माचें शुद्धीकरण करण्याकरितां सुरू झाली. पण पुढें एवढ्यापुरतीच ती मर्यादित राहिली नाहीं. युरोपांतील धर्मसुधारणेचे सारे पंथ राजकारणांत हस्तक्षेप करूं लागले. राजकारणाचें आक्रमण त्यांच्या धर्मकारणावर झालें. त्यामुळें त्यांचे धार्मिक संप्रदाय आणि धार्मिक चळवळी या भ्रष्ट झाल्या. त्या शुद्ध राहिल्या नाहींत. त्यांचें धार्मिक मूल्य शुद्ध राहूं शकलें नाहीं. संतांच्या चळवळीचें असें झालें नाहीं. संतांनीं आपल्या चळवळीचें धार्मिक मूल्य शेवटपर्यंत राखलें. धर्म-पंथांचा विचार करतांना धर्म-मूल्यांच्या दृष्टीनें विचार करणें अवश्य आणि क्रमप्राप्त आहे. राजकीय मूल्यांनीं धार्मिक आंदोलन किंवा धर्मपंथ मापणें हें चुकीचें ठरेल. म्हणून धर्ममूल्याचा विचार करतांना, संतांनीं आपलें आंदोलन शुद्ध राखलें, तें गढूळ होऊं दिलें नाहीं याचें श्रेय त्यांना दिलें पाहिजे.

युरोपांतील धर्मसुधारणेची चळवळ आणि संतांची चळवळ यांत कांहीं बाबतींत भिन्नता आहे. युरोपमधील धर्मसुधारणेच्या आंदोलनांत दोन प्रवाह ठळकपणें होते. एक म्हणजे त्यांत पोपशाहीविरुद्ध बंड होतें. ल्यूथर, हस्, झ्विंगली, कॅल्व्हिन इत्यादी धर्मसुधारकांनीं पोपच्या सत्तेविरुद्ध बंडाचा झेंडा उभा केला. पोपच्या मक्तेदारीला त्यांनीं शह दिला. एवढ्या बाबतींत ही चळवळ पुरोगामी होती. पण या चळवळीचा दुसरा जो विशेष होता तो प्रतिगामी स्वरूपाचा








होता. १४ व्या शतकापासून रेनासान्सची विचार-क्रान्तीची व्यापक आणि विशाल चळवळ युरोपांत फार मोठ्या प्रमाणावर पसरत होती. या चळवळीनें बुद्धिवादाचा पुरस्कार करून ईश्वर, पारलौकिक विचार आणि अध्यात्म यांना धक्के दिले आणि मानवाला केंद्रस्थानीं बसविलें. सृष्टीच्या कद्रस्थानीं ईश्वराऐवजीं रेनासान्सच्या धुरीणांनीं मानवाला अधिष्ठित केलें. धार्मिक विचारसरणींवर हा फार मोठा आघात होता. या रेनासान्सच्या विचारसरणीविरुद्ध प्रतिक्रिया म्हणून धर्मसुधारणेची चळवळ निर्माण झाली. मानवी जीवनांतील धर्माचें स्थान बळकट करणें हा तिचा उद्देश होता. थोडक्यांत युरोपांतील धर्मसुधारणा ही पोपशाहीविरुद्ध बंड आणि रेनासान्सची प्रतिक्रिया अशा दुहेरी स्वरूपाची होती. युरोपांतील धर्मसुधारणेच्या चळवळीचें स्वरूप पुढें निव्वळ धार्मिक राहिलें नाहीं. राजकीय हेतूसाठीं ती राबविली जाऊं लागली. जर्मनींतील राजे तींत शिरले. इंग्लंडमध्यें प्युरिटनपंथीय लोक राजकारण खेळवूं लागले. याचा परिणाम असा झाला कीं, ती चळवळ भ्रष्ट होऊं लागली. धर्मसुधारकांच्या चळवळीची प्रतिक्रिया म्हणून Counter-Reformation ची प्रतिक्रान्तीची चळवळ निर्माण झाली. आणि ती फार मोठ्या प्रमाणा-वर फोंफाऊं लागली. पुढच्या काळांत Counter-Reformation ची ही चळवळ अधिक प्रभावी झालेली दिसून येते. धर्मसुधारणेच्या चळवळीला प्रतिबंध करण्याच्या कामीं ती यशस्वी ठरली. धर्मसुधारणेची चळ-वळ त्यामुळें कांहींशी स्थगित झाली. म्हणून मग पुढें इव्हन्जेलिस्टांना पुढें सरसावावें लागलें आणि धर्म-सुधारणेचीं मूल्यें पुन्हां प्रस्थापित करण्याचा प्रयत्न करावा लागला.

युरोपच्या धर्मसुधारणेच्या चळवळींत आणखी एक मोठा दोष होता. ती चळवळ असहिष्णु होती. सारे धर्मसुधारक पोपशाही-विरुद्ध मत-स्वातंत्र्य मागत होते. पण तेंच मतस्वातंत्र्य ते स्वतःच्या अनुयायांना किंवा इतरांना द्यायला तयार नव्हते. ल्यूथर आणि कॅल्व्हिन हे तर कमालीचे अस-हिष्णु होते. कॅल्व्हिनिस्टांनीं सर्व्हिटसला त्याच्या मताबद्दल जिवंत जाळून टाकलें. धर्मसुधारकांच्या असहिष्णुतेमुळें धर्मछळ झाल्याचीं अनेक उदाहरणें युरोपच्या इतिहासांत सांपडतात. भारतांतील संतांचें वर्तन मात्र अगदीं याच्याविरुद्ध होतें. संत हे सहिष्णु वृत्तीचे होते. धर्मप्रेमाच्या नांवाखालीं मानवता गम-वायला ते तयार नव्हते. संतांच्या चळवळींत कोठेंच कडवेपणा दिसत नाहीं. त्यांची निष्ठा जाज्वल्य होती. पण त्यांत कडवेपणा नव्हता. ख्रिस्ती चर्चसारखी कडवी संघटना त्यांनीं उभी केली नाहीं. त्यांनीं संघ-टनेला व्यक्ति बांधली नाहीं. स्वतःच्या व्यक्तिस्वातंत्र्या-साठीं भांडायचें, पण दुसऱ्याला तें द्यायचें नाहीं, असा आडमुठेपणा त्यांनीं केला नाहीं. संत-संप्रदायांत व्यक्ति ही मोकळी आहे. ती जखडली गेली नाहीं. लोकशाही मूल्याच्या दृष्टीनें ही अतिशय महत्त्वाची गोष्ट आहे. त्यामुळें संत-संप्रदायाची संघटना बांधीव स्वरूपाची झाली नसेल, पण व्यक्तीच्या विकासाला त्यांत वाव होता. संत-संप्रदायांत कडवेपणा, असहि-ष्णुता, परधर्मीयांचा द्वेष, त्यांच्या दवतांची निंदा-नालस्ती असे प्रकार कोठेंहि सांपडत नाहींत. संतांच्या चळवळीचें स्वरूप अंतर्बाह्य निर्मल होतें. हें संत-धर्माचें वैशिष्ट्य होय.

---

## चांगुलपणा आणि संतपणा

चांगुलपणा म्हणजे संतपणा नव्हे. खरा संत केवळ चांगला वागत नाहीं. तो स्वतः मूर्तिमान् चांगुलपणाच असतो. स्वतःपेक्षां अधिक मोठें, व्यक्तिगत आनंदापली-कडचें असें कांहीं त्याच्यांतून प्रकट होत असतें. माणूस लोकप्रियतेसाठीं चांगली वागवणूक अंगीं बाणवूं शकेल. पण अहंकाराच्या भिंती ढांसळून जाऊन, त्या मोकळ्या जागीं परमेश्वरानें येऊन बसावें यासाठीं व्यवहारी हिशेब पुरत नाहींत. स्वतःच्या जागत प्रयत्नांतूनच हें साधूं शकतें. ... विनोबांचें आत्मविसर्जन हें असें अगदीं सहज असें आहे. त्यांत नाट्याचा, महत्त्वाकांक्षे-चा लेशमात्रहि नाहीं. सत्तेचें त्यांना एवढेंहि आकर्षण नाहीं.

— हॅलम टेनीसन यांच्या [illegible] ग्रंथांतून.



अनुक्रमणिका






सनदेच्या पुनर्घटनेचा विचार : श्री. नारायण य. डोळे

# संयुक्त राष्ट्रसंघ : अपेक्षा व प्रत्यक्ष कार्य

या आक्टोबर १९५५ मध्यें संयुक्त राष्ट्रसंघाचें युनोचें दहावें अधिवेशन सुरू होईल. या अधिवेशनाच्या कामकाजपत्रिकेंत ' युनोसनद-दुरुस्तीचा विचार करण्यासाठीं परिषद् बोलाविणें' या विषयाचा अन्तर्भाव निश्चितपणें केला जाईल. १९४५ मध्यें मान्य झालेल्या युनोच्या सनदेंत १०९ ( ३ ) या कलमांत असें स्पष्ट म्हटलें आहे कीं युनोच्या दहाव्या अधिवेशनापर्यंत जर अशी परिषद् बोलावली गेली नाहीं तर दहाव्या अधिवेशनांत या प्रश्नाचा विचार व्हावा.

**थोडी पूर्वपीठिका**

संयुक्त राष्ट्रसंघटनेची स्थापना जून १९४५ मध्यें झाली. दुसऱ्या महायुद्धांत जर्मनी, इटली व जपान यांच्याशीं लढणाऱ्या राष्ट्रांचें युद्धकालीन सहकार्य खरोखर स्पृहणीय होतें. या सहकार्यामुळेंच दोस्तांनीं युद्धांत विजय मिळविला. हें युद्धकालीन सहकार्य युद्धोत्तर शांततेच्या कालींहि जर शक्य झालें तर जागतिक शांतता चिरकाल टिकेल असा विश्वास वाटूं लागला होता. युद्धकालीन सहकार्याची पहिली पायरी म्हणजे अट्लांटिक सनद. १४ ऑगस्ट १९४१ या दिवशीं चर्चिल व रूझवेल्ट या दोघांनीं आपापल्या राष्ट्रांचीं युद्धध्येयें म्हणून ८ ध्येयांना मान्यता दिली. या आठ ध्येयांपैकीं कांहीं महत्त्वाचीं कलमें अशीं: युद्धांत विजय झाल्यानंतर पराजित राष्ट्रांच्या भूमीचे लचके तोडले जाणार नाहींत; जनतेच्या स्पष्ट संमतीशिवाय कोणताहि प्रादेशिक बदल होणार नाहीं; स्वतःचें सरकार निवडण्याचा लोकांना हक्क आहे; जागतिक व्यापार व कचा माल याचा फायदा सर्व राष्ट्रांना सारखा मिळावा—इत्यादि. याच्यानंतर दुसरी पायरी म्हणजे २६ दोस्तराष्ट्रांनीं केलेली संयुक्त राष्ट्रांची घोषणा. याचवेळीं ' संयुक्त राष्ट्रें ' हा शब्दप्रयोग प्रथम प्रे. रूझवेल्ट यांनीं केला. १ जानेवारी १९४२ रोजीं ही घोषणा झाली व तींत या २६ राष्ट्रांच्या वतीनें ( १ ) अट्लांटिक सनदेला पाठिंबा ( २ ) जास्तींत जास्तीं युद्धसहकार्य (३) युद्ध जिंकल्यास कोणत्याहि राष्ट्रानें स्वतंत्रपणें तह करावयाचा नाहीं—अशीं तीन तत्त्वें मान्य करण्यांत आलीं. अट्लांटिक सनद व संयुक्त राष्ट्रांची घोषणा या दोन्ही घटना एका विशिष्ट दिशेनें चालल्या होत्या. पण त्याला स्पष्टता आली नव्हती. १९४३ च्या ऑक्टोबरमध्यें मॉस्को येथें इंग्लंड, अमेरिका, रशिया व चीन या बडया चौघांची परिषद् भरली. या परिषदेंत सर्वांनीं मिळून शत्रुराष्ट्रांशीं निकरानें लढण्याचा निश्चय करण्यांत आला व लवकरांत लवकर एक सार्वभौम व स्वतंत्र राष्ट्रांची संघटना स्थापन करण्यांत यावी असें ठरलें. आजच्या यूनोचा पाया परिषदेंत घातला गेला. मॉस्को-घोषणेप्रमाणें नवी संघटना स्थापन करणें कितपत शक्य आहे याचा विचार करण्यासाठीं ऑगस्ट, सेप्टेंबर व ऑक्टोबर १९४४ मध्यें अमेरिकेंत डंबार्टन ओक्स येथें बड्या चौघांच्या प्रतिनिधींची परिषद् भरविण्यांत आली. तेथें अनेक बाबतींत विचार झाला. परन्तु कांहीं बाबतींत मतैक्य होईना. पुढें फेब्रुआरी १९४५ मध्यें याल्टा येथें इंग्लंड, अमेरिका व रशिया या बड्या तिघांनींच विचारविनिमय केला. यावेळीं सुरक्षा-मंडळांतील मतदानपद्धतीसंबंधीं ( व्हेटोच्या अधिकारासंबंधीं ) मतैक्य झालें. देवाणघेवाणींत बड्या तिघांच्या शिवाय फ्रान्स व चीन यांनाहि बड्या राष्ट्रांत समावेश [illegible] आला व






तेव्हांपासून बडीं राष्ट्रें म्हणून या पांच राष्ट्रांना मान्यता देण्यांत आली. याल्टा येथेंच नव्या संघटनेसंबंधीं विचार करण्यासाठीं २५ एप्रिल १९४५ हा दिवस ठरविण्यांत आला.

१९४५ च्या सुरवातीस अमेरिकेनें बड्या ५ जणांच्या वतीनें यजमान या नात्यानें सानफ्रान्सिस्को येथें परिषदेसाठीं राष्ट्रांना निमंत्रणें दिलीं. जर्मनी व जपानशीं ज्यांनीं युद्ध पुकारलें व १९४२ च्या संयुक्त राष्ट्रांच्या घोषणेशीं जे सहमत आहेत अशा ४५ राष्ट्रांना बोलावण्यांत आलें. एप्रिल, मे व जून या महिन्यांत सुमारें ४०० सभा झाल्या. बड्या राष्ट्रांच्या युनोसनदेच्या मसुद्याला १२०० उपसूचना, दुरुस्त्या सुचविल्या गेल्या. लहान व मध्यम राष्ट्रांच्या वतीनें बड्या राष्ट्रांशीं भांडण्याचें काम ऑस्ट्रेलियानें चांगलें केलें. पण फारसा उपयोग झाला नाहीं. व्हेटोच्या मुद्द्यावर परिषद् मोडण्याचा संभव उत्पन्न झाल्याचें दिसतांच लहान व मध्यम राष्ट्रांनीं माघार घेतली. या परिषदेच्या वेळींच युरोपांतील युद्ध संपलें. दोस्त विजयी झाले. जमलेल्या ४५ राष्ट्रांतील जनतेच्या आशा उजळल्या. जपानशीं चालू असलेलें युद्ध शेवटच्या अवस्थेंत होतें. अर्थात् अणुबॉंबचें विध्वंसक सामर्थ्य अजून पूर्णपणें कळलें नव्हतें.

## युनो-संघटनेंतील विविध मंडळें व त्यांचें कार्य

परिषदेंत **संयुक्त राष्ट्रांची,** यूनोची स्थापना झाली. यूनो-संघटनेच्या कार्याचीं प्रमुख मंडळें म्हणून **जनरल असेंब्ली, सुरक्षा-मंडळ** ( Security Council ), **आर्थिक व सामाजिक-मंडळ** ( Economic and Social Council ), **विश्वस्त-मंडळ** ( Trusteeship Council ), **आंतरराष्ट्रीय न्यायालय** ( International Court of Justice ) व **सचिवालय** ( Secretariat ) या सहा मंडळांना मान्यता देण्यांत आली.

जनरल असेंब्लीमध्यें सर्व राष्ट्रांचे प्रतिनिधी असतात. प्रत्येकाला एक मत असतें व सर्व निर्णय साध्या ( ५१ % ) किंवा दोन-तृतीयांश बहुमतानें घेतले जातात. हें मंडळ सर्वोच्च असून इतर शाखा-मंडळांना आपापले वार्षिक अहवाल जनरल असेंब्लीकडे पाठवावे लागतात व ज. असेंब्लींत त्यावर चर्चा होते. संघटनेच्या आर्थिक व्यवहारासंबंधीं निर्णयहि येथेंच घेतले जातात.

**सुरक्षा-मंडळांत** एकूण ११ सभासद असतात. इंग्लंड, अमेरिका, चीन, रशिया व फ्रान्स या पांच बड्या राष्ट्रांना कायम सभासदत्व असून उरलेल्या ६ राष्ट्रांची निवड जनरल असेंब्ली प्रत्येकीं दोन वर्षांकरितां करते. जागतिक शांतता टिकविण्यास होणारें त्या राष्ट्रांचें सहकार्य व भौगोलिक दृष्ट्या समान वांटणी हे दोन निकष लावून या सहा राष्ट्रांची निवड करण्यांत येते. या सुरक्षा-मंडळांत कोणत्याहि महत्त्वाच्या विषयासंबंधीं निर्णय घ्यावयाचा झाल्यास सर्व बड्या राष्ट्रांची संमति आवश्यक आहे. दहा राष्ट्रें एका बाजूला व एक बडें राष्ट्र एका बाजूला असें मतदान झालें तरी निर्णय होणार नाहीं. यालाच **व्हेटोचा अधिकार** असें म्हणतात. गेल्या दहा वर्षांत एकूण ६० वेळां व्हेटो वापरला गेला. त्यांतील ५८ वेळां रशियानें या अधिकाराचा उपयोग केला.

**आर्थिक व सामाजिक मंडळांत** एकूण १८ सभासद असतात व ते जनरल असेंब्लीतून निवडून येतात. येथें सर्व निर्णय साध्या बहुमतानें घेतले जातात. बडी राष्ट्रें, छोटीं राष्ट्रें असा भेद केला जात नाहीं. लीग ऑफ नेशन्सच्या वेळीं असें मंडळ नव्हतें. निरनिराळ्या राष्ट्रांना आर्थिक व सामाजिक प्रश्नांत प्रत्यक्ष मदत करणें, मार्गदर्शन करणें, महत्त्वाच्या प्रश्नावर संशोधन करणें इत्यादि कामें या मंडळांत केलीं जातात. या मंडळाच्या मदतीला विशिष्ट कामें करणाऱ्या कांहीं संस्था ( Specialized Agencies )






आहेत. उदाहरणार्थ, **जागतिक मजूर-संघटना, अन्न व शेतकी-संघटना, जागतिक आरोग्य-संघटना, जागतिक शैक्षणिक, शास्त्रीय व सांस्कृतिक संघटना** इत्यादि.

**विश्वस्त-मंडळांत** विश्वस्त प्रदेशांचा कारभार पहाणारीं राष्ट्रें, सर्व बडीं राष्ट्रें व या दोन्हीं-इतकीं इतर राष्ट्रें इतके सभासद असतात. यूनोतर्फें ११ विश्वस्त प्रदेशांचा कारभार पाहिला जातो. कारभार पाहणारी राष्ट्रें आपल्या अधिकारांतील विश्वस्त प्रदेशाच्या सर्वांगीण प्रगतीचा अहवाल सादर करीत असतात. या राष्ट्रांतील लोकांना सरकारविरुद्ध या मंडळांत गाऱ्हाणीं सादर करण्याचा हक्क आहे व त्यावर विचार केला जातो. याहि मंडळांत व्हेटोचा अधिकार नाहीं. अ-स्वयंशासित परंतु विश्वस्त म्हणून जीं ओळखलीं जात नाहींत अशा राष्ट्रांच्या अडचणींचा विचार करण्यासाठीं जनरल असेंब्लीतर्फें एक समिति काम करते.

**आंतरराष्ट्रीय कोर्टांत** प्रत्येकीं ९ वर्षांच्या मुदतीसाठीं १५ न्यायमूर्तींची निवडणूक जनरल असेंब्ली व सुरक्षा-मंडळ स्वतंत्रपणें करतात. जगांतील सर्व प्रमुख न्यायपद्धतींना यांत स्थान मिळावें असा संकेत कटाक्षानें पाळला जातो. कोर्टाची कचेरी नेदर्लंडस्‌मधील हेग यां ठिकाणीं आहे.

**सचिवालयांत** प्रमुख सचिव ( Secretary-General) व इतर अधिकारी नोकरवर्ग येतो. मुख्य सचिव नेमण्याच्या वेळीं व्हेटोचा अधिकार वापरतां येतो. प्रथम सुरक्षामंडळांत निवडणूक होते व जनरल असेंब्लीनें मान्यता दिल्यानंतर नेमणूक होते. १० एप्रिल १९५३ पर्यंत म्हणजे एकूण ७ वर्षें २ महिने नॉर्वेच्या श्री. ट्रिग्वे ली यांनी सेक्रेटरी-जनरल म्हणून काम केलें, त्यांच्यानंतर स्वीडनचे श्री. डाग हॅमरशील्ड हे सेक्रेटरी-जनरल म्हणून काम करीत आहेत. इतर नोकरवर्गाची नेमणूक भौगोलिक समान वांटणीचें तत्त्व लक्षांत ठेवून सेक्रेटरी-जनरल करतो.

## गेलीं दहा वर्षें

१९४५ च्या एप्रिल २५ पासून जून २६ पर्यंत परिषदेचें कामकाज चाललें. २६ जून १९४५ ला ५० राष्ट्रांच्या प्रतिनिधींनीं यूनो सनदेवर सह्या करून यूनोची स्थापना केली. सनदेची सुरुवात वैशिष्ट्यपूर्ण अशी आहे : 'आम्हीं, संयुक्त राष्ट्रांचे नागरिक' ('We the peoples of the United Nations') अशी सुरवात करण्यांत आली. याच्या अगोदर राष्ट्रांराष्ट्रांत जे करार होत त्यांची सुरवात 'High Contracting Parties' अशी सरकारांना किंवा राजांना उद्देशून केलेली असे.

१९४६ मध्यें **संयुक्तराष्ट्रांचें** पहिलें अधिवेशन इंग्लंडमध्यें वेस्टमिन्स्टर चर्चमध्यें भरविण्यांत आलें. नव्या जागतिक संघटनेचें मुख्य निवासस्थान कोठें असावें यावर चर्चा होऊन मतदान झालें. जिनेव्हा, इंग्लंड, पॅरिस अशीं युरोपांतील शहरें सुचविण्यांत आलीं पण शेवटीं अगदीं थोड्या मतांनीं न्यूयॉर्क हें मुख्य निवासस्थान ठरलें. निवासस्थान अमेरिकेंत केल्यामुळें अमेरिकेचें सहकार्य कायम स्वरूपाचें लाभेल असाहि हेतु अनेक राष्ट्रांच्या मनांत होता. 'लीग ऑफ नेशन्स'च्या स्थापनेच्या वेळीं ज्याप्रमाणें अमेरिकेनें ऐन वेळीं लीगमध्यें भाग घेण्याचें नाकारलें त्याची पुनरावृत्ति होऊं नये असा हेतु मनांत धरून अनेक राष्ट्रांनीं अमेरिकेच्या मागणीला पाठिंबा दिला. तावडतोब न्यूयॉर्क येथें **संयुक्त राष्ट्रांना** साजेलशी इमारत बांधण्याचें काम सुरू झालें. १९५१ मध्यें ३९ मजली इमारत पूर्ण झाली. १९५२ पासून या नव्या इमारतींत सभा भरूं लागल्या. गेल्या ९ वर्षांत बेल्जम, ब्राझिल, ऑस्ट्रेलिया, फिलिपाईन्स, इराण, मेक्सिको, कानडा, भारत व नेदर्लंडस् या राष्ट्रांच्या प्रतिनिधींची अध्यक्षस्थानीं निवड करण्यांत आली होती.





अनुक्रमणिका

बघतां बघतां युनो स्थापन होऊन दहा वर्षें झालीं. युनो स्थापन होतांना जे मित्र होते ते आज शत्रू झाले आहेत आणि जे शत्रू होते ते मित्र म्हणून ओळखले जात आहेत. या दहा वर्षांत खूप मोठ्या, ऐतिहासिक महत्वाच्या घटना घडल्या. रशिया, अमेरिका, इंग्लंड, फ्रान्स व चीन हीं १९४५ च्या परिषदेंत बडीं राष्ट्रें म्हणून गणलीं गेलीं होती. रशिया व अमेरिकेच्या युद्धकालीन मैत्रीला तडे जात, गेलीं कांहीं वर्षें ते एकमेकांशीं शत्रुवत् वागत आहेत. नवीन रशियन राजवटीच्या धोरणांत थोडासा नरमपणा प्रतीत होत आहे. पण या धोरणाबद्दल पाश्चिमात्य राष्ट्रांच्या मनांत एकदरींत संशय घोटाळतो आहे. इंग्लंडचें प्रचंड साम्राज्य भूतकाळांत जमा होऊन इंग्लंड स्वतःच आज बऱ्याच प्रमाणांत अमेरिकन आर्थिक मदतीवर अवलंबून आहे. फ्रान्सची स्थिति तर पहायलाच नको. चीनमध्यें क्रांति होऊन तेथें कम्युनिस्ट राजवट प्रस्थापित झालेली आहे. १९४५ सालीं परतंत्र असलेला भारत आज स्वतंत्र होऊन जागतिक शांततेसाठीं वैशिष्ट्यपूर्ण व महत्त्वाचें कार्य करीत आहे. आशिया व आफ्रिका या खंडांत स्वाभिमानाचें, स्वतंत्रतेचें, जागृतीचें नवें वातावरण उत्पन्न झालें आहे. युरोप-खंडांत जर्मनीची फाळणी झाली आहे. पूर्व यूरोपमधील नऊ राष्ट्रें कम्युनिस्ट राजवटीखालीं आहेत. कोरिया-इंडोचायनामध्यें घनघोर युद्धें पेटून पुन्हां ती शांत झालीं. पण देशाची फाळणी मात्र कायमच राहिली आहे. दहा वर्षें झाली तरी जग अजून पूर्णपणें युद्धापासून मुक्त झालेलें नाहीं.

## युनोबद्दलच्या अपेक्षा कां पुऱ्या झाल्या नाहींत?

या सर्व काळांत युनोबद्दल फार मोठ्या अपेक्षा बाळगल्या गेल्या. कांहीं बाबतींत युनो कसाला उतरली; कांहींत युनो अयशस्वी झाली. युनो यशस्वी झालीं कीं अयशस्वी असा प्रश्न उपस्थित करण्यांत फारसा अर्थ नाहीं. युनो म्हणजे तिचीं सर्व सभासद राष्ट्रें! कांहीं वेळां या सभासदराष्ट्रांनीं समंजसपणा दाखवून प्रश्न शांततेच्या मार्गानें सोडविले तर कांहीं ठिकाणीं त्यांनीं युनोला बाजूला सारून आपापसांतील प्रश्न रणभूमीवर सोडविण्याचे प्रयत्न केले. म्हणजे युनो अयशस्वी झाली असें म्हणणें म्हणजे युनोचीं सभासदराष्ट्रें अयशस्वी झालीं असेंच म्हणणें होय. युनोच्या ध्येयांपैकीं सर्व ध्येयें आज पूर्ण झालीं नाहींत यांत शंका नाहीं. परंतु यांत युनोच्या यंत्रणेंतील किंवा कलमांतील दोषांपेक्षां इतर गोष्टींचा जास्त भाग आहे. उदा०, युनोचीं ध्येयें व तीं पूर्ण करण्यासाठीं सर्व सभासदराष्ट्रांनीं युनोला बहाल केलेले अधिकार यांत फार अंतर आहे. युनो म्हणजे स्वतंत्र, सार्वभौम राष्ट्रांची एक संघटना आहे. युनो म्हणजे जगाचें सरकार नाहीं ही गोष्ट अनेक वेळां विसरली जाते. आपल्या सार्वभौमत्वाला यत्किंचित्हि धक्का लावू देण्यास सभासद-राष्ट्रें तयार नाहींत आणि युनोकडून अपेक्षा मात्र केली जाते फार मोठ्या कामाची! आपसांतील प्रश्न प्रथम आपल्या बळांवर सोडविण्याचे प्रयत्न केले जातात आणि कांहीं कालानंतर ते प्रश्न अधिकच अवघड झाल्यानंतर युनोकडे सोंपविले जातात आणि युनोकडून अपेक्षा केली जाते तावडतोब निर्णय मिळण्याची! युनोनें दिलेले निर्णय पाळले जातील अशी हमी घेतली जात नाहीं व निर्णय पाळले जातात कीं नाहीं हें पाहण्यासाठीं युनोजवळ शक्ति नाहीं. अशा परिस्थितींत आपल्या आवांक्यांत असलेली कोणतीहि आंतरराष्ट्रीय संघटना यापेक्षां जास्त करूं शकणार नाहीं असें म्हणणें भाग पडतें.

युनोनें काय केलें आहे यापेक्षां काय केलें नाहीं याकडेच लोकांचें लक्ष वेधलें जातें. वास्तविक युनोनें जें कांहीं यथाशक्ति थोडेंबहुत केलें आहे, तें स्पृहणीय आहे यांत संशय नाहीं. बाकी सर्व गोष्टी सोडून दिल्या तरी एवढें आपणांस खासच म्हणतां येईल कीं तिसरें [illegible] युनोनें



अनुक्रमणिका

गेलीं दहा वर्षें थोपवून धरलें आहे. गेल्या दहा वर्षांत लहान प्रमाणांत स्थानिक युद्धें झालीं पण युनो नसती तर कदाचित् आज ठिणग्यांनीं पेट घेतला असता ! इंडोनेशिया, काश्मीर, पॅलेस्टाइन, कोरिया व इंडो-चायना येथील युद्धें पसरूं न देण्यांत व शेवटीं थांबविण्यांत युनोनेंच पुढाकार घेतला. याशिवाय इंडोनेशिया, लिबिया, इस्राएल या राष्ट्रांच्या आजच्या स्वतंत्र अस्तित्वाला यूनोचें सहकार्य कारणीभूत आहे. दक्षिण कोरियाचें स्वातंत्र्य युनोनेंच अबाधित ठेवलें. अणुशक्ति–नियंत्रण मंडळ नेमून अणुबाँबवर नियं-त्रण घालण्याचे प्रयत्न झाले. परंतु रशिया व अमेरिका यांच्यामधील तंग वातावरणामुळें ते प्रयत्न पूर्णतया यशस्वी होऊं शकले नाहींत. गेल्या वर्षी प्रे. आय-सेनहॉवर यांनीं मांडलेल्या 'शांततेसाठीं अणुशक्ति' या योजनेमुळें वातावरण निवळण्यास खूप मदत झाली आहे. जिनिव्हा येथें गेल्या ऑगस्टमध्यें युनोतर्फे याच योजनेचा विचार करण्यासाठीं जगांतील बाराशें शास्त्रज्ञांची बैठक युनोतर्फे बोलविण्यांत आली होती. अणुशक्तीच्या विध्वंसक शक्तीवर नियंत्रण घालून मानवाच्या उपयोगासाठीं ती वापरली जाण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं आहेत. थंड्या युद्धामुळें दूषित झालेलें वातावरण जितक्या प्रमाणांत निवळेल तितक्या लवकर युनो शस्त्रास्त्रनियंत्रण व शस्त्रास्त्रसंन्यास, जगाची युद्धापासून मुक्तता वगैरे प्रयत्नांत यशस्वी होईल. आज युनो या क्षेत्रांत फारसें नेत्रदीपक कार्य करूं शकली नाहीं याचें कारण युनोसनदेंत कांहीं वैगुण्यें आहेत असें नसून युनोसनदेंतील चांगल्या कलमांचा उपयोग करून घेण्यासारखी परिस्थिति उत्पन्न होण्यास बडीं राष्ट्रें आपण होऊन आपल्या कृतीनें विरोध करीत आहेत. म्हणजे मूळ कारण युनोसनदेंत नसून बाहेर आहे. ही परिस्थिति सुधारल्याशिवाय युनोसनदेच्या कागदांत कितीहि बदल केले तरी त्याचा कांहीहि उपयोग होणार नाहीं.

## आर्थिक-सामाजिक मंडळाचें कार्य

आर्थिक व सामाजिक क्षेत्रांत युनोचें **आर्थिक व सामाजिक मंडळ** ( Economic and Social Council ) चांगलें कार्य करीत आहे असेंच म्हणावें लागेल. 'लीग ऑफ नेशन्स'च्या वेळींच असल्या एका स्वतंत्र शाखेची आवश्यकता पटली होती. निरनिराळ्या राष्ट्रांना त्यांच्या आर्थिक व सामाजिक समस्या सोडविण्याच्या प्रयत्नांत युनो मार्गदर्शन व प्रत्यक्ष मदत करीत असते. तंत्रज्ञ पाठविणें, विद्यार्थ्यांना उच्च शिक्षणासाठीं फेलोशिप्स देणें, अनेक महत्त्वाच्या प्रश्नांवर संशोधन करून त्याचे निर्णय प्रसिद्ध करणें, निरनिराळ्या प्रश्नांवर अधिकारी व्यक्तींच्या परिषदा, अभ्यासवर्ग, व्याख्यान-माला योजणें — अशीं अनेक कामें झालीं आहेत व होत आहेत. या मंडळाच्या नेतृत्वाखालीं विशिष्ट कार्य करणाऱ्या १३ संस्थांतर्फे अनेक कामें केलीं जात आहेत. उदा०, जागतिक आरोग्य-संघटने-तर्फे बी. सी. जी. लस टोंचून क्षयाचा प्रतिबंध करणें; मलेरियानियंत्रण; डी. डी. टी., पेनिसि-लिनचे कारखाने काढण्यास मदत करणें; लहान बालकांना व गरोदर स्त्रियांना दूध पुरविणें; अन्न व शेतकी संघटनेतर्फे दुष्काळी देशांना प्रत्यक्ष मदत; उत्पादन वाढविण्यासाठीं तंत्रज्ञांकडून सप्रयोग शिक्षणवर्ग वगैरे. युनेस्कोतर्फे विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ति, कलांना उत्तेजन जागतिक बँक व आंतर-राष्ट्रीय फंडाकडून मागासलेल्या राष्ट्रांना आर्थिक प्रगतीसाठीं देणग्या व लांब मुदतीचीं व कमी व्याजाचीं कर्जें देणें इत्यादि कार्यें अत्यंत महत्त्वाचीं असूनहि त्यांना योग्य प्रसिद्धि लाभलेली नाहीं. **आर्थिक व सामाजिक मंडळाचें** संपूर्ण वार्षिक अधिवेशन होऊन जातें पण वृत्तपत्रांत त्याबद्दल एक ओळहि येत नाहीं. सुरक्षामंडळांत रशियानें एक व्हेटो वापरला कीं प्रत्येक वृत्तपत्रांत त्याला अग्रस्थान मिळतें. वास्तविक आर्थिक सामाजिक मंडळाचें कार्य सुरक्षा








–मंडळा'च्या कामाहून कमी महत्त्वाचें मानण्याचें कारण नाहीं. उलट, तें कार्य व्यवस्थित झाल्यास युद्धाचीं जीं मूळ कारणें दारिद्य, रोगराई, उपासमार, अज्ञान इत्यादि नष्ट होऊन सुरक्षा–मंडळाची गरजच उरणार नाहीं. याच आ. सा. मंडळानें मानवी हक्क सनद तयार केली व मान्य केली. मंडळानें समाजांतील स्त्रियांचें स्थान व त्यांचे हक्क यांवर विचार केला आहे, वेठीच्या मजुरीची पद्धत, गुलामगिरी, वेश्याव्यवसाय इत्यादि अनेक सामाजिक महत्त्वाच्या प्रश्नांवरहि विचार केला आहे. मानवी-हक्क-सनद युनोनें १० डिसेंबर १९४८ रोजीं मान्य केली व ती आज सर्व राष्ट्रांसमोर आदर्श म्हणून आहे. परंतु त्यांतील सर्व हक्क प्रत्येक सरकारनें आपल्या नागरिकांना द्यावेत असें बंधन नाहीं. त्यांतील किमान कलमें प्रत्येक राष्ट्रावर बंधनकारक करावींत असा विचार गेलीं दोन वर्षें चालू आहे. स्त्रियांच्या राजकीय हक्कांची सनद बंधनकारक करण्यांत आली आहे. त्यावर २५ राष्ट्रांनीं सह्या केल्या आहेत. युनोच्या परतंत्र प्रदेशासाठीं स्थापन झालेल्या विश्वस्तमंडळांतहि ११ विश्वस्त प्रदेशांच्या आर्थिक, सामाजिक व राजकीय उन्नतीसाठीं प्रयत्न चालू आहेत. विश्वस्त-कारभाराचें उद्दिष्ट म्हणून 'स्वयंशासनाचा हक्क किंवा पूर्ण स्वातंत्र्य' असें मान्य केलें असून अत्यंत सावकाश कां होईना पण त्या दिशेनें वाटचाल चालू आहे. अ-स्वयंशासित ( Non-self-governing Territories ) राष्ट्रांतील जनतेच्या गाऱ्हाण्यांना, अर्जांना या मंडळांत स्थान मिळतें. त्यांवर विचार केला जातो. युनोतर्फे त्या प्रदेशांत पहाणी-साठीं मंडळें पाठविण्यांत येतात. त्यांनीं केलेल्या पाहणीचे अहवाल प्रसिद्ध करण्यांत येतात. त्यावर विचार केला जातो. आ. सा. मंडळांत व विश्वस्त-मंडळांत कोणत्याहि राष्ट्राला व्हेटोचा अधिकार नाहीं. सर्व निर्णय साध्या बहुमतानें घेतले जातात. व्हेटोमुळेंच युनो अयशस्वी झाली असें म्हणणारांनीं या दोन मंडळांतील कार्याचा विचारच केलेला नसतो. याहि मंडळाच्या कार्याला वृत्तपत्रांत योग्य स्थान न मिळाल्यानें तें सामान्य जनतेपर्यंत पोचविलें जात नाहीं.

## सनद–पुनर्घटना शक्य आहे काय ?

सर्वसाधारणपणें गेल्या दहा वर्षांत युनोनें इतकें काम केलें आहे कीं युनोच्या आवश्यकतेबद्दल कोणालाहि शंका न यावी. युद्ध नको असेल तर युनो टिकविली पाहिजे हें आतां सर्वमान्य झालें आहे. कितीहि मोडकळीस आला असला तरी यूनोचा हा एकच पूल रशिया-अमेरिकेला जोडूं शकतो. त्यामुळें आतां विचारवंत सनद-पुनर्घटने-संबंधीं विचार करूं लागले आहेत. या विषयाचा विचार करतांना कांहीं प्रश्न उपस्थित होतात : त्यांच्या उत्तरावरच सनदपुनर्घटनेचें भवितव्य अवलंबून आहे. सनदेच्या पुनर्घटनेचा विचार करतांना, ती पुनर्घटना शक्य आहे काय ? शक्य असल्यास ती करणें इष्ट व आवश्यक आहे काय ? या प्रश्नांचा विचार केला पाहिजे.

प्रथम आपण सनदबदल शक्य आहे का याचा विचार करूं. या प्रश्नासंबंधी सनदेच्या १०८ व १०९ या कलमांत तरतूद आहे. सनदेच्या १०८-व्या कलमाप्रमाणें

( १ ) जनरल असेंब्लीच्या सर्व सभासदांपैकीं ⅔ सभासदांनीं सनदबदलाला मान्यता दिली पाहिजे व.

( २ ) सुरक्षा–मंडळांतील कायम प्रतिनिधींनीं ( व्हेटोचा अधिकार असलेल्या राष्ट्रांनीं ) व जनरल असेंब्लीच्या ⅔ सभासद राष्ट्रांनीं आपापल्या राष्ट्रघटनेनुसार या फेरफाराला मान्यता दिली पाहिजे. यानंतर ही घटनादुरुस्ती सर्व सभासद-राष्ट्रांना, ज्यांनीं विरोधी मतें दिलीं असतील त्यांना सुद्धां बंधनकारक होईल.

याशिवाय १०९ व्या कलमाप्रमाणें आणखी एक पर्याय आहे तो असा :



अनुक्रमणिका






( १ ) घटनेंत फेरबदल करण्याच्या विचारासाठीं असेंब्लीचे ⅔ सभासद व सुरक्षामंडळाचे कोणतेहि सात सभासद यांच्या अनुमतीनें जागा व तारीख ठरवून सर्व सभासद-राष्ट्रांचीं एक परिषद् बोलवावी;

( २ ) या परिषदेंत ⅔ सभासदांना घटनाबदल सुचवितां येईल. मात्र तो अधिकृत होण्यासाठीं ५ बडीं राष्ट्रें मिळून ⅔ सभासदराष्ट्रांनीं आपापल्या राष्ट्रघटनेनुसार त्याला मान्यता दिली पाहिजे.

( ३ ) अशी परिषद् युनोच्या दहाव्या अधिवेशनापर्यंत म्हणजे १९५५पर्यंत भरविली गेली नाहीं तर दहाव्या अधिवेशनाच्या कामकाजपत्रिकेंत ' परिषद् भरविण्यासंबंधीं प्रश्नाचा विचार ' या विषयाचा समावेश होईल. सुरक्षामंडळाचे कोणतेहि सात सभासद व असेंब्लीचें साधें बहुमत (५१%) यांना परिषदेसंबंधीं निर्णय घेता येईल.

( ४ ) अशा परिषदेंत घटनादुरुस्तीचा विचार होईल.

वरील कलमें वाचलीं तर सनददुरुस्ती किती अवघड किंबहुना अशक्य आहे याची कल्पना येईल. येत्या दहाव्या अधिवेशनांत यासंबंधीं चर्चा होईल व १९५६ मध्यें परिषद् बोलवावी असेंहि ठरण्याचा संभव आहे. पण त्या परिषदेंतून कांहीं विशेष निष्पन्न होईल असा संभव नाहीं. कारण आपल्या धोरणाच्या आड येईल अशा कोणत्याहि बदलास बडीं राष्ट्रें पाठिंबा देणें शक्य नाहीं. मग हा परिषद् बोलावण्याचा खटाटोप तरी कां करावयाचा ? – याचें उत्तर असें कीं या परिषदेंतील चर्चेमुळें जागतिक लोकमत तयार होईल. प्रत्येक राष्ट्राची युनोवरील निष्ठा जागतिक जनमनाला सुस्पष्टपणें तपासतां येईल. एवढाच या परिषदेंतून फायदा होईल. याचा अर्थ असा कीं सनदेची पुनर्घटना शक्य आहे काय या प्रश्नाचें उत्तर नकारार्थी म्हणजे ' शक्य नाहीं ' असेंच द्यावें लागेल.

## कोणते बदल हवेत ?

या नंतरचा दुसरा प्रश्न म्हणजे सनदेंत कोणते बदल होणें इष्ट व आवश्यक आहे ? अशा बदलांची मोठी यादीच देतां येईल. उदा०—व्हेटो. यासंबंधीं आपणास असें म्हणतां येईल कीं व्हेटो अजिबात नष्ट होणें सध्यां शक्य नाहीं, कारण जागतिक परिस्थितीचें व्हेटो हें सत्यदर्शन आहे. तेव्हां निदान एवढें तरी व्हावें कीं,

(१) ज्यावर व्हेटो वापरतां येतो त्या महत्त्वाच्या व बिनमहत्त्वाच्या विषयांची यादी केली जावी.

(२) उरलेल्या विषयांपैकीं अमुक विषय महत्त्वाचा कीं साधा हें ठरविण्यास सध्याप्रमाणें व्हेटोचा उपयोग केला जाऊं नये. कोर्टाकडे विचारणा करण्यांत यावी.

( ३ ) सुरक्षामंडळांतील कायम सभासदांची संख्या वाढविली जावी. नवचीनला प्रतिनिधित्व मिळावें. श्री. ट्रिग्वे ली यांनीं लिहिलेल्या ' शांततेप्रीत्यर्थ' ('In the Cause of Peace') या पुस्तकांत पान ४३३ वर त्यांनीं असें मत प्रदर्शित केलें आहे कीं " सुरक्षामंडळांतील कायम सभासदांची संख्या वाढविण्याचें ठरल्यास आशियातर्फे भारताला अग्रस्थान द्यावें. माझ्या या मताच्या पुष्ट्यर्थ अधिक पुरावे सादर करण्याची जरूरी नाहीं इतकें तें स्वयंसिद्ध आहे." त्यांच्या या मताप्रमाणें भारताला सुरक्षा-मंडळावर प्रतिनिधित्व मिळावें.

( ४ ) व्हेटोचा अधिकार असलेल्या सर्व सभासदांनीं असें जाहीर करावें कीं, शांततेच्या मार्गानें प्रश्न सोडविण्याच्या प्रयत्नांत व नवीन सभासदत्वाच्या प्रश्नांत व्हेटोचा उपयोग केला जाणार नाहीं, एवढेंच नव्हे तर सर्वच वेळीं व्हेटो टाळण्याचा आटोकाट प्रयत्न केला जाईल.

युनो खऱ्याखुऱ्या अर्थानें जागतिक संघटना व्हावी यासाठीं इतर कोणत्याहि गोष्टींचा विचार न







करतां केवळ चौथ्या कलमाप्रमाणें, ज्यांना इच्छा असेल त्यांना सभासदत्व दिलें जावें. सध्यां त्या राष्ट्राच्या सरकारची राजकीय विचारसरणी वगैरे सनद-बाह्य गोष्टींचा प्रश्न मध्यें आणून सभासदत्व अडविलें जात आहे. सर्व स्वतंत्र राष्ट्रांना सभासदत्व आपोआप मिळावें अशी व्यवस्था व्हावी. दुसऱ्या महायुद्धांतील शत्रुराष्ट्रांशीं तह होऊन, त्यांची फाळणी रद्द होऊन, त्यांना पूर्ण सभासदत्व मिळावें.

ऑस्ट्रियाशीं नुकताच तह होऊन त्याची फाळणी रद्द झाली आहे पण त्याला संयुक्त-राष्ट्राचें सभासदत्व मिळालेलें नाहीं. जर्मनीशीं अजून तहच झालेला नाहीं. त्यामुळें फाळणी कायम आहे. इटलीला युनोचें सभासदत्व प्राप्त झालेलें नाहीं. जपानशीं अमेरिकेनें व इतर राष्ट्रांनीं केलेल्या तहास रशियानें संमति दिलेली नाहीं. जपानहि युनोचा सभासद नाहीं. आंतरराष्ट्रीय कोर्टाचें अधिकारक्षेत्र व शक्ति वाढविण्यांत यावी. आंतरराष्ट्रीय कायद्याचें कलमवार लिखाण व्हावें. कोर्टाचे निर्णय मान्य करण्याचें बंधन सर्व राष्ट्रांनीं पाळावें. आर्थिक व सामाजिक मंडळाचें महत्त्व वाढविलें जावें. युनोच्या अंदाज-पत्रकांतील खर्चाचा मोठा वांटा या मंडळाच्या कार्याला मिळावा. जगांतील सर्व परतंत्र प्रदेश विश्वस्त प्रदेश म्हणून जाहीर केले जावेत व युनो-तर्फे प्रगत अशा कांहीं राष्ट्रांनीं त्यांच्या राज्यकार-भाराची जबाबदारी स्वीकारावी. मानवी-हक्क-सनद प्रत्येक सरकारावर बंधनकारक ठरावी. जनरल असें-ब्लीचें महत्त्व व अधिकारक्षेत्र वाढवावें. युनोनें दिलेले निर्णय पाळले जातात कीं नाहीं हें पाहण्या-साठीं युनोजवळ सैन्य असावें. – अशा अनेक गोष्टी युनो-सनदेंत असाव्यात असें मांडतां येईल. या सर्व गोष्टींना बडीं राष्ट्रें तयार आहेत असें वाटत नाहीं. आपणांस बदल होणें जरी इष्ट असलें तरी सध्याच्या परिस्थितींत बदल होणें अशक्य आहे. हा सर्व बदल घडून आला म्हणजे आपण जवळ जवळ 'जगाच्या एक सरकारा'पर्यंत पोचलों असें होईल. त्याला जगांतील राष्ट्रें तयार झालीं आहेत असें सध्यां वाटत नाहीं.

## प्रामाणिक अंमलबजावणीची जरूरी

वरील विवेचनावरून असें ध्यानांत येईल कीं सनद-पुनर्घटनेच्या प्रश्नावर परिषद् बोलावली गेली व खूप चर्चा झाली तरी त्यांतून फार मोठे भरीव असे बदल होतील अशी खोटी अपेक्षा बाळगणें योग्य नाहीं. शाब्दिक बदल, बिनमहत्त्वाचे, ज्यांत बड्या राष्ट्रांचे फारसे हितसंबंध गुंतले नाहींत असे कांहीं प्रश्न सुटण्यांत मदत होईल. कदाचित् ज्या १७ राष्ट्रांचे युनो प्रवेशाचे अर्ज अडून पडले आहेत[1] त्यांना एकदम सर्वांना प्रवेश मिळेल, नवचीनच्या प्रतिनिधित्वाचा प्रश्न सुटण्याची फारशी शक्यता नाहीं. नवचीनला युनोंत प्रवेश मिळाल्यास त्याला उतारा म्हणून व पं नेहरूंच्या शांतिदूताच्या भूमिकेमुळेंहि भारताला सुरक्षामंडळांत कायमचें सभासदत्व मिळाल्यास आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं. १०८ व १०९ या कलमांतील अटी वाचल्या तर इतकेंहि होणें किती दुरापास्त आहे याची कल्पना येईल. शेवटीं एकच मार्ग उरतो आणि तो म्हणजे बदलाची अपेक्षा न करतां, आहे हीच सनद जास्तींत जास्त प्रामाणिकपणें राबविण्याचा प्रयत्न करणें. असा प्रयत्न झालेला नाहीं. उदा० २८ व कलम पहा. "28 B – The Security Council shall hold periodic meetings at which

१ फिन्लंड, इटाली, पोर्तुगाल, आयर्लंड, जॉर्डन, ऑस्ट्रिया, सिलोन, नेपाळ, लिबिया, व्हिएटनाम, लाओस व कंबोडिया या बारा राष्ट्रांचे प्रवेशाचे अर्ज रशियाच्या व्हेटोमुळें अडले असून, अल्बानिया, मंगोलियन रिपब्लिक, बल्गेरिया, रूमानिया व हंगेरी या पांच राष्ट्रांचे अर्ज अमेरिकेनें व्हेटो न वापरतां सामान्य मताधिक्याच्या जोरावर अडवले आहेत.



अनुक्रमणिका







each of its members may, if it so desires, be represented by a member of the government or by some other specially designated representative. " २८ व या कलमाप्रमाणें सुरक्षा–मंडळानें आपल्या अधिकृत बैठकींशिवाय आपल्या सर्व सभासदांच्या कांहीं विशेष सभा मधूनमधून भरवाव्या. या परिषदांना त्या त्या राष्ट्रांचे पंतप्रधान, परराष्ट्रमंत्री किंवा त्या सरकारनें मुद्दाम पाठविलेला मोठ्या योग्यतेचा विशेष प्रतिनिधि यांनीं यावें. गेल्या दहा वर्षांत एकदांहि या कलमाचा उपयोग केला गेला नाहीं. सुरक्षामंडळांत जो प्रतिनिधि असतो त्याला एखाद्या अत्यंत महत्त्वाच्या प्रश्नावर आपल्या पंतप्रधान किंवा परराष्ट्रमंत्र्याइतक्या अधिकारवाणीनें वाटाघाटी करतां येत नाहींत. शिवाय सुरक्षा–मंडळाच्या बैठकींत भाषणाच्या कालमर्यादेचा, व्हेटोचा वगैरे अडथळे येतात. सुरक्षा–मंडळाच्या बैठकी खुल्या असल्यामुळें त्यांतील भाषणें सभासदांपेक्षां प्रेसगॅलरीलाच उद्देशून केलेलीं असतात. त्यामुळें कित्येक वेळां प्रश्न सुटण्याऐवजीं तो कुजतो. २८ ब कलमाप्रमाणें बैठकी घेतल्या असत्या म्हणजे अनेक प्रश्न पडद्याआडच्यां चर्चेत सुटले असते. इंडोचायनाच्या प्रश्नावर जिनिव्हा येथें जशी परिषद् भरली होती व तींत ज्याप्रमाणें प्रत्यक्ष वाटाघाटी होऊन तडजोड झाली त्याप्रमाणें या बैठकीहि यशस्वी होण्याची शक्यता होती. 'युनोच्या बाहेर प्रश्न सोडविण्याची प्रवृत्ति युनोचें महत्त्व कमी करते' अशी टीका जिनिव्हा – परिषदेवर युनोच्या सेक्रेटरी-जनरलनीं केली होती. तशी टीका या २८ ब कलमाप्रमाणें भरविण्यांत येणाऱ्या बैठकीवर करतां आली नसती. २८ ब कलम हें एक उदाहरण झालें. अशीं अनेक कलमें आहेत, कीं ज्याचा प्रामाणिकपणें उपयोग केल्यास युनो यशस्वी झाल्याशिवाय राहणार नाहीं.

---

## युनोचें यशापयश

जगद्विख्यात डॉ. आइन्स्टीन यांनीं १९५१ सालीं युनेस्कोविषयीं लिहितांना, **युनोच्या यशापयशाविषयीं** जे विचार प्रकट केले ते आजहि यथार्थ वाटण्याइतके अद्ययावत् आहेत. त्यांच्या त्या विचारांपैकीं कांहीं 'हरिजन' (३।९।५५) वरून अनुवादून पुढें दिले आहेत :

" आंतरराष्ट्रीय सुव्यवस्थेचा एक अल्पसा प्रारंभ म्हणून संयुक्त राष्ट्रसंघाची-यूनोची स्थापना झाली. पण या संघटनेंत फक्त राष्ट्रांच्या शासनसंस्थांचेच प्रतिनिधि एकत्र येऊं शकतात. शासनसंस्थांच्या शिवाय इतर लोकप्रतिनिधींनीं स्वतंत्रपणें येऊन आपल्या प्रामाणिक मतांप्रमाणें वागावयाचें मनांत आणलें, तर त्यांना युनोमध्यें वाव नाहीं. शिवाय, युनोच्या निर्णयाप्रमाणें आपण वागलेंच पाहिजे असें राष्ट्रांवर बंधनहि नाहीं; युनोचे निर्णय अमलांत आणायला युनोजवळ प्रत्यक्ष असें कोणतेंच साधन नाहीं.

" कांहीं राष्ट्रांना सभासदत्व नाकारल्यामुळेंहि युनोची परिणामकारकता कमी झाली आहे. त्या राष्ट्रांना वगळल्यामुळें, युनोच्या आंतरराष्ट्रीय किंवा राष्ट्रातीत (Supra-national) स्वरूपाला बाध आला आहे. तथापि, राष्ट्राराष्ट्रांमधील प्रश्न युनोपुढें काढले जाऊन त्यांची राजरोसपणें चर्चा होते ही गोष्टहि कांहीं कमी महत्त्वाची नाहीं. सामोपचारानें भांडणें मिटविण्याला ती पोषकच आहे. अशाप्रकारें राष्ट्रांच्या मर्यादा उल्लंघून जाणारें, राष्ट्रांतीत असें एक विचार-विनिमयाचें स्थान अस्तित्वांत आहे या जाणिवेमुळें जगांतील लोकांच्या मनांत हळुहळुं असा विचार रुळत जाईल कीं, आपल्या राष्ट्रांच्या हितसंबंधांचें रक्षण करायचें असेल तर तें परस्परांशीं वाटाघाटींच्या द्वारेंच करावें, शस्त्रबळाच्या द्वारें नव्हे.

" लोकांच्या विचाराला अशाप्रकारें इष्ट वळण लागून जो मानसिक परिणाम घडून येण्याचा संभव आहे, तोच युनोचें अत्यंत महत्त्वाचें वैशिष्ट्य होय. जागतिक राष्ट्रसंघ अस्तित्वांत येणें याचाच अर्थ असा कीं माणसांनीं एक नवीन निष्ठा, राष्ट्रसीमांना उल्लंघून जाणारी कर्तव्याची एक नवीन जाणीव आपल्या अंगीं बाणविली पाहिजे. ही नवीन निष्ठा जर खरी परिणामकारक व्हायची असेल तर ती केवळ राजकीय गोष्टींपुरतीच मर्यादित राहून चालणार नाहीं. निरनिराळ्या सांस्कृतिक समूहांनीं परस्परांना समजून घेणें, परस्परांशीं आर्थिक व सांस्कृतिक देवघेव करणें या गोष्टींचाहि त्या निष्ठेंत अंतर्भाव झाला पाहिजे. "

श्री. मोरेश्वर दत्तात्रेय व्रह्मे

# श्री. मो. ग. रांगणेकर आणि रंगभूमि

येत्या २६ आक्टोबर १९५५ ला विजयादशमी-च्या दिवशीं नाट्यनिकेतन ह्या संस्थेला स्थापन होऊन चौदा वर्षे पूर्ण होत आहेत. ह्या चौदाव्या वाढदिवसाच्या निमित्तानें श्री. रांगणेकर व 'नाट्य-निकेतन'चें अभिनंदन करून, 'नाट्यनिकेतन'चें व श्री. रांगणेकरांच्या नाटकांचें केवळ रंगभूमीच्याच दृष्टीनें प्रस्तुत लेखांत धांवतें समालोचन करावयाचें योजिलें आहे.

## रांगणेकरपूर्व रंगभूमि

गंधर्व-नाटक-मंडळी १९३४ च्या सुमारास अस्तं-गत होत होती. 'सावित्री', 'कान्होपात्रा', अमृत-सिद्धि' हीं त्यांचीं शेवटचीं नाटकें. त्याच सुमारास अचार्य प्र. के. अत्रे यांचीं नाटकें बालमोहन-संगीत-मंडळी रंगभूमीवर आणीत होती. अत्रे यांचीं नाटकें रंगभूमीवर आणण्यासाठींच बालमोहनचा उदय झाला, असें म्हटल्यास कांहीं वावगें होणार नाहीं. स्त्रियांच्या भूमिका स्त्रियांनींच कराव्यात ह्या हेतूनें कांहीं कलावन्त एकत्र येऊन 'नाट्यमन्वंतरचा' जन्म झाला. त्यांचें 'आंधळयाची शाळा' हें एकच नाटक गाजलें. पुढें मराठी रंगभूमीच्या दुर्दैवानें 'नाट्य-मन्वंतर' संस्था अस्तंगत झाली. श्री. अत्रे यांचें लक्ष बोलपटांकडे वेधल्यामुळें 'बालमोहन' पोरकी झाली, आणि तिला आपले पडदे गुंडाळावे लागले.

१९३८ ते १९४१ पर्यन्तचा काळ म्हणजे मराठी रंगभूमीच्या ऱ्हासाचा काळ होता. तो मराठी रंगभूमी-चा जणूं संधिकाल होता. महाराष्ट्रांतील रसिक प्रेक्षकां-च्या कानांत बालगंधर्वाचें सुरेल संगीत घोळत होतें. 'करिन यदुमनीं सदना', 'मला मदन भासे', 'सत्य वदे वचनाला नाथा', 'नाथा, नाहीं मी बोलत' हीं गाणीं मनांतल्या गुणगुणून गंधर्वाचें गाणेंच आपण नाटकांत ऐकत आहोंत हें समाधान प्रेक्षक करून घेत होतें. गंधर्व-नाटक-मंडळीचा लोप झाल्यानंतर आणि 'कुलवधू' रंगभूमीवर येण्यापूर्वीचा काळ म्हणजे संगीतप्रधान नाटकांचा काळ नव्हता. नाटकांत गाणीं असल्याशिवाय प्रेक्षक नाटकाला येत नाहींत हें नाटक-कंपन्यांना व नाटककारांना माहीत होतें. म्हणूनच नाटकांत गाणीं होतीं. नाटकांतील नट गाणीं म्हणावयाचे परन्तु तें संगीत नव्हतें. सुरेल संगीत तर नव्हतेंच नव्हतें. 'बालमोहन' नाटक-मंडळी अगर दुसरी कोणतीहि नाटक-कंपनी गंधर्वांनंतर प्रेक्षकांची संगीताची तहान भागवूं शकली नाहीं. कारण त्यांच्याजवळ गोड आवा-जाचा व शास्त्रीय संगीताचा अभ्यास केलेला नटवर्ग नव्हता. त्या त्या नाटकांतील पदें प्रेक्षक नाटक संपल्यावर दरवाज्याबाहेर पडण्यापूर्वींच विसरून जात असत. झाडावर फुललेल्या टपोऱ्या गुलाबाच्या फुलांत आणि कागदी गुलाबाच्या फुलांत जो फरक तोंच बालगंधर्वांनीं म्हटलेल्या पदांत आणि 'बालमोहन'च्या व इतर नाटक-कंपनीच्या नटवर्गांनीं म्हटलेल्या पदांत होता.

बालगंधर्वांना सुरेल संगीताबरोबर उत्कृष्ट अभि-नयाची देणगी होती. शिवाय ते कोणत्याहि भूमिका अत्यंत मन लावून व आत्मीयतेनें करीत. ह्या तीन गोष्टींमुळें दीड-दोन तपें गंधर्वांनीं रंगभूमि गाजवली. एकाद्या संस्थानिकाच्या दिमाखांत त्यांनीं तिला नाच-विलें आणि आपल्याबरोबर खाडिलकर, गडकरी, ह्या नाटककारांचा दिमाख त्यांनीं वाढविला.

## 'नाट्यनिकेतन'चा उदय

रंगभूमीच्या या ऱ्हासकाळीं श्री. रांगणेकरांची लेखणी वृत्तपत्रांच्या लिखाणासाठीं झिजत होती. [illegible] खडखडाटांत त्यांचें मन रमत असलेलें दिसत असलें तरी त्यांच्या लेखणीचें समाधान तेथें होईनासें झालें. रंगभूमीची दुर्दशा त्यांच्या डोळया-पुढें उभी राहिली. रंगभूमीच्या सेवेची तळमळ त्यांना लागली होती. त्यांनीं व श्री. एस्कांबेकर यांनीं 'नाट्य-निकेतन'ची स्थापना सन १९४१ मध्यें केली. आणि १९४१ च्या नोव्हेंबर महिन्यांत [illegible] 'आशीर्वाद'







या नाटकाचा पहिला प्रयोग मुंबईला झाला. मृतप्राय झालेल्या रंगभूमीला 'तिचा उत्कर्ष होवो' असा जणूं 'आशीर्वाद' रांगणेकरांनीं आपल्या नाट्यनिकेतनतर्फे दिला! उन्हाच्या प्रखर तिरिपांनीं तान्हेलेल्या प्रवाश्याला जसा गार पाण्याचा झरा पाहून आनंद होतो, तसाच आनंद, नाटकांची तहान लागलेल्या महाराष्ट्रांतील नाट्यप्रेमी रसिकांना 'नाटयनिकेतन'तर्फे रंगभूमीवर आलेल्या नाटकांनीं दिला.

चित्रपटांत व रंगभूमीवर नांवाजलेले कै. औंधकर, श्री. गजानन जहागीरदार, सौ. ज्योत्स्ना भोळे, चिंतामणराव कोल्हटकर, आशालता, उषा मराठे, विमल सरदेसाई यांच्यासारख्या नटनटींना रांगणेकरांनीं आपल्या 'आशीर्वाद' मध्यें प्रेक्षकांपुढें आणून प्रेक्षकांचीं मनें जिंकलीं. उत्तम अभिनय, रंगभूमीची सुंदर राजवट, सुटसुटीत संवाद व अत्यंत कांटेकोर व व्यवस्थित रीतीनें बसविलेले प्रयोग यामुळें प्रेक्षकांना त्यांचीं नाटकें आवडूं लागलीं. रंगभूमीच्या पडत्या काळांत, थिएटर नाटकांसाठीं मिळणें अत्यंत दूरापास्त होतें त्या काळांत, दोन तासांत, अतिशय स्वस्त दरांत चित्रपट पाहून लोकांचें समाधान होत होतें त्या काळांत,-थोडक्यांत म्हणजे रंगभूमीच्या दृष्टीनें अति प्रतिकूल अशा परिस्थितींत रंगभूमि जगविण्याचा विडा रांगणेकरांनीं उचलला.

## 'कुलवधू'चा पहिला प्रयोग

२२ ऑगस्ट १९४२ रोजीं सकाळीं ९॥ वाजतां मुंबईला रॉयल ऑपेरा हाउसमध्यें उदाच्या धुपानें सर्व वातावरण प्रसन्न झालें. श्री. शेजवलकरांचीं बोटें ऑर्गनवर अगदीं अधर फिरलीं, सावनिक कल्याण रागाचे स्वर निघाले, नांदी झाली अन् मखमलीचा पडदा बाजूला सरला. आपल्याला कांहींतरी नवीन पहावयास मिळणार, गोड गाणीं ऐकावयास मिळणार या आशेनें नाट्यगृह प्रेक्षकांनीं भरून गेलें होतें. रंगभूमीच्या उदयाची प्रभात ते पहावयास आले होते. आतुरतेनें प्रेक्षक नाटक पहात होते. 'कुलवधू' नाटकाचा तो पहिला प्रयोग होता. तीन तासांनीं प्रेक्षक जे बाहेर पडले तें नाटकाची, नाटककाराची, अभिनयाची आणि विशेषतः ज्योत्स्नाबाईंच्या सुरेल गाण्यांची आणि अभिनयाची तोंड भरून स्तुति करीतच.

'कुलवधू' मधील ज्योत्स्नाबाईंची भानुमतीची भूमिका, विमल वैसास यांची पार्वतीची भूमिका आणि नलिनीबाई नागपूरकर यांची सासूची भूमिका या डोळ्यांत भरण्यासारख्या झाल्या. श्री. पंडित यांची बाप्पांची भूमिकाहि चांगली होत असे. 'क्षण आला भाग्याचा', 'बोला अमृत-बोला', 'मन-रमणा मधुसूदना' वगैरे पदांची रांगणेकरांची पद्यरचना, त्यांना मास्तर कृष्णराव यांनीं दिलेल्या चाली, आणि त्या ज्योत्स्नाबाईंच्या गोड गळयांतून निघाल्यानंतर प्रेक्षकांना वेड लागलें नाहीं तरच नवल. गंधर्वानंतर प्रेक्षकांची संगीताची हौस प्रथमच 'कुलवधू'नें भागविली.

भूमिकेशीं तादात्म्य पावणें, आत्मीयतेनें भूमिका करणें, सहजगत्या अभिनय करणें हें तर बालगंधर्वाप्रमाणें ज्योत्स्नाबाईंचें वैशिष्टय आहे. त्याबरोबरच सुरेल आवाजाची व ढंगदार पद्धतीनें पदें म्हणण्याची त्यांना देणगी आहे. आणि आज 'आशीर्वाद' पासून ते 'राधामाई'पर्यंत सतत एक तपाहून अधिक त्या रंगभूमीची मनोभावें व एकनिष्ठपणें सेवा करीत आहेत. नाट्यनिकेतनच्या उत्कर्षाला रांगणेकरांच्या नाटकांइतकाच त्यांचाहि वांटा फार मोठा आहे, हें नाकबूल करून चालणार नाहीं. बालगंधर्वानंतर त्यांच्याइतकी रंगभूमीची सेवा इतकी सतत व आत्मीयतेनें कोणीं केली नसेल!

## ध्येयनिष्ठा व व्यवहार यांचा समन्वय

एकाद्या ऋषीप्रमाणें, रांगणेकरांनीं रंगभूमीच्या भरभराटीसाठीं तिला 'आशीर्वाद' दिला आणि एकाद्या 'कुलवधू' प्रमाणें त्यांनीं रंगभूमीची जोपासना केली. एकाद्या निष्णात धन्वंतऱ्याप्रमाणें मृतप्राय झालेल्या रंगभूमीची नाडी त्यांनीं ओळखली आणि कोणती उपाययोजना केली असतां ती जगेल ह्याचा त्यांनीं आराखडा आंखला. समाजाला रुचेल व पचेल परंतु नाटयकलेची हानि होणार नाहीं याची काळजी घेऊन त्यांनीं अत्यंत व्यवहारीपणानें 'नाट्यनिकेतन' संस्था चालविली आहे.

बालगंधर्वांचे वैभवाचे दिवस आणि त्यानंतर त्यांना म्हातारपणीं आलेलीं विपन्नावस्था पाहिली म्हणजे कोणत्याहि सहृदय माणसाचे डोळे ओले झाल्याशिवाय रहात नाहींत. ज्या महाराष्ट्रांत त्यांनीं पसाभर मोती जात्यानें भरडले असते त्याच महाराष्ट्रांत त्यांना ओंघळे






भरडण्याची पाळी यावी यासारखा दैवदुर्विलास नाहीं! कलेबरोबर हें सारें व्यवहाराची जोड नारायणरावांना नव्हती म्हणून झालें! इतर नाटक-कंपन्यांबरोबर हें मोठें उदाहरण रांगणेकरांच्या डोळ्यासमोर होतें आणि म्हणूनच अत्यंत काटेकोर पद्धतीनें संस्था चालविण्यास त्यांनीं प्रथमपासूनच आरंभ केला. एखादी सुगृहिणी जशी आपला संसार कोणत्याहि प्रकारचा उणेपणा न दिसतां काटकसरीनें करते त्याचप्रमाणें रांगणेकर संस्था चालविण्याचा कटाक्षानें प्रयत्न करितात.

त्यांच्या 'नाट्यनिकेतन'मध्यें हजेरीपटावर फालतू माणसांचा भरणा सांपडणार नाहीं. पगार जर वेळेवर दिला नाहीं तर नटांचें लक्ष्य जोड-धंद्याकडे जातें आणि अभिनयाच्या दृष्टीनें ते एकनिष्ठेनें कंपनीची सेवा करीत नाहींत ही त्यांची भावना होती. त्यामुळें त्यांनीं 'नाट्यनिकेतन' स्थापन झाल्यापासून नटांच्या योग्यतेप्रमाणें पुरेपूर पगार दिला. अर्थात् चित्रपटांतील नटनटींचा पगार व हा पगार ह्याची तुलना कोणी करणार नाहीं याची मला खात्री आहे.

नाटकांतील नवीन नेपथ्य-रचना व कपडे ते आपल्या स्वतःच्या देखरेखीखालीं करून घेत. अत्यंत आधुनिक पद्धतीची व वास्तववादी नेपथ्य-रचना रांगणेकरांनीं आपल्या प्रत्येक नाटकांतून केली आहे. 'वहिनी', 'अपूर्व बंगाल', 'लिलांव' ह्या नाटकांतील मूळचीं सेटिंग्ज ज्या प्रेक्षकांनीं पाहिलीं असतील त्यांना ही कल्पना येईल. थिएटरमधील नाटकांच्या प्रयोगाच्या वेळेस नटांशिवाय व काम करणाऱ्या माणसाशिवाय इतरांसाठीं चहाकॉफीचा खर्च प्रत्येक वेळेस विनाकारण ते करीत नाहींत. त्याबरोबरच संस्थेंतील प्रत्येकाला ते माणुसकीनें व आदरानें वागवतात. मात्र त्याचबरोबर ते मालक व चालक आहेत, ही त्यांच्या मनांतील सुप्त भावना चाणाक्ष माणसाला दिसल्याशिवाय रहात नाहीं. नटनटींची काळजी घेणें, विचारपूस करणें व उत्तम काम करणाराला प्रोत्साहन देणें हें तर त्यांचें वैशिष्ट्य आहे. 'नाट्यनिकेतन'च्या अंतरंगांत फिरावयाचे बरेच प्रसंग मला आले. संस्थेंतील नटांना श्री. रांगणेकरांविषयीं आदरयुक्त भीति वाटत असलेली मला दिसली. तितकाच मोकळेपणाहि दिसला.

सुशिक्षित व चांगल्या घरंदाज कुटुंबांतील स्त्रियांना त्यांच्या कंपनींत काम करतांना संकोच वाटत नाहीं, त्यांची स्वतःची व त्यांच्या कंपनींतील नटांची वागणूक त्या दृष्टीनें अत्यंत आदरणीय अशी असल्यानें, त्यांच्या कंपनींतील नटांना व नटींना नाटक्याचें स्वरूप कधीं आलें नाहीं. जनता त्यांच्याकडे आदरानें व कौतुकानें पहात असे. ही कांहीं सामान्य गोष्ट नव्हे. पूर्वीच्या नाटक-कंपन्यांतून स्त्रियांची भूमिका पुरुषच करीत असल्यानें हा संमिश्र स्त्रीपुरुषसंच कंपनीबरोबर फिरण्याचा प्रसंग उद्भवला नव्हता. नवीन नवीन सुशिक्षित पांढरपेशा वर्गांतील स्त्रियांना त्यांनीं अभिनय शिकविला व आपल्या 'नाट्यनिकेतन'तर्फे पुढें आणलें. 'आश्रित'मध्यें शान्ता जोग, 'रंभा'मध्यें सुधा अमोणकर व 'लिलांव'मध्यें प्रभा अत्रे यांचीं नांवें त्या दृष्टीनें प्रामुख्यानें घेतां येतील.

## कुशल आणि सहृदय दिग्दर्शक

नवीन नाटक बसवितांनासुद्धां रांगणेकरांचें लक्ष उत्तम प्रयोग होण्याकडे जितकं असतं तितकंच, उत्पन्न किती येईल, कंपनी तोट्यांत येईल का नफ्यांत जाईल याकडेहि असतं. असं करतांना अव्यवहार्य खर्च, चैनीसाठीं खर्च ते करीत नाहींत. व प्रयोगाला कमीपणा येईल अशी काटकसरही ते करीत नाहींत. पृथ्वीराज यांनीं जेव्हां रांगणेकरांच्या कंपनींतील पटावरील नटांची व कामगारांची संख्या पाहिली तेव्हां इतक्या कमी लोकांत ते इतकी चांगल्या रीतीनें संस्था कशी चालवतात, याचेंच त्यांना आश्चर्य वाटलें.

नवीन नाटकाचा प्रयोग उत्तम रीतीनें व व्यवस्थितपणें मांडण्याचें काम रांगणेकर फारच कसोशीनें करतात. प्रत्येक पात्राची हालचाल, प्रवेश करणें, बाहेर जाणें, उभें राहणें व इतर बारीक-सारीक बाबतींत सुद्धां ते नटांकडून कामें गिरवून घेतात. त्यांच्या नटांना प्रॉम्प्टिंग फारसें करावें लागत नाहीं.

त्यांनीं आपल्या संस्थेंतून जुन्या व नव्या नटनटींना विशिष्ट भूमिकेंत नांवारूपाला आणलें. 'वहिनी' नाटकांत पु. ल. देशपांडे यांना वल्लभाच्या भूमिकेंत, रामचंद्र वर्दे यांना रामभाऊंच्या भूमिकेंत, 'कुलवधू' मध्यें विमल घैसास यांना पार्वतीच्या भूमिकेंत, पंडित यांना बाप्पांच्या भूमिकेंत त्यांनीं पुढें आणलें. व या सर्वांना नटनटी म्हणून एक विशिष्ट दर्जा प्राप्त झाला. श्री. मामा पेंडसे व ... हे उत्तम










स्वभावचित्रण प्रेक्षकांपुढें हुबेहुब ठेवणारे उत्तम नट ( Characcter Actor ) म्हणून रांगणेकरांना आवडतात.

स्नेहप्रभा प्रधान यांची ' राणीचा बाग ' नाटकांतील आंधळया उमेची भूमिका अमर आहे. त्या रंगभूमीवरील उत्कृष्ट अभिनेत्री आहेत. पहिल्या अंकांतील शेवटचा अभिनय, " डोळे आल्यानंतर मग जग कसं दिसेल ? " ह्या वेळचा त्यांचा अभिनय आणि दुसऱ्या अंकांतील डोळे आल्यानंतरचा आरंभाचा अभिनय - हे उत्कृष्ट अभिनयाचे नमुने म्हणून समजावयास हरकत नाहीं. अर्थात् रांगणेकरांचें दिग्दर्शनही याला कारणीभूत आहेच. पण जात्याच स्नेहप्रभा ह्या कलावन्त असल्यानें त्यांची अभिनयनिपुणता प्रेक्षकांच्या डोळयाचें पारणें फेडते. आपल्या अंतःकरणांतील अत्यंत बारीक-सारीक भावनांचा अभिनिवेश त्या आपल्या चेहऱ्यावरील सूक्ष्म छटांनीं व शरीराच्या हालचालींनीं इतक्या उत्कृष्टपणें दाखवितात कीं त्यामुळें तंत्राच्या दृष्टीनें अत्यंत सदोष असें ' राणीचा बाग ' हें नाटक प्रेक्षकांना तीन तास पहावेंसें वाटतें, नव्हें अनेक वेळां पहावेंसें वाटतें ! त्यांतील उमेची भूमिका पडली कीं नाटकच पडलं. म्हणून सामान्यतः हौशी कलावन्त व शाळा-कॉलेजचीं मुलं-मुली त्या नाटकाच्या वाटेला फारसे जात नाहींत.

ह्याच नाटकांत स्नेहप्रभा प्रधान ह्यांच्याबरोबर कुरूप नवऱ्याची भूमिका करण्याचें कठीण काम रांगणेकरांनीं **श्री. श्रीपाद जोशी** यांना दिलें. प्रधान सारख्या कसलेल्या नटीबरोबर श्री. जोशी यांच्यासारखे त्या मानानें सामान्य नट कसे टिकतील ? अन् रंगभूमीवर जर दोघांच्या अभिनयांत तफावत पडती तर नाटक हटकून पडतें ! परंतु स्नेहप्रभाबाईंनीं जोशी हे कमी दर्जाचे नट आहेत असें न मानतां, भूमिका उत्तम व्हाव्यात म्हणून अगदीं मनापासून, तादात्म्यानें व मोकळेपणानें त्या भूमिका करावयाच्या. आंधळया उमेनें नाटकाचा प्रयोग चालू असतांना आपल्या पतीच्या खांद्यावर मान सहज टाकून दिली. श्री. जोशी जरा चपापले. कारण, आपण सामान्य नट एका नामवंत नटीबरोबर काम करीत आहोंत, ही भावना त्यांच्या मनांत सतत होती. परन्तु स्नेहप्रभा प्रधान यांनीं दाखविलेल्या या मोकळेपणामुळें श्री. जोशी यांचा अभिनय चांगला व्हावयाचा. अर्थात रांगणेकरांचें दिग्दर्शनहि त्याला कारणीभूत होतेंच. 'राणीचा बाग' या नाटकाचे एकदोन प्रयोग झाल्यानंतर, एकदां रंगपटामागें श्री. जोशी आले असतांना त्यांच्या खांद्यावर हात ठेवीत रांगणेकर म्हणाले: "जोशी, तुम्ही छान काम केलंत, आजपासून तुमचा पगार वाढविला आहे." हें ऐकून जोशी यांना आनंद झाला असल्यास नवल नाहीं. स्नेहप्रभा प्रधान यांची ' राणीच्या बागें'तील उमेच्या भूमिकेसारखीच ' झुंजारराव' नाटकांतील कमळजेची भूमिका देखील अभिनयाच्या दृष्टीनें अति उत्कृष्ट होत असे.

नुसतें नाटक चांगलें असून चालत नाहीं. त्याचा प्रयोग उत्तम व्यवस्थित झाल्याशिवाय तें प्रेक्षकांना आवडत नाहीं. त्यासाठीं भूमिका समजावून घेऊन त्या भूमिकेशीं समरस होऊन काम करणारे चांगले नट, नटी पाहिजे असतात. दिग्दर्शन चांगलें असलें पाहिजे. रांगणेकर त्या दृष्टीनें उत्तम दिग्दर्शक आहेत. सर्व पात्रांचें काम तुटक तुटक न होतां, सामुदायिक रीत्या रंगभूमीवर चांगलें झालें म्हणजे प्रयोग चांगला होतो. नाहींतर जरी नामांकित नट व नटी असल्या व त्यांत जर रंगभूमीवर पात्रांच्या कामांत एकसूत्रीपणा (Unity) वाटला नाहीं तर तें नाटक कितीहि उत्तम असो, काम करणारे नट कितीहि चांगले असोत, त्यांत विस्कळितपणा दिसतोच व नाटकाचा प्रेक्षकांच्या मनावर जो एकत्रित परिणाम व्हावयास पाहिजे तो होत नाहीं. हा दोष प्रामुख्यानें आपणांस ' नाईट ' वर काम करणारे नट, नटी ज्या नाटकांत धंदेवाईक कॉन्ट्रॅक्टर एकत्र आणतात, त्यांत दिसतो. मग त्यांत शान्ता आपटे, नानासाहेब फाटकासारखे कसलेले नट असून सुद्धां प्रयोगाचा एकूण परिणाम चांगला होत नाहीं. उलट, रांगणेकरांच्या नाटकांत त्या मानानें सामान्य प्रतीचे नट असतांनासुद्धां प्रयोगाच्या व्यवस्थितपणामुळें त्यांत दोष काढावयास जागा रहात नाहीं.

आचार्य अत्र्यांप्रमाणेंच रांगणेकरांच्या नाटकांचीं नांवेंसुद्धां नावीन्यपूर्ण व आकर्षक आहेत. उदाहरणार्थ, ' आशीर्वाद ', ' कुलवधु ', जयजयकार ' व ' लिलांव '. प्रेक्षकांना नवीन नाटकें लागल्याबरोबर नवीन नाटकाच्या नांवांत सुद्धां आकर्षण वाटलें पाहिजे. नाहींतर त्याचासुद्धां परिणाम ... नाटका-








च्या उत्पन्नावर एखादे वेळेस होतो. श्री. मामा वरेरकर यांच्या 'अ-पूर्व बंगाल' नाटकाचा पहिला प्रयोग पहावयाससुद्धां प्रेक्षकांनीं इच्छा दाखविली नाहीं. त्याला जीं अनेक कारणें आहेत, त्यांपैकीं त्या नाटकाचें अत्यंत काव्यहीन नांव हेंहि एक कारण आहे, असें मला वाटतें. 'अ-पूर्व बंगाल' या नाटकाच्या पहिल्या प्रयोगाला मी हजर होतों. भारतीय विद्याभवनांतील खुर्च्या रिकाम्या होत्या. परंतु रांगणेकर व त्यांचें 'नाट्यनिकेतन' यांची रंगभूमीवरील उत्कट निष्ठा एवढी कीं अल्प श्रोतृ-संख्येमुळें प्रयोगांत कोणताहि कमीपणा दिसून आला नाहीं.

रांगणेकरांनीं '**आशीर्वाद**', '**कुलवधू**', '**नंदनवन**', '**कन्यादान**', '**अलंकार**', '**माझें घर**', '**वहिनी**', '**एक होता म्हातारा**', '**कोणे एके काळीं**', '**माहेर**', '**रंभा**', '**जयजयकार**', आणि '**लिलांव**' अशीं एकूण तेरा नाटकें व '**सतरा वर्षें**', '**तुझं माझं जमेना**', '**फरारी**', '**आजचे संसार**' आणि '**बडे बापके बेटे**' अशा पांच नाटिका लिहून रंगभूमीवर आणल्या. त्याशिवाय श्री. मो. द. ब्रह्मे यांचें '**आश्रित**', डॉ. वर्टी यांचें '**राणीचा बाग**', श्री. मामा वरेरकर यांचें '**अ-पूर्व बंगाल**' व श्री. दांडेकर यांचें '**राधामाई**' हीं इतर नाटककारांचीं नाटकें नाट्यनिकेतनतर्फे रंगभूमीवर आणलीं.

'कुलवधू', 'माझें घर', 'एक होता म्हातारा', 'वहिनी' हीं नाटकें व 'सतरा वर्षें', 'तुझं माझं जमेना' ह्या नाटिका रंगभूमीवर गाजल्या. तर 'अलंकार', 'माहेर' व 'जयजयकार' हीं नाटकें रांगणेकरांचींच आहेत कीं नाहींत हें वाचक व प्रेक्षक विसरून गेले. ह्या नाटकांचा प्रकाश रंगभूमीवरील विजेच्या लखलखाटाबाहेर प्रेक्षकापर्यंत जाऊं शकला नाहीं.

## नाटकांचे विषय व नाट्यतंत्र

रांगणेकरांची नाटक लिहिण्याची एक नवीनच प्रथा आहे. कथानकाची गुंफण अगर जुळवाजुळव ते मनाशीं कधींच प्रथम करीत नाहींत. स्वभावचित्रणाला प्राधान्य देऊन त्यावरून ते नाट्यप्रसंग निर्माण करतात व त्यांची मनाशीं जुळवाजुळव झाली कीं नाटक लिहावयास घेतात. त्यामुळें कथानकाला गौण स्थान आलें आहे. त्यांच्या सर्व सामाजिक नाटकांतून विशिष्ट मध्यम-वर्गीय समाजांतील जीवनच रंगभूमीवर आलें आहे. त्यांत वैचित्र्य अगर विविधता नाहीं. रांगणेकरांनीं निवडलेल्या कथानकांची मर्यादाच मुळीं फक्त सुशिक्षित मध्यमवर्गीय समाजांतील जीवनांत दिसणाऱ्या सुख-दुःखांपुरती आहे. त्या समाजांत आर्थिक, वैवाहिक, अगर शैक्षणिक विषमतेमुळें दिसणारा कलह व त्यामुळें न कळत दुःखी होणारे संसार रांगणेकरांनीं प्रेक्षकांपुढें ठेवले आहेत. त्यांचीं नाटकें पाहिल्यानंतर प्रेक्षकांना वाटतें कीं, "खरंच असल्या वर-वर दिसणाऱ्या सामान्य गोष्टींनीं संसारांत दुःखं निर्माण होतात खरींच!" प्रौढ सुशिक्षित कुमारिकांचा प्रश्न 'आशीर्वाद' नाटकांत, एकत्र हिंदु कुटुंबांतील कर्त्या माणसांची हट्टी वागणूक असल्यामुळें कुटुंब कसें विस्कळित होतें हें 'माझें घर' मध्यें, तर हौशी व खोट्या श्रीमंतीच्या अभिमानांत वाढलेल्या व उद्दामपणानें वागणाऱ्या मम्मीच्या वागण्याचा परिणाम इतर मुलांवरहि कसा होतो व त्यामुळें खोट्या कल्पना मुलें उराशीं कशीं बाळगतात हें 'लिलांव' मध्यें-अशीं विविध चित्रें रांगणेकरांनीं रेखाटलीं आहेत. त्यांच्या नाटकांतील विषय अगर त्यांचीं नाटकें कधींहि अमर होणार नाहींत. कारण तीं तात्कालिक सामाजिक जीवनावर आधारलेलीं आहेत. कालान्तरानें समाज झपाट्यानें बदलेल. आणि त्या बदललेल्या समाजानें जर त्या वेळेस त्यांचीं नाटकें वाचलीं व पाहिलीं तर तीं त्याला आवडतीलच असें सांगतां येणार नाहीं.

ज्या वेळेस नाटककार प्रेक्षकांच्या, विशेषतः स्त्री – प्रेक्षकांच्या कोमल व हळुवार अंतःकरणांना हलवितो व त्यांची सहानुभूति आपल्या नाटकांतील एखाद्या पात्राला कायमची मिळवितो, तेव्हां तें नाटक अधिक काळ प्रेक्षकांच्या व वाचकांच्या स्मृतींत राहतें. त्या दृष्टीनें गडकऱ्यांचें 'एकच प्याला', अत्रे यांचें 'उद्यांचा संसार' हीं नाटकें दुःखान्त असूनसुद्धां लोकांना पुन्हां पुन्हां पहावींशीं व वाचावींशीं वाटतात. कारण तीं नाटकें शोकपर्यवसायी आहेत म्हणून नव्हे तर सिंधू, करुणा, नयना, शेखर यांचीं दुःखें आत्यंतिक स्वरूपांत नाटककारांनीं दाखविलीं आहेत. आणि त्यामुळें तीं दुःखें प्रातिनिधिक बाटून प्रेक्षकांच्या डोळ्यांना पाणी आल्याशिवाय रहात नाहीं. हीं नाटकें 'मेलो-ड्रामा' आहेत आणि 'मेलो...रांना







आवडत नाहीं. रांगणेकरांनीं एकहि अत्यंत शोकपर्यवसायी अगर अत्यंत विनोदी नाटक लिहिलें नाहीं.

## नाट्य व संगीत

कांहीं टीकाकारांचा असा समज आहे कीं, सौ. ज्योत्स्नाबाईंचें सुरेल संगीत ज्या नाटकांत आहे तेवढींच नाटकें लोकांना आवडतात. असं असतं तर ज्योत्स्नाबाईंना काम असलेल्या 'अलंकार' व 'राधामाई' ह्या नाटकांचे प्रयोग वारंवार झाले असते. नुसत्या संगीतावर नाटकें जगत नाहींत. नाहींतर बालगंधर्व व मास्तर कृष्णराव हे 'द्रौपदी', 'सावित्री', 'मेनका' ह्या नाटकांत काम करीत असतांनासुद्धां, तीं नाटकें गंधर्वमंडळीची असूनहि, खाडिलकरांनीं तीं लिहिलेलीं असूनसुद्धां लोकादरास पात्र झालीं नाहींत. देवलांची पद्यरचना अत्यंत सुबोध, अर्थपूर्ण व गोड आहे. त्याचप्रमाणें रांगणेकरांच्या नाटकांतील पदें गायला सुबोध व अर्थपूर्ण आहेत. रांगणेकरांनीं आपल्या नाटकांतील पदांनीं भावगीतांना विशिष्ट दर्जा प्राप्त करून दिला आहे. श्री. मास्तर कृष्णराव, व श्री. श्रीधर पार्सेकर यांचें संगीतदिग्दर्शन बऱ्याच नाटकांना लाभलें आहे. म्हणजे त्यांच्या पदांत भावनाहि आहेत, गेयताहि आहे आणि रचना संगीताला उपयुक्त आहे. चित्रपट-संगीतांत ग. दि. माडगुळकरांचीं व नाटकांत रांगणेकरांचीं गीतें बरींच वरच्या दर्ज्यांचीं आहेत.

नाटकाचा प्रयोग उत्तम, लोकांच्या आवडीचा व्हावयास हवा असेल तर नुसता विनोद, नुसतें संगीत किंवा नुसते दुःखद प्रसंग, मग ते कितीहि चांगले असले तरी, चालत नाहींत. ह्या सर्वांची गुंफण, नाट्यतंत्राच्या दृष्टीनें उत्तम व्हावयास पाहिजे. थोडक्यांत म्हणजे जर त्यांत प्रयोगाच्या दृष्टीनें 'नाट्य' नसेल तर तें एखाद्या पौरुष नसलेल्या सुंदर पुरुषासारखें होईल.

'माझें घर', 'वहिनी' व 'लिलांव' नाटकांत ज्योत्स्नाबाईंना काम नाहीं, तरी तीं नाटकें प्रेक्षकांना आवडतात.

## हौशी नाट्यसंघ

आज भारत-सरकार व मुंबई-सरकार नाट्य-कलेला उत्तेजन देण्यासाठीं बराच प्रयत्न योग्य दिशेनें करीत आहेत. मोठीं बक्षिसें उत्तम नाटकांसाठीं व हौशी कलावन्तांच्या प्रयोगासाठीं ठेवलीं आहेत. परन्तु रंगभूमि जर जगवावयाची असेल, तिला पूर्वीप्रमाणें वैभव प्राप्त करून द्यावयाचें असेल, तर नुसतीं बक्षिसें ठेवून चालणार नाहीं. स्टेजवर उत्कृष्ट प्रयोग होण्यासाठीं, कलावंतांप्रमाणेंच रंगभूमीची व्यवस्थाहि उत्तम असावयास पाहिजे. त्याकरितां नाटकाच्या दृष्टीनें उत्तम सजावटीचीं नाट्यगृहें असावयास पाहिजेत. त्यांची आज फार मोठी उणीव आहे. हौशी कलावंतांनीं जर नाटकांत काम करणें हाच व्यवसाय जीवनाच्या दृष्टीनें पतकरावा असें वाटत असेल तर त्यांना आकर्षण वाटेल इतका आर्थिक लाभ त्यांना व्हावयास पाहिजे. असें न झालें तर धंदेवाईक 'नाईट'वर काम करणाऱ्या नटांची संख्या वाढेल आणि कान्ट्रॅक्टर लोक जुनींच नाटकें रंगभूमीवर वारंवार आणतील. कारण त्यांत त्यांचा एक मोठा फायदा म्हणजे नाटककारांना त्यांना कांहींच रक्कम द्यावी लागत नाहीं. प्रेक्षकांचें स्वस्तांत मनोरंजन करून पैसा उकळणें ह्याशिवाय त्यांचा दुसरा विचार नसतो. संगीताच्या वेडामुळें व कांहीं नामवंत नट – नटींच्या नांवामुळें प्रेक्षकांनीं थिएटर भरतें आणि असलीं भरलेलीं नाट्यगृहें पाहिलीं म्हणजे रंगभूमीचा उद्धार झाला, रंगभूमि जगली असा कांहींचा समज होतो. परन्तु हा समज चुकीचा आहे.

वरील प्रकारांचें उदाहरण म्हणून प्रस्तुत लेखकानें प्रत्यक्ष पाहिलेली एक वस्तुस्थिति नमूद करण्यासारखी आहे. जयराम शिलेदार यांनीं काढलेली एक कंपनी कांहीं दिवस नाटकें करीत गांवोगांव फिरत होती. जयराम शिलेदार व प्रमिला जाधव यांच्या या नाटक-कंपनीनें अमळनेरला स्वस्तिक थिएटरमध्यें नाटकें केलीं. त्यांपैकीं 'एकच प्याला' व 'मानापमान' हीं नाटकें मीं पाहिलीं. 'एकच प्याला' नाटकांत सिंधूची भूमिका करणाऱ्या नटीला अभिनय अगर संगीताची फारशी ओळख नव्हती. प्रमिला जाधव यांनीं शरद्‌ची भूमिका केली होती. तळीरामची भूमिका करणारे नट बरे होते. त्यामुळें 'एकच प्याल्यां'तील सिंधूचे व सुधाकराचे गंभीर व महत्त्वाचे प्रवेश त्यांनीं गाळले व तळीरामचे प्रवेश प्रामुख्यानें करून प्रेक्षकांसमोर एक नवीन विनोदी 'एकच प्याला' नाटक उभें केलं. तसेंच 'मानापमान' नाटक रात्रीं ९॥ वाजतां सुरू करून श्री. शिलेदार यांना रात्रीं १२॥ च्या गाडीनें गांवाला जावयाचें होतें म्हणून







रात्रीं १२ वाजतां दोन तासांत संगीत ' मानापमान ' नाटकाचा प्रयोग संपविला. असें झाल्यानंतर रंगभूमीचे व त्या कंपनीचे बारा नाहीं वाजले तरच नवल ! रंगभूमीची एकनिष्ठेनें सेवा करावयाची नसेल तर कोणीं कंपनी काढण्याच्या भानगडींत पडूं नये. मराठी नाटकप्रेमी प्रेक्षकानें मराठी नाटकांचे आणि गुणी नटवर्गाचें कौतुकच केलें आहे. असें असतांना जर त्यांच्याशीं नाटक-कंपनीनें अगर नटांनीं आपलें काम चोखपणें पार पाडण्याच्या कामांत कुचराई अगर प्रतारणा केली आणि त्याचें प्रायश्चित्त म्हणून त्या नाट्यसंस्था व ते नट, नटी रंगभूमीवर नामशेष झाले तर त्यांच्याबद्दल कुणी सहानुभूति दाखविण्याचें कारण नाहीं.

हौशी नाट्यसंस्था नवीन नट व नाटकें रंगभूमीवर आणतील परंतु ते कांहीं गांवोगांव फिरूं शकत नाहींत. त्या त्या गांवांतील लोकांना फक्त त्या गांवांतील नवीन होतकरू नटांचें व नाटकांचें दर्शन होईल. ते नट उत्तम असतीलच आणि त्यांनीं रंगभूमीवर आणलेलें नाटक चांगलें असेलच असें नाहीं. वरील कारणास्तव उत्तम नवीन नटांची व नाटकांची ओळख महाराष्ट्रांतील जनतेला हौशी कलावन्त करून देऊं शकत नाहींत. ह्या गोष्टी धंदेवाईक 'नाट्यनिकेतन'-सारख्या संस्था निघाल्या तरच शक्य आहे. 'नाट्यनिकेतन लिमिटेड' किंवा श्री. बाबूराव पेंढारकर ह्यांच्या 'नव-नाट्यमंदिर लिमिटेड' ह्या सारख्या नाट्यसंस्थांना दरसाल ठराविक रक्कम जर देणगीदाखल सरकारकडून मिळेल तर रंगभूमीची सेवा त्या कंपन्या करूं शकतील. ' नवनाट्य-मंदिर ' ही संस्थासुद्धां एक वर्षापेक्षां अधिक काळ टिकाव धरूं शकली नाहीं.

ह्या दृष्टीनें विचार केल्यास सतत एक तपाहून अधिक काळ रांगणेकरांच्या ' नाट्यनिकेतन ' ह्या एकमेव संस्थेनें मराठी रंगभूमीची सेवा मनोभावें केली आहे. आज अनेक संस्था व नट सरकारनें प्रोत्साहन दिल्यामुळें पुढें येत आहेत. उत्साहाचे दिवस यावयास, ' नाट्यनिकेतन 'नें प्रतिकूल परिस्थितीशीं टक्कर देऊन केलेली प्रगति व दिल्लीपासून ते गोंव्यापर्यंतच्या व मुंबईपासून ते नागपूरपर्यंतच्या मराठी प्रेक्षकांचें केलेलें समाधान हींहि कारणीभूत आहेत, ही गोष्ट विसरून चालणार नाहीं.

असल्या, रंगभूमीशीं एकनिष्ठ असलेल्या चांगल्या धंदेवाईक नाट्यसंस्थांची महाराष्ट्राला जरूरी आहे. त्या दृष्टीनें सरकारनें आपला पैसा खर्च करावयास पाहिजे. चांगले नट-नटी निर्माण होतील यासाठीं एक नमुनेदार आदर्श असें अभिनयाचें विद्यालय काढावयास हवें. त्यासाठीं नव्या व जुन्या नटांच्या व नाटककारांच्या मेहनतीचा व सल्ल्याचा उपयोग सरकारनें करून घ्यावयास हवा. मराठी रंगभूमि चिरकाल टिकेल, तिचा उत्कर्ष होईल, तिचें वैभव वाढेल ह्या दृष्टीनें मुंबई सरकारनें पावलें टाकलीं व पैसा खर्च केला तरच रंगभूमीचें भवितव्य उज्ज्वल होईल. रंगभूमीच्या उत्कर्षासाठीं अर्थात् नुसता पैसा खर्च करून भागणार नाहीं. तो गटबाजीच्या धोक्यांतून सतत अलग राहिला पाहिजे. तरच सरकारनें केलेल्या त्या खर्चाच्या रकमेचें चीज होईल व मराठी रंगभूमीला पूर्ववत् वैभव प्राप्त होईल. उदाचा मंद सुवास सर्वत्र नाट्यगृहांत पसरून प्रेक्षकांचीं अंतःकरणें प्रसन्न झालीं आहेत, ऑर्गनच्या कोमल सुरानीं रसिक मुग्ध होऊन गेले आहेत, खरोखरीचा मखमलीचा पडदा हळूंहळूं वर जात आहे, नटनटींच्या कुशल अभिनयानें प्रेक्षकांचीं हृदयें नाट्यमय तादात्म्याचा अनुभव घेत आहेत, कृतज्ञतापूर्ण अंतःकरणानें जो तो मुक्त कंठानें नटांची व नाटककारांची प्रशंसा करीत आहे, असे रंगभूमीला परत वैभवाचे दिवस लवकर प्राप्त व्हावेत, अशीच सर्व नाट्यप्रेमी रसिकांची कामना असून ते त्या दिवसाची आतुरतेनें वाट पहात असतील यांत शंका नाहीं.

## सौन्दर्यदर्शनीं — !

सौन्दर्यदर्शनीं झालों मी रमश्राण
त्यावरुनि वाटलें ओवाळावा प्राण
इंद्रिया जाहला परमानंद विकारी
अंतरांत घुसला नेत्राचा मृदु बाण
मी उघडया नयनें पाहीं सकल जगाला
' हा अंध भटकतो ' म्हणति न कोणी मजला
परि चर्मचक्षुंना ह्या नच दिसते कांहीं
पृष्ठावर खिळती; जाती ते न तळाला
' ही सुलोचना बघ; आली तरुण मृगाक्षी
हे कमलनयन बघ; सुंदर ती मीनाक्षी '
वानोत कुणी ते मोहक, मादक डोळे
देहाची दृष्टी जाय स्मराच्या भक्ष्यीं
मज यावी दृष्टी बवण्या अंतर्यामीं
दिसतील जेथलीं सद्गुण-रत्नें नामी
त्या सौन्दर्याचें लागो वेड मनाला
कामी ते लोचन नकोत हीन [illegible]







आचार्य शं. द. जावडेकर

# भारतीय संस्कृति आणि महात्मा गांधी

No one truly understands the life and thought of Mahatma Gandhi who imagines that the emancipation of India from foreign rule was the main purpose of his life, or that its attainment was his greatest contribution to the land of his birth. For his kingdom, like that of the Christ or Buddha, was not of this world; and it was the moral emancipation of his countrymen and country-women from the sins of sloth, cowardice, malice and uncharitableness that was his over-riding passion. Nevertheless, unlike these founders of two great religions, Gandhi stepped down from the high plane of spiritual leadership to mingle in the arena of everyday affairs. In that he more nearly resembled the Hebrew prophets who played an active part in the statecraft of their day" — **Lord Pethic-Lowrence.**

धिग् बलं क्षत्रियबलं ब्रम्हतेजो बलं बलम् ॥

लेखाच्या शिरोभागीं लॉर्ड पेथिक-लॉरेन्स यांनीं म. गांधींच्या जीवनकार्याचें वर्णन करतांना त्यांच्या-संबंधीं काढिलेले उद्गार दिले आहेत. त्यानंतर क्षत्रिय-बलाचा धिक्कार करून ब्रम्हतेजोबल हेंच खरें बल आहे अशा अर्थाचें विश्वामित्र ऋषीचें एक वाक्य दिलेलें आहे. लॉर्ड पेथिक-लॉरेन्स आपल्या विवेचनांत म्हणतात कीं हिंदुस्थानला परकीय साम्राज्यापासून मुक्त केलें हीच म० गांधींनीं केलेली आपल्या मातृभूमीची सर्व-श्रेष्ठ सेवा आहे किंवा तेंच त्यांच्या जीवनाचें आद्य उद्दिष्ट होतें असें जे मानितात त्यांना म. गांधींचें जीवन व विचार यांचें खरें ज्ञान झालेलेंच नाहीं. कारण त्यांना जें स्वराज्य हवें होतें तें केवळ भौतिक स्वरूपाचें नव्हतें तर खिस्त व बुद्ध यांच्याप्रमाणें त्यांना आपल्या देशबंधूंचा व देशभगिनींचा नैतिक उद्धार करावयाचा असून जडत्व, भीरुत्व, मत्सर आणि संकुचितवृत्ति या पापांतून त्यांची मुक्तता व्हावी हीच त्यांची सर्वांत प्रमुख प्रेरणा होती. असें असलें तरी गांधीजी खिस्ताप्रमाणें व बुद्धाप्रमाणें जनतेच्या आध्यात्मिक नेतृत्वाच्या पातळी-वरच कार्य करीत राहिले नाहींत तर ते तिच्या दैनंदिन व्यवहारांत उतरून समाजाचें नेतृत्व करीत होते. या दृष्टीनें विचार केल्यास त्यांचें जीवितकार्य खिस्ताप्रमाणें किंवा बुद्धाप्रमाणें दिसत नसून खिस्तापूर्वी ज्यू लोकांत जे धर्मपुरुष होऊन गेले त्यांच्यासारखें गांधीजींचें कार्य दिसतें. कारण ते प्राचीन धर्मपुरुष गांधीजींप्रमाणें आपल्या काळांतील राजकारणांतहि भाग घेत असत. लॉर्ड पेथिक-लॉरेन्स ह्यांनीं ज्यू लोकांतील खिस्तपूर्व धर्मपुरुषांचा दाखला दिला आहे तो लक्षांत घेऊन आपणांस असेंहि म्हणतां येईल कीं, भारतीय इतिहासांत बुद्ध व महावीर यांच्याप्रमाणें गांधीजींनीं भारताला सत्याचा व अहिंसेचा संदेश दिलेला असला तरीहि ते बुद्ध किंवा महावीर यांच्याप्रमाणें राजकीय व्यवहारांतून निवृत्त झालेले नव्हते. ते बुद्ध व महावीर यांच्यापूर्वी होऊन गेलेल्या श्रीकृष्णाप्रमाणें किंवा रामचंद्राप्रमाणें राजकारणहि करीत असत. पण श्रीकृष्णाचा किंवा रामचंद्राचा दृष्टांतहि गांधीजींना लागू पडत नाहीं. कारण त्यांनीं श्रीकृष्णाप्रमाणें किंवा रामचंद्राप्रमाणें शस्त्रग्राही राजकारण केव्हांच केलें नाहीं. तात्पर्य, ते आत्मबलाचें राज्य निर्माण करीत होते, तरीहि ते राज-कीय व्यवहारापासून पराङ्मुख झाले नाहींत आणि त्यांनीं जन्मभर राजकीय व्यवहार केले तरीहि त्यांनीं शस्त्रग्रहण केलें नाहीं, त्यांनीं हिंसेचा अथवा असत्याचा अवलंब केला नाहीं. इतकेंच नाहीं तर निर्भेळ सत्याचा व निरपवाद अहिंसेचा संदेश जगाला देऊन व देण्यासाठींच त्यांनीं आपलें सर्व जीवन समर्पण केलें. अशा या आत्मबलाच्या अद्वितीय उपासकाला कोण-त्याहि ऐतिहासिक धर्मपुरुषाचा [illegible] लागू पडत








नाहीं. मानवाचा इतिहास अद्यापि पुरा झालेला नाहीं. आजपर्यंत होऊन गेलेल्या धर्मपुरुषांहून अधिक श्रेष्ठ असे धर्मपुरुष होऊं शकतात व पुढेंहि होतील असा आशादायक संदेश भारतीय जनतेला व आधुनिक मानवाला देऊन गांधीजींनीं आपले प्राण आनंदानें सोडले.

## विश्वामित्राचें गर्वहरण

भारतीय संस्कृतीच्या इतिहासांत श्रीकृष्ण आणि रामचंद्र यांच्याहि पूर्वी घडलेल्या कांहीं घटनांच्या कथा हिंदी पुराणांत सांगितलेल्या आहेत. त्यांपैकींच वसिष्ठानें आपल्या आत्मबलानें विश्वामित्राच्या शस्त्रबलाचा पराभव केला आणि तो पराभव झाल्यानंतर क्षत्रियांच्या शस्त्रबलापेक्षां ब्रह्मतेजोबल हेंच अधिक श्रेष्ठ बल आहे असें म्हणून विश्वामित्रानें राज्यत्याग केला व तपश्चर्या करून ब्रह्मर्षिपद प्राप्त करून घेतलें अशी एक कथा आहे. राजांच्या शस्त्रबलापेक्षां ब्रह्मर्षीचें आत्मबल श्रेष्ठ आहे हें दाखवून देण्यासाठीं या कथेचा उपयोग करण्यांत येत असतो. राजसत्तेच्या शस्त्रबलाहून आत्मबल श्रेष्ठ आहे हा विचार फार प्राचीन काळापांसून भारतीयांच्या अंतःकरणावर ठसविण्यांत आलेला असून याच विचाराचा पुनरुद्धार म० गांधींनीं सत्याग्रहाच्या रूपानें आधुनिक भारतांत केला असें म्हणण्यास कांहीं प्रत्यवाय नाहीं. ब्रम्हर्षीचें ब्रम्हतेज म्हणजेच सत्याग्रहींचें आत्मबल. मात्र हें ब्रम्हतेज अथवा आत्मबल केवळ विशिष्ट वर्गाच्या अथवा व्यक्तींच्या अंतःकरणांतच वसत असतें असें नसून, तें प्रत्येक मानवाच्या अंतःकरणांत वसत असतें अशी म. गांधींची शिकवण असून प्राचीन युगांतील ब्रम्हर्षि आणि मध्ययुगांतील साधुसंत यांच्याचप्रमाणें म. गांधींनीं समाजांतील प्रत्येक व्यक्तीच्या अंतःकरणांतील हें सुप्त आत्मबल जागृत करून त्याचा प्रभाव समाजाच्या सर्व व्यवहारांवर पाडण्याचा प्रयत्न केला. गांधीजींनीं आधुनिक भारतांत जेव्हां सत्याग्रहाचे प्रयोग सुरूं केले तेव्हांच आधुनिक युरोपांत राष्ट्रांतील प्रत्येक नागरिकाला शस्त्रधारी बनवून क्षात्रधर्माची दीक्षा देण्याचे प्रयोग सुरूं झाले. हा प्रयोग प्रथमतः जर्मनीमध्यें सुरूं होऊन पुढें त्या वृत्तीचें अनुकरण इतर युरोपीय राष्ट्रांनीं केलें. अशा रीतीनें विसाव्या शतकाच्या प्रारंभापासून आधुनिक युरोपांत लष्करी वृत्ति आणि आधुनिक भारतांत सत्याग्रही वृत्ति या दोहोंची वाढ होऊं लागली. भारत-राष्ट्र ब्रिटिशांच्या दास्यांत असल्यामुळें या राष्ट्रांतील सर्वसामान्य जनतेंत लष्करी वृत्तीचा फैलाव होऊं नये याबद्दल ब्रिटिश राज्यकर्ते शक्य ती दक्षता घेत होते. भारतीय जनतेचे नेते जरी सर्व सत्याग्रही वृत्तीचे नव्हते तरीहि त्यांना निःशस्त्रांचें राजकारणच करणें भाग होतें. या निःशस्त्रांच्या राजकारणांत तेजस्वी वृत्ति निर्माण करीत असतां भारतीय नेत्यांना गांधीजींचा आत्मबलाचा मार्ग हाच आपणांस व्यवहारतः ग्राह्य आहे असें दिसून आलें आणि तो तत्त्वतःहि श्रेष्ठ आहे असें त्यांना भारतांत मुरलेल्या आध्यात्मिक संस्कृतीमुळें पटूं लागलें. भारतीय राष्ट्रवादाला आध्यात्मिक वळण लावणारे सर्वच राष्ट्रीय नेते केवळ आत्मबलानें भारत स्वतंत्र होईल असें मानणारे नव्हते हें जरी खरें आहे तरी त्या सर्वांना भारतीय क्रांतीच्या कार्यांत शस्त्रबलाहून जनतेच्या आत्मबलाचें महत्त्व फार मोठें आहे हें मत पटलेलें होतें. म्हणून त्यांनीं विचारपूर्वक भारतीय स्वातंत्र्याच्या लढ्यांत म० गांधींच्या आत्मबलाच्या सिद्धान्तास तात्त्विक व व्यावहारिक दोनहि दृष्टींनीं पाठिंबा दिला.

## आत्मबल, बुद्धिबल आणि लोकशाही

आधुनिक युरोपांतील राजकारणाला अठराव्या व एकोणिसाव्या शतकांत लोकशाहीचें स्वरूप प्राप्त झालें. या युरोपीय लोकशाहीच्या सिद्धान्ताची उभारणी मानवाच्या बुद्धिबलावर करण्यांत आली. मानव हा बुद्धिप्रधान प्राणी असून त्याच्या बुद्धीला सत्यासत्य व सदसद्विवेक करतां येतो. 'असत्या'चा व 'असता'चा त्याग करून 'सत्या'चा व 'सता'चा स्वीकार करावा ही मानवाची स्वाभाविक वृत्ति असून कोणतीहि गोष्ट न्यायाची आहे असें मनुष्याला पटलें तर तो तिचा स्वीकार करतो आणि एकास पटलेलें मत खरोखर सत्य असल्यास तें सर्व लोकांस बुद्धिबलानें पटवून देतां येतें या श्रद्धेवर एकोणिसाव्या शतकांतील युरोपीय प्रागतिकांनीं आपल्या लोकशाही सिद्धान्ताची उभारणी केली. प्रत्येकास विचारस्वातंत्र्य व प्रचारस्वातंत्र्य दिल्यास व सर्वांस सारखा मताधिकार दिल्यास, थोड्याच काळांत लोकशाहीचें राज्य हें न्यायाचें व सत्याचें राज्य होईल अशी श्रद्धा या प्रागतिक तत्त्ववेत्त्यांची होती. ही त्यांची










श्रद्धा अनुभवानें खरी ठरली नाहीं. सवाना मताधिकार मिळाला तरी सर्व आपलीं मतें केवळ सत्यनिष्ठेनें बनवीत नाहींत आणि आपण करीत असलेला अन्याय हा अन्याय आहे असें मान्य करण्यास तयार होत नाहींत. याच्याउलट, आपला व्यक्तीचा, किंवा आपल्या वर्गाचा स्वार्थ तोच न्याय आहे अशीहि ते आपली समजूत करून घेतात. यामुळें समाजाला न्याय-अन्याय यासंबंधींचें ज्ञान करून देण्यास बुद्धिबल पुरें पडूं शकत नाहीं असा अनुभव येतांच अंतर्गत न्यायसंस्थापनेसाठींच सशस्त्र क्रांतीचा अवलंब करावा आणि आंतरराष्ट्रीय न्यायसंस्थापनेसाठीं जागतिक युद्धाचा वणवा पेटवावा असे विचार युरोप-खंडांत विसाव्या शतकाच्या प्रारंभापासूनच फैलावत होते. या विचारांतूनच १९१४ ते १९१९ पर्यंतचें अँग्लो-जर्मन महायुद्ध पेटलें आणि त्याच महायुद्धाच्या काळांत १९१७ सालीं रशियांत बोल्शेव्हिक क्रांति घडून आली. महायुद्धामुळें आधुनिक युरोपच्या जागतिक वर्चस्वास हादरा बसला आणि बोल्शेव्हिक क्रांतीनें आधुनिक युरोपांत प्रतिष्ठित झालेली भांडवलशाही अप्रतिष्ठित होऊन डळमळूं लागली. पण त्याचबरोबर केवळ बुद्धिबलावर अधिष्ठित झालेलें प्रागतिक तत्त्वज्ञानहि लोप पावलें आणि सशस्त्र क्रांति आणि महायुद्ध यांतूनच न्यायसंस्थापना होईल असा विचार सर्व युरोपांत फैलावला. या विचारांतून कम्युनिझम् आणि नाझीझम् यांचा उद्भव होऊन युरोपीय लोकशाहीचा अंत ओढवला. पहिल्या महायुद्धापासून दुसऱ्या महायुद्धापर्यंतच्या काळांत हीं लोकशाहीविरोधी तत्त्वज्ञानें सर्व युरोपांत, इतकेंच नव्हे तर युरोपचें अनुकरण करणाऱ्या चीन-जपान-प्रभृति आशियांतील राष्ट्रांतहि आपला प्रभाव पाडूं लागलीं. पण याच काळांत म० गांधींनीं बुद्धिबलाचा आधार लोकशाहीला पुरेसा नाहीं हें ओळखून आत्मबलाच्या अधिष्ठानावर भारतीय लोकशाहीची उभारणी केली. त्यांनीं भारतांत केलेल्या सत्याग्रही क्रांतींतून भारतीय लोकशाहीला युरोपीय व अमेरिकन लोकशाहीहून अधिक श्रेष्ठ स्वरूप प्राप्त होत आहे व होणार आहे. बुद्धिबलाच्या सिद्धान्ताहून अधिक श्रेष्ठ असा आत्मबलाचा सिद्धान्त हें भारतीय लोकशाहीचें अधिष्ठान बनलें आहे. याचा अर्थ आपण समजून येतला तरच म० गांधींनीं भारतीय संस्कृतींत घातलेली नवी भर कोणती आणि मानव-संस्कृतीच्या इतिहासांत गांधीजींचें स्थान कोणतें याचा उलगडा आपणांस होऊं शकेल.

### मानवाचें वैशिष्ट्य व त्याचा धर्म

म. गांधींनीं आधुनिक भारताला जी नवी जीवनविषयक दृष्टि दिली तिला सर्वोदयनिष्ठा अथवा सत्याग्रहनिष्ठा असें नांव प्राप्त झालें आहे. इतर प्राण्यांहून मनुष्यप्राण्याचें वैशिष्ट्य केवळ त्याच्या बुद्धिबलांत नसून तें त्याच्या अंतःकरणांत वसत असणाऱ्या आत्मबलांत आहे अशी ही दृष्टि आहे. मानवानें आपल्या बुद्धीचा विनियोग केवळ स्वहितासाठीं न करतां तो सर्वहितासाठीं केला पाहिजे हाच त्याचा खरा धर्म होय. हा धर्म ज्याला समजला नाहीं त्याची बुद्धि केवढीहि प्रभावी असली तरी त्याला खरा मानव म्हणतां येणार नाहीं. बुद्धि हें सर्व इंद्रियांहून श्रेष्ठ असें इंद्रिय मानवापाशीं असलें तरी तें इंद्रिय जर सर्वहितासाठीं अथवा सर्वोदयासाठीं उपयोगांत आणिलें नाहीं व त्याचा उपयोग केवळ स्वहितासाठींच केला तर त्या मानवाला 'असुर' असेंच म्हणावें लागेल. बुद्धि हें सर्वश्रेष्ठ साधन आहे पण तिचें पावित्र्य तिच्या सर्वोदयनिष्ठेवर अवलंबून आहे. सत्याग्रही दृष्टि अशी असल्यामुळें बुद्धिस्वातंत्र्याचें तत्त्व या निष्ठेंत अंतर्भूत झालें असलें तरी तें साधनरूपानें अंतर्भूत झालेलें आहे. ज्या बुद्धीनें स्वहितनिष्ठा सोडून सर्वहितनिष्ठा स्वीकारली ती बुद्धीच खरी स्वतंत्र व खरी पवित्र होय अशी ही दृष्टि आहे. अव्यभिचारी सत्यनिष्ठा, सत्याचें अखंड संशोधन आणि सत्यसंस्थापनेचा अविरत प्रयत्न याला ज्यानें आपलें जीवन समर्पण केलें तोच खरा आदर्श मानव होय. आजपर्यंत होऊन गेलेल्या सर्व धर्मपुरुषांची शिकवण हीच आहे, सर्व धर्मांचें रहस्य हेंच आहे. आणि आजच्या मानवाला जर कोणत्या जीवननिष्ठेची आवश्यकता असेल तर ती याच जीवननिष्ठेची होय, असें गांधीजी मानीत होते. मानवाची सर्वात्मभावना जागृत झाली पाहिजे हेंच आजचें सत्य असून त्या सत्याची उपासना करणारांनीं संग्रहवृत्तीचा व हिंसावृत्तीचा त्याग केला पाहिजे. 'अहिंसा' व 'असंग्रह' हीं सर्वात्मभावनेच्या सत्याचीं साधनें आहेत. आणि सर्वात्मभावना हाच 'मोक्ष' अथवा मानवाचा परमपुरुषार्थ आहे. स्वहित,

स्वकुलहित, स्वराष्ट्रहित या वृत्ती जोंपर्यंत सर्वात्मभावनेला पोषक व सहायक होत असतील तोंपर्यंतच त्या समर्थनीय व ग्राह्य समजल्या पाहिजेत. अशा सर्व प्रकारच्या 'स्व' मधून व सर्वप्रकारच्या अहंकारामधून तसेंच सर्वप्रकारच्या ममत्वामधून मुक्त झालेली बुद्धि हीच शुद्ध बुद्धि, स्थितप्रज्ञ अथवा आत्मनिष्ठ बुद्धि होय. ही शुद्ध अथवा आत्मनिष्ठ बुद्धि प्राप्त होण्यास मानवानें हिंसावृत्तीचा व संग्रहवृत्तीचा त्याग केला पाहिजे. यांतूनच खरी सत्यसंस्थापना अथवा न्यायसंस्थापना होऊं शकेल. या जीवननिष्ठेस अनुरूप अशीच मानवाची समाजरचनाहि असली पाहिजे. जर अशी समाजरचना स्थापन करावयाची तर मानवसमाजाची अहिंसावृत्ति व असंग्रहवृत्ति यांना जागृत करूनच ती करतां येईल. आधुनिक युरोपांत व्यक्तिवाद, राष्ट्रवाद व समाजवाद अशीं जीं तीन परस्परांशीं विरुद्ध भासणारीं सामाजिक रचनेचीं तत्त्वज्ञानें निघालीं, त्यांचा समन्वय अध्यात्मदृष्टीनें विचार करणारांस करता येतो, तसेंच लोकशाही व समाजवाद या राजकीय व आर्थिक ध्येयांचाहि अंतर्भाव सत्याग्रही सर्वोदयवादांत होऊं शकतो अशी दृष्टि गांधीजींनीं आधुनिक भारताला दिलेली आहे. ज्यांनीं भारत स्वतंत्र झाल्यानंतर येथील लोकशाहीची राज्यघटना बनविली त्यांनीं मात्र ती बनवितांना या दृष्टीनें बनविलेली नाहीं. ती बनवितांना त्यांनीं ब्रिटिश व अमेरिकन लोकशाहीच्या नमुन्यावरच ती बनविली आहे. म्हणूनच भारतांतील समाजवाद्यांना व सर्वोदयवाद्यांना तिच्यांत आमूलाग्र क्रांति घडवून आणण्याची आवश्यकता भासत आहे. हेंच कार्य आचार्य विनोबा व जयप्रकाश इत्यादि भूदान-आंदोलनाचे पुरस्कर्ते आज करूं लागले आहेत. त्यांच्या या कार्यांतून निर्माण होणारी क्रांतिशक्ति लक्षांत घेऊनच भारतांतील राष्ट्रवादी कॉंग्रेसपक्षानें 'समाजवादी समाजरचने'चें ध्येय स्वीकारिलें आहे. पण या ध्येयास मूर्त स्वरूप देण्यासाठीं जे कायदे करणें अवश्य आहे त्या कायद्यांच्या मार्गांत कॉंग्रेसपक्षानें बनविलेली राज्यघटनाच आज अडथळे निर्माण करीत आहे. पण भूदान-आंदोलनांतून निर्माण होणारी क्रांतिशक्ति ज्या मानानें भारतांत प्रभावी ठरेल त्या मानानें राज्यघटनेचे अडथळे दूर होत जातील व भारतांत स्थापन झालेल्या लोकशाहीला 'समाजवादी' स्वरूप येत जाईल. भारतीय समाजवादाला अहिंसेचें आणि भारतीय लोकशाहीला असंग्रहाचें अधिष्ठान निर्माण करणें असें द्विविध कार्य आज आचार्य विनोबा व जयप्रकाश नारायण हे करीत आहेत. त्या कार्याचें अधिष्ठान सत्याग्रही वृत्ति व सर्वोदयी दृष्टि हें आहे. एका अर्थानें हा सत्याग्रही सर्वोदयवाद ही भारतीय संस्कृतीची मानवसंस्कृतीला देणगी आहे. या देणगीमुळें अखिल जगांतील मानव संस्कृति आणि हिंदु, बौद्ध, इस्लाम, ख्रिस्ती, पारशी इत्यादी सर्व धर्म यांना आपलें जीवन चिरंतन करण्याचा मार्ग सांपडणार आहे.

## हिंदुसंस्कृति व सत्याग्रह

सत्याग्रही सर्वोदयवाद हा हिंदु संस्कृतींतूनच उदय पावलेला असला तरी त्याच्यामुळें हिंदुधर्मशास्त्रांत व हिंदुसमाजरचनेंत क्रांतिकारक बदल घडून आलेले आहेत. हिंदुसंस्कृति म्हणून जिला म्हणतात तिला दोन आधार आहेत. एक वेदान्त आणि दुसरा मन्वादि स्मृतिशास्त्रें. वेदान्त म्हणजे उपनिषदें आणि स्मृतिशास्त्रें म्हणजे हिंदूंचें वर्णाश्रमधर्मरूप समाजशास्त्र असें म्हणतां येईल. उपनिषदांतील ब्रम्हविद्या आणि स्मृतिशास्त्रांतील वर्णाश्रमधर्म या दोहोंनाहि मूळ आधार वेदाचा आहे. वेदांतूनच उपनिषदांतील तत्त्वज्ञान आणि स्मृतिशास्त्रांतील वर्णाश्रमधर्माचा उगम झालेला आहे, अशी हिंदुसंस्कृतीची श्रद्धा आहे. औपनिषदीय तत्त्वज्ञानालॆ व वर्णाश्रमधर्माला हिंदूंचें अध्यात्मशास्त्र व समाजशास्त्र अशीं नांवें अनुक्रमानें देतां येतील. गांधीजींनीं औपनिषदतत्त्वज्ञान आणि वर्णाश्रमधर्म या दोहोंनाहि मान्यता दिलेली होती. असें असलें तरी त्यांनीं या दोहोंतहि आपल्या सत्याग्रही वृत्तीनें व तत्त्वज्ञानानें क्रांतिकारक बदल घडवून आणिले. त्यामुळें सत्याग्रही सर्वोदयवाद ही केवळ हिंदु संस्कृति उरलेली नसून तिला आतां सर्व-धर्म-समानत्वावर अधिष्ठित झालेल्या आधुनिक मानवसंस्कृतीचें स्वरूप प्राप्त झालें आहे. सत्याग्रही तत्त्वज्ञानामुळें वेदान्ताला सामाजिक, आर्थिक व राजकीय क्रांतिकारक स्वरूप प्राप्त झालें असून, वर्णाश्रमधर्मांत अंतर्भूत झालेली सामाजिक व आर्थिक विषमता नष्ट झाली आहे.

गांधीजींनीं वर्णाश्रमधर्माला मान्यता दिली पण








त्यांतील आर्थिक व सामाजिक विषमता नष्ट केली या म्हणण्याचा अर्थच अनेक बुद्धिमन्तांना कळत नाहीं. त्यांच्या मतें वर्णाश्रमधर्माला मान्यता देणें म्हणजे सामाजिक व आर्थिक विषमतेला मान्यता देणेंच होय. पण गांधीजी तसें समजत नव्हते. त्यांचा वर्णाश्रमधर्म स्मृतिग्रंथांतून घेतलेला नसून भगवद्गीतेंत चातुर्वर्ण्यासंबंधीं जे सिद्धान्त मांडिलेले आहेत त्यावर त्यांचा वर्णाश्रमधर्म अथवा त्यासंबंधीचे त्यांचे विचार उभारलेले होते. "स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः।" म्हणजे 'आपण अंगीकृत केलेल्या कर्मांत' म्हणजे समाजसेवेच्या प्रकारांत आनंद मानणें यांतच मनुष्याचा मोक्ष आहे. अथवा "स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विंदति मानवः।" 'आपल्या कर्मांनीं परमात्म्याची पूजा केल्यानें मनुष्याला परमात्मप्राप्ति होते'. या निष्ठेस गांधीजी वर्णाश्रमधर्माचें रहस्य समजत होते व या रहस्यांत सर्व प्रकारच्या समाजसेवेची व श्रमकार्याची प्रतिष्ठा सारखीच आहे, हें तत्त्व अंतर्भूत झालेलें आहे असें ते मानीत. समाजाची सेवा कोणत्याहि प्रकारानें केली तरी त्या सर्व प्रकारच्या सेवेची प्रतिष्ठा सारखीच असली पाहिजे, इतकेंच नव्हें तर त्या सेवेबद्दल मिळणारें आर्थिक वेतनहि सारखेंच असलें पाहिजे असा त्यांचा वर्णाश्रमधर्म होता. ते जसें 'वर्णाश्रमधर्म मला मान्य आहे' असें म्हणत होते तसेंच ते प्रथमपासून असेंहि म्हणत होते कीं डॉक्टर आणि वकील, शेतकरी आणि कामकरी, तसेंच न्हावी आणि भंगी या सर्वांचो सामाजिक प्रतिष्ठा सारखीच असली पाहिजे. इतकेंच नाहीं तर त्या सर्वांना समाजाकडून मिळणारें वेतनहि सारखेंच असलें पाहिजे. सर्व श्रमप्रकारांच्या समान प्रतिष्ठेचें, समान वेतनाचें हें तत्त्व त्यांनीं सत्याग्रहांत व सर्वोदयवादांत आधारभूत मानिलें असल्यामुळें हिंदूंच्या परंपरागत वर्णाश्रमधर्माच्या कल्पनेंत सत्याग्रहानें सामाजिक व आर्थिक क्रांतीचें बीज रोविलें. ही सामाजिक व आर्थिक समानतेची वृत्ति व तिच्यावरील निष्ठा हें आधुनिक भारतीय संस्कृतीचें वैशिष्ट्य बनलें असून त्या वैशिष्ट्यामुळेंच आधुनिक भारतानें लोकशाही व समाजवाद या समाजघटनेच्या ध्येयांना मान्यता दिली आहे. तसेंच गांधीजींनीं स्पृश्यास्पृश्य सर्व जातींत रोटीबेटीव्यवहार सुरू करून जातिभेदभावनेलाहि तिलांजलि दिली आहे.

त्याचप्रमाणें धर्मभावना व अध्यात्मवृत्ति यांना सर्वधर्मसमन्वयाचें अधिष्ठान वेदान्ताच्या आधारें दिल्यामुळें भारतीय राष्ट्र हें आतां केवळ हिंदु राष्ट्र उरलेलें नसून तें सर्वधर्मसमन्वयवादी राष्ट्र बनलें आहे. भारत राष्ट्र हें 'Secular' आहे असा इंग्रजी शब्द जेव्हां वापरतात तेव्हां त्याचा अर्थ हें राष्ट्र धर्महीन किंवा निधर्मी आहे असा नसून तें राष्ट्र सर्वधर्मसमन्वयी आहे व त्यांतील राज्य सर्व धर्मांचा व सर्व जीवननिष्ठांचा समबुद्धीनें प्रतिपाळ करील असा अभिप्रेत आहे. 'सर्व धर्मांचा व सर्व निष्ठांचा' हे शब्द बुद्धिपुरस्सर योजिलेले आहेत. त्यांत निरीश्वरवाद्यांची निरीश्वरवादावरील निष्ठा ही सुद्धां राज्यसंस्थेनें संरक्षण करण्याची वस्तु आहे असा अर्थ गृहीत धरलेला आहे. सत्याग्रही तत्त्वज्ञानांत ज्याला जें अंतिम सत्य वाटतें त्याची त्या सत्यावरील निष्ठा ही ईश्वरवाद्यांच्या ईश्वरनिष्ठेइतकीच पवित्र, पूज्य व संरक्षणीय निष्ठा होय असें सत्याग्रही तत्त्वज्ञान आहे. अशा निरीश्वरवाद्यांचा समावेश सत्याग्रही तत्त्वज्ञानांत व्हावा म्हणूनच आपण 'सत्य हाच परमेश्वर अथवा परब्रह्म' अशी नवी शब्दयोजना अनेक वर्षांच्या विचारानंतर स्वीकारिली असें स्पष्टीकरण म. गांधींनीं केलेलें आहे. कोणाहि नागरिकाला कोणतीहि जीवननिष्ठा देणें हें येथील राज्यसंस्थेचें कर्तव्य नसून प्रत्येक नागरिकाच्या प्रामाणिक जीवन-निष्ठेचें इतरांच्या उपद्रवांपासून संरक्षण करणें हेंच येथील राज्याचें कर्तव्य आहे. कोणतीहि विशिष्ट जीवननिष्ठा इतरांना पटवून देतां येईल पण तिची सक्ती करतां येणार नाहीं. ईश्वरवादी असोत किंवा निरीश्वरवादी असोत, मूर्तिपूजक असोत किंवा अमूर्ताची उपासना करणारे असोत— सर्वांना सारखें संरक्षण दिलें जाईल. पण अमूर्ताच्या उपासकाला मूर्तिपूजकांच्या मूर्ती फोडण्याचें स्वातंत्र्य मिळणार नाहीं. तसेंच आपल्या मूर्ती व त्यांची पूजा कोणासहि इतरांवर लादतां येणार नाहींत. येथील राज्य अशी सक्ती करणारांचें समबुद्धीनें पारिपत्य करील. सर्वांना केवळ भौतिकवादी बनविणें किंवा सर्वांना अध्यात्मवादाची दीक्षा देणें हेंहि येथील राज्यकर्त्यांचें कर्तव्य नाहीं. सर्वांचें समबुद्धीनें संरक्षण करणें आणि कोणावरहि कोणाची सक्ती चालूं न देणें हेंच या राष्ट्राचें ब्रीद असून, या ब्रीदाची








अहिंसेनें सत्याची उपासना करण्यास पूर्ण स्वातंत्र्य असावें या सत्याग्रही निष्ठेवर झालेली आहे. या सत्याग्रही निष्ठेमुळें राष्ट्र आतां हिंदु राष्ट्र, मुसलमान राष्ट्र, ख्रिस्ती राष्ट्र किंवा पारशी राष्ट्र अथवा बौद्ध राष्ट्र उरलेलें नसून तें सत्याग्रही व सवादयवादी राष्ट्र बनलेलें आहे. सर्वांचा उदय व्हावा आणि प्रत्येकाला आपापल्या निष्ठेस व सत्यास उपासितां यावें असें हें एक असामान्य व अभिनव राष्ट्र बनलें आहे. यांतून जातिभेद, धर्मभेद व आर्थिक वर्गभेद कायमचे नष्ट झाले पाहिजेत अशी आमची निष्ठा बनली आहे.

## वेदान्त, समाजक्रान्ति आणि अहिंसा

भारतीय संस्कृतीचा इतिहास अवलोकन केल्यास असें दिसून येतें कीं, भारतांत समाजक्रांतीचे प्रयत्न प्राचीन काळीं अहिंसावादी बौद्धांनीं व जैनांनीं केले. या समाजक्रांतीला विरोध करण्याचें कार्य वैदिक अभिमान्यांनीं केलें. प्रथमतः बौद्धधर्म हा हिंदुधर्माहून भिन्न असा धर्म नसून उपनिषदांतील वेदान्ताचा आधार घेऊन समाजक्रांति करणारा एक सांप्रदाय होता. पुढें ब्राह्मणांनीं बौद्धांना वैदिक संस्कृतींतून दूर लोटलें आणि वेदान्ताला समाजक्रांतीपासून पराङ्मुख केलें. शंकराचार्यांच्या काळापासून वैदिक संस्कृति ही समाजक्रांतीपासून कायमची पराङ्मुख झाली. शांकर वेदान्तांतील अद्वैत-तत्त्वज्ञान वेदप्रामाण्याच्या बंधनांत गुरफटून गेलें आणि वेदान्तानें वर्णाश्रमधर्मांतील उच्च-नीच भाव, सामाजिक विषमता आणि हिंसावाद यांना व्यवहारक्षेत्रांत मान्यता दिली. यानंतर मध्ययुगीन साधुसंतांनीं वेदान्ताला अहिंसावृत्तीचें व समतावृत्तीचें महत्त्व पटवून देण्याचा प्रयत्न केला. पण तेंहि कार्य अपुरेंच राहिलें. तें साधुसंतांचें कार्य पुरें करण्याचा आणि वेदान्ताला समाजक्रांतिकारक व अहिंसावादी स्वरूप देण्याचा मान म० गांधींनीं मिळविला. यामुळें सत्याग्रही तत्त्वज्ञानांत वेदान्ताचें अद्वैतदर्शन, साधुसंतांची अहिंसावृत्ति व समता आणि आधुनिक युरोपांत निर्माण झालेली सामाजिक क्रांतिवृत्ति यांचा सुंदर समन्वय झालेला दिसून येतो. या सर्व समन्वयाची तर्कशुद्ध मांडणी व मीमांसा अद्याप झालेली नसली तरी आचार्य विनोबा यांनीं तें कार्य करण्यास प्रारंभ केला असून त्यासाठीं त्यांनीं बुद्धगया येथें एक समन्वय-आश्रमहि स्थापन केला आहे. या समन्वयाश्रमांत वेदान्त आणि अहिंसादर्शनें यांचा समन्वय करण्याचें कार्य जसें होणार आहे तसेंच व्यक्तिवाद-विरुद्ध-समाजवाद आणि राष्ट्रवाद-विरुद्ध-मानवतावाद असे जे निरनिराळे वाद आधुनिक युरोपांत उगम पावून आधुनिक भारतांत आले आहेत, त्या सर्वांचा समन्वयहि करण्याचे प्रयत्न सुरू होणार आहेत. सत्याग्रही वृत्तीचा आश्रय केलेल्या आधुनिक भारतानें भारतांतून एके काळीं निर्वासित झालेल्या बुद्ध-धर्माच्या अनुयायांना व बुद्धाच्या शिष्यांना गौरवाचें स्थान दिलें आहे. बुद्धधर्मीय सम्राट् अशोक याचें धर्मचक्र भारतीय ध्वजाचें चिन्ह बनलेलें आहे. आणि शांततेची अहिंसक समाजक्रांति हें भारताचें नियोजित व अंगीकृत कार्य बनलेलें आहे. या दृष्टींनीं विचार केल्यास अठराव्या शतकाच्या अखेरीस परतंत्र बनलेला भारत आणि विसाव्या शतकाच्या मध्यास स्वतंत्र बनलेला भारत याची संस्कृति एकच असली, तरी तिचा कायापालट झाला असून तिच्यांत आंतर-बाह्य क्रांति घडून आलेली आहे. या क्रांतीचें श्रेय राममोहन रॉय यांच्यापासून गांधीजींपर्यंत होऊन गेलेल्या सर्वप्रकारच्या क्रांतिकारकांना असलें तरी त्या सर्वांच्या कार्यावर गांधीजींनीं मुकुट चढविला असें म्हटलें तर त्यांत कोणतीहि अतिशयोक्ति होणार नाहीं. भारतीय संस्कृतीला आजच्या जगांत जें मानाचें स्थान व प्रतिष्ठा लाभली आहे त्याचें श्रेय म. गांधींनाच आहे. ही संस्कृति मानवाला सर्व प्रकारच्या दास्यांतून, विषमतेंतून व बंधनांतून मुक्त करण्याचा प्रयत्न करीत असून शासनमुक्तीच्या ध्येयाचा खरा मार्ग दाखवीत आहे. मानवाला पुनः एकदां "**धिग् बलं क्षत्रियबलं ब्रह्मतेजोबलं बलम्**" असा संदेश देऊन नवें जग निर्माण करूं पाहणारे ऋषी राष्ट्रांत निर्माण होत आहेत हा या राष्ट्राचा महिमा नव्हे काय ? असे ऋषी केवळ एका राष्ट्राचा किंवा एका धर्माचा उद्धार करून थांबत नाहींत. ते सर्व जगाला नवें जग निर्माण करण्याचा मार्ग दाखवीत असतात. कारण त्यांना मानव-धर्माचीं सनातन तत्त्वें अवगत असतात. अथवा आपल्या तपश्चर्येनें तीं तत्त्वें ते अवगत करून घेतात व जुन्या जगांत क्रांति घडवून नवें जग निर्माण करितात. तसें करण्यांत त्यांचा हेतु अव्यभिचारी सत्यनिष्ठा व निर्मम प्रेम यांहून दुसरा कोणताहि नसतो.







डॉ. ना. ग. जोशी

# पदकार ज्ञानेश्वर हेच ज्ञानेश्वरीकार !

अभंग-पदें रचणारा ज्ञानेश्वर आणि ज्ञानेश्वरीकार ज्ञानेश्वर वेगवेगळे असावेत असा पूर्वपक्ष फार पूर्वी होऊन गेलेला आहे. त्याचा उत्तरपक्षहि तितकाच जोरानें झालेला आहे. असें असूनहि ' ज्ञानदेवांचा गाथा ' अभ्यासावयास घेतला म्हणजे फिरून ही समस्या आपल्यापुढें उभी राहते ! एकीकडे श्री. विनोबांचे अनुभव पटतात कीं, या अभंगांतील रहस्य आणि ज्ञानेश्वरींतील रहस्य ही परस्परपूरकच आहेत. त्यांना तर मनोमन खात्री आहे कीं, या पदांतील रहस्यें ज्ञानदेवांवांचून कोण लिहूं शकणार ? उलट, एका प्राध्यापकांचें मत अगदीं याच्या उलट ऐकावयास मिळतें -कीं, "ज्ञानियांच्या आणि योगियांच्या राजानें ज्ञानेश्वरी लिहिली हेंच योग्य आहे; अभंगादि रचनेसारख्या खालच्या दर्जाच्या गोष्टींसाठीं त्याला उसंत होती कोठें ?" –याशिवाय भाषेच्या स्वरूपाचा प्रश्नहि पूर्वींइतकाच जटिल राहिला आहे.

परंतु आपण या व तत्कालीन इतर संतांच्या ( अभंगादि ) रचनेंत याचें कांहीं गमक लाभतें कां तें पाहूं लागल्यावर कांहीं खुणा अशा आढळतात कीं ज्यामुळें ज्ञानेश्वरीकार ज्ञानेश्वर व पदकार ज्ञानेश्वर या दोहोंत अभेद आहे असें वाटावें. तसल्या कांहीं खुणा मला आढळल्या आहेत. पूर्वी त्या अनेकांना आढळलेल्या असतीलहि – नव्हे, असणारच. परंतु मला त्यांचें महत्त्व कां वाटतें तें मी नमूद केल्यास आणखी कांहीं नवे मुद्दे उजेडांत येतील म्हणून मी पुढील टिपण लिहिलें आहे :

( १ ) पदपदांतरें रचणारा व ज्ञानेश्वरी लिहिणारा ज्ञानेश्वर जर वेगवेगळे मानावयाचे तर त्यांबरोबर असेच अभंग लिहिणारे निवृत्तिनाथ, सोपानदेव व मुक्ताबाई हीं सर्वजणेंहि ज्ञानेश्वरीकर्त्याच्या भावंडांहून वेगळींच मानावयाचीं काय ? तसें मानतांना अडचण अशी येते कीं या तिघांनीं ज्ञानेश्वरांचा उल्लेख आपल्या अभंगांत केलेला असून दोघांनीं तर ज्ञानयोगी ज्ञानेश्वरांचाचा उल्लेख केलेला आहे :

' सोपान संवगडा स्वानंद ज्ञानदेव । '– निवृत्तिनाथ
' ज्ञानदेवीं ज्ञान नाहीं तेथें भिन्न । '– सोपानदेव
' निवृत्ति-ज्ञानेश्वर कोरान्नाचें अन्न ।
संभाळी सोपान । मजलागीं । ' – मुक्ताबाई

हे सर्व उल्लेख ज्यांच्या रचनेंत आहेत तीं भावंडें जशी भक्तिपंथी होतीं तशींच तीं ज्ञानपंथीहि होतीं ! हीं सर्व दुहेरी मानण्याची तर्कापत्ति ओढवून घेण्यापेक्षां ज्ञानेश्वरांनाच एकच कां मानूं नये ?

( २ ) ज्ञानेश्वरांची समकालीन संतमंडळी ज्या ज्ञानेश्वरांचा अभंगकर्ते म्हणून उल्लेख करतात, ते ज्ञानेश्वर कोणते ? जनाबाईच्या पुढील अभंगांत हा उल्लेख अगदीं आंधळयालाहि दिसावा एवढा स्पष्ट आहे :

'एकच टाळी झाली चंद्रभागे वाळवंटीं ।
माझा ज्ञानराज गोपाळाशीं लाह्या वाटी ॥
नामदेव कीर्तन करी पुढे नाचे पांडुरंग ।
जनी म्हणे बोला ज्ञानदेवा अभंग ॥
अभंग बोलितां रंग कीर्तनीं भरला ।
प्रेमाचेनि छंदें विठ्ठलु नाचुं लागला ॥ ' – जनाबाई
( " ज्ञानदेवांचा गाथा " –
' जनाबाईचे अभंग ' – २७० )

यांत नामदेव कीर्तन करीत असतां ज्ञानदेव अभंग म्हणताहेत असा उल्लेख आहे. अर्थात् ते अभंग तत्काल स्फूर्तीनें रचलेली त्यांचीं स्वतःचीं अभंग-पदें होत हें सहज समजून यावें. कीं ते नामदेवांचे अभंग ' बोलत ' होते ? तसा संभव फारच कमी ! अर्थातच हे ज्ञानदेव पुढच्या काळांतील कोणी दुसरें असणें तर सुतराम् शक्य नाहीं.

( ३ ) परंतु याहून अधिक स्पष्ट उल्लेख नामदेवांच्या एका अभंगांत आहे :

"अध्यात्मग्रंथ पाहती पैठणीं ।
गीतासंबोधनीं । जवळीं असे ।










अनुक्रमणिका

सांगतां पुराण रात्रीं हरिकीर्तन ।
पैठणींचे जन । वेधियले ॥
[ " नामदेव गाथा " ( आवटे ) – ६९४ ].

हे उल्लेख ज्ञानेश्वरांच्या चरित्रासंबंधीं आहेत, तेव्हां यांतील ' गीतासंबोधन ' म्हणजे ' गीतेचा भावार्थ ' किंवा ' भावार्थदीपिका ' ( ज्ञानेश्वरी ) आणि ' हरि-कीर्तन ' म्हणजे मुक्ताबाईनीं उल्लेखिलेल्या अभंगादि रचनेनें रंगलेलें, ज्ञानेश्वर व इतर भावंडें यांचें 'हरिकीर्तन' – असा अर्थ लागतो. हा अभंग प्रक्षिप्त नसावा. कारण मग नामदेवकृत सर्वच ज्ञानेश्वरचरित्र प्रक्षिप्त मानावें लागेल. तसें कोणी सिद्ध केलेलें नाहीं. त्या वेळींच ज्ञाने-श्वरांच्या सतत बरोबर असलेल्या नामदेवांसारख्या समकालीनानें ज्ञानेश्वरांचा उल्लेख गीताटीका व हरि-कीर्तन या दोन्ही संदर्भांत केलेला असल्याळें ज्ञानेश्वर या दोन्हीं स्वरूपांत – ज्ञानयोगी व भक्तियोगी स्वरूपांत पैठणच्या जनांसमोर उभे होते, हें सहज शक्य वाटतें.

स्वतः ज्ञानेश्वरांच्या पदांतील पुढचे तीन उल्लेखहि वरीलप्रमाणेंच ज्ञानेश्वरांच्या एकरूपत्वाला पोषक आहेतः

( १ ) आम्ही संन्यासी संन्यासी ।
सदा राहों एकांतेंसी ॥ ध्रु. ॥
आम्ही संन्यास घेतला । देहादिकांचा त्याग केला ॥१॥
– ( अभंग १०६ )

( २ ) निर्गुण चवळें आणिलें ।
बाप निवृत्तिनें मज पांघुरविलें ॥
– ( अभंग १४७ )

( ३ ) माझें चवळें रंगाचें बहुतें ।
श्रीगुरुनिवृत्तिनाथें दिधलें ॥
– ( अभंग १५१ )

अशा रीतीनें आपणांस विनोबांच्या मनोमन साक्षी-ची शक्यता पटते. ज्ञान-भक्तीच्या अभेदावर उभार-लेल्या भागवतधर्माच्या वारकरी पंथाचा कुलगुरु म्हणून ज्ञानोबांची झालेली प्रतिष्ठापना अन्वर्थक वाटते. जे अभंग गायले जात असतां प्रत्यक्ष 'विठ्ठल'हि प्रेमाच्या छंदानें नाचावयास लागला, ते अभंग ज्ञानदेवांचे असले पाहिजेत, असें स्वाभाविकच वाटूं लागतें.

मात्र आज आपल्यापुढे असलेल्या ज्ञानदेवांच्या भजनांतील भाषा ज्ञानदेवकालीन भाषेहून बरीच सुधारलेली आहे. ज्ञानेश्वरीचें संस्करण जसें एकनाथांनीं केलें तसेंच कालपरत्वें संस्करण होऊन हीं भजनें परंपरेनें चालत आलेलीं आहेत. या अभंगांची उपलब्ध बाडें तर फार प्राचीन नाहींतच. ज्ञानदेवकालीन ज्ञाने-श्वरीची संभाव्य प्रत जशी उपलब्ध झाली तशी एकादी प्रत या अभंगादि पदपदांतरांची गवसल्यास सर्वच शंका दूर होतील. पण तोंपर्यंत तरी वर दर्शविलेल्या अंतर्गत पुराव्यावरूनच ही ज्ञानेश्वरकृत पदांची समस्या सोडवावी लागणार आहे.

---

## माझ्या शिरीं — !

माझ्या शिरीं सदैव तो
मेघांचा मुगुट
पण मधुन मधुन
बिजली प्रगट

डोळ्यांतून आसवांचा
सदा वाहे पूर
पण त्यांच्या बिंदूतून
मोतियाचा नूर

मुख सदा टाकितसे
दुःखाचे उसासे
दुःखांतच पण कधीं
शोभे शुभ्र हांसें

वैशाखाच्या काहिलीनें
भाजी दुःख अंग
वळीवाच्या गारव्याचे
त्यांतहि प्रसंग

संसारांत उणीवांचें
असो रडगाणें
पण गुणगुणें जीव
कधी गोड गाणें

निद्रा नित्य दावितसे
स्वप्नें हीं उदास
पण त्यांत कधींमधीं
दिव्यत्वाचे भास.



अनुक्रमणिका





डॉ. शं. गो. तुळपुळे

# आधुनिक महीपति : कै. ज. र. आजगांवकर

महाराष्ट्रभाषाभूषण श्री. जगन्नाथ रघुनाथ आजगांवकर यांच्या मुंबई येथें ता. २७ ऑगस्ट १९५५ रोजीं झालेल्या निधनाची वार्ता ऐकून मराठी भाषेचा प्रत्येक अभिमानी दुःखानें व्यथित होईल यांत शंका नाहीं. वास्तविक पाहतां त्यांचें वय झालेलें होतें, व त्यांना मरण अकालीं आलें असें म्हणण्यास जागा नाहीं. पण तरीहि जुन्या पिढींतील व जुन्या मराठी वाङ्मयाच्या क्षेत्रांतील एक अधिकारी आणि मातब्बर व्यक्ति गेली, कायमची गेली, या विचाराचें दुःख शिल्लक राहतेंच. जुनें माणूस गेलें म्हणजे त्याची जागा भरून निघणें फार कठिण होतें. महाराष्ट्र-सारस्वताचे फार मोठे अधिकारी असे भावे, राजवाडे, पांगारकर हे सर्व गेले व त्यांच्या जागा अजून तरी भरून निघाले-ल्या नाहींत. हीच गोष्ट कै. आजगांवकरांच्या बाबतींतहि होईल अशी साधार भीति वाटते. कारण त्यांनीं केलेलें काम फार मोठें आहे. संतचरित्रकार महिपतीनंतर प्राचीन कवींचीं चरित्रें इतक्या मेहनतीनें व इतक्या मोठ्या संख्येनें लिहिणारे एक आजगांवकरच दिसतात. म्हणून वाटतें कीं, असे प्रचंड उद्योग जसे पुनःपुनः होत नाहींत, त्याप्रमाणेंच महीपति किंवा आजगांवकर याच्यासारखीं माणसेंहि वरचेवर निपजत नाहींत.

कै. आजगांवकरांचा जन्म ता. १६ ऑगस्ट १८७९ रोजीं मालवण तालुक्यांतील वराड या त्यांच्या आजोळच्या गांवीं झाला. सावंतवाडी संस्थानांतील आजगांव हें त्यांचें मूळ गांव व म्हणून ते आजगांवकर. त्यांचे वडील रघुनाथ मुरारी प्रभु आजगांवकर हे लष्करांत नौकर असले तरी प्राचीन मराठी कवितेची रुचि त्यांना होती व तीच पुढें चिरंजीवांत उतरली असें दिसतें. आजगांवकरांचें बालपण गरिबींत गेलें आणि शिक्षणाच्या बाबतींतहि त्यांची ओढाताणच झाली. इ. स. १८९९ सालीं चरितार्थाची सोय पाहण्यासाठीं म्हणून त्यांनीं आज-गांव कायमचें सोडलें. आणि तेव्हांपासून मुंबई, कोल्हापूर, पुणें अशा अनेक ठिकाणीं अनेक प्रकारच्या नोकऱ्या करून अखेरीस इ. स. १९११ सालीं मुंबईस 'इंदुप्रकाश'च्या संपादकीय खात्यांत ते स्थिर झाले. तत्पूर्वी कोल्हापुरास एका स्थानिक पत्राचें व कांहीं दिवस पुण्याच्या 'ज्ञानप्रकाश'च्या उपसंपादकाचें काम त्यांनीं केलें होतें. कै. हरिभाऊ आपटे हे तेव्हां 'ज्ञानेश्वरी-कोशा'चें संपादन करीत होते त्यांत व पुढें पुण्यांतील रे इंडस्ट्रियल म्युझियमचे क्युरेटर म्हणूनहि त्यांनीं कांहीं दिवस काढले. इ. स. १९११ नंतर मात्र त्यांचें वास्तव्य कायमचें मुंबईत झालें. 'इंदुप्रकाश'च्या नौकरीत असतांनाच त्यांनीं 'ज्ञानांजन' या नांवाचें एक मासिक काढलें व तें चांगलें चालूं लागल्यावर 'इंदुप्रकाश' मधील नौकरी त्यांनीं सोडून दिली. पुढें कै. अच्युतराव कोल्हटकरांच्या 'संदेश' पत्राच्या कचेरींत व तसेंच 'रणगर्जना' आणि 'सुधारक' या पत्रांचे संपादक म्हणूनहि त्यांनीं कांहीं काळ काम केलें. अखेरीस त्यांनीं नौकरी करण्याचें कायमचें सोडलें आणि आपलें सर्व लक्ष त्यांनीं 'महाराष्ट्र-कवि-चरित्रा'वर एकवटलें.

याप्रमाणें कै. आजगांवकरांचें जीवनचरित्र आहे. त्यांत जीवनकलहाव्यतिरिक्त सांगण्यासारखें असें विशेष कांहीं नाहीं. त्यांना स्वास्थ्य असें कधीं फारसें मिळालें नाहीं; पण त्याबरोबरच आपला मूळचा वाङ्मयोपासनेचा मनःपिंडहि त्यांनीं सोडला नाहीं. साहित्य हेंच त्यांच्या संसाराचें एकमेव साधन होऊन बसलें व जशी मागणी तसा पुरवठाहि त्यांनीं आपला 'स्वधर्म' सांभाळून केला. त्यांनीं पुष्कळ लिहिलें. जेमतेम इंग्रजी पांच इयत्ता झालेला एक आजगांवकर आपलें कोंकणांतील गांव सोडून मुंबईसारख्या राजधानीच्या नगरीस येतो आणि तेथें राहून दारिद्र्यास तोंड देत देत पांचपंचवीस चांगल्यापैकीं ग्रंथ लिहून पुनः त्यावर आपली उप-जीविकाहि चालवितो ही सर्वच घटना आश्चर्यकारक आहे.








असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं. कै. आजगांवकरांच्या नांवावर नेपाळवर्णन, भरतपूरचा वेढा, इसापनीति, मुलांची करमणूक, प्रणयानंद नाटक अशीं अनेक विषयांवरील अनेक लहानमोठीं पुस्तकें असलीं तरी त्यांचें नांव मुख्यतः प्राचीन-कवि-चरित्रकार म्हणून ऐकूं येतें. या ' कविचरित्र 'मालेचा पहिला भाग इ. स. १९०८ मध्यें प्रसिद्ध झाला व तेव्हांपासून सुमारें ३००० पृष्ठें भरेल इतकें कविचरित्रसाहित्य त्यांनीं एकूण ११ भागांत मिळून प्रसिद्ध केलें. एकूण शेंसवाशें प्रसिद्ध–अप्रसिद्ध अशा जुन्या मराठी कवींचीं चरित्रें त्यांनी लिहिलीं. व प्राचीन मराठी वाङ्मयाच्या भावी इतिहासकारास साधनें उपलब्ध करून देण्याचें फार मोठें काम त्यांनीं एकट्यानें केलें.

कै. आजगांवकर हे एक भाविक संतचरित्रकार होते. प्राचीन मराठी वाङ्मयाचा इतिहास कविचरित्ररूपानें लिहावा या हेतूनें जरी ते प्रारंभीं ग्रंथरचनेस उद्युक्त झाले असले तरी भाविकता हा त्यांचा स्वभावधर्म होता व तो त्यांस शेवटपर्यंत सुटलेला दिसत नाहीं. महीपतीप्रमाणेंच त्यांनींहि हीं कविचरित्रें चिकित्सक वृत्तीनें न लिहितां सश्रद्धतेनें लिहिलीं आहेत. साहजिकच प्राचीन कवींच्या चरित्रांतील सर्व चमत्कार त्यांनीं मोठ्या आवडीनें वर्णिलेले आढळतात. संतचरित्रांतील चमत्कार हा कै. आजगांवकर यांचा एक श्रद्धाविषय होता व त्यास कोणी धक्का लावला तर त्यांना सात्त्विक संताप येई असें म्हणतात. ' अलौकिक चमत्कार ही एक मोठी नाजूक बाब आहे ' असें त्यांनीं म्हटलें आहे (' कविचरित्र ', भाग ८ वा, प्रस्तावना, पृ. २ ). ज्ञानेश्वरांनीं भिंत चालविली, नामदेवांनीं पाषाणाच्या मूर्तीकडून अन्नग्रहण करविलें, एकनाथांनीं स्वर्गस्थ पितरांना प्रत्यक्ष जेवूं घातलें, तुकोबा वैकुंठास सदेह गेले, इत्यादि चमत्कारांवर त्यांचा विश्वास होता व त्यासाठीं त्यांना प्रतिकूल टीकाहि सहन करावी लागली. ही टीका कधींकधीं इतकी कडक होई, कीं कै. आजगांवकरांच्या शब्दांत सांगावयाचें तर ' पातळ कातडीचा एखादा नवशिक्या ग्रंथकार कदाचित् कायमचाच बुजून जावयाचा ! ' परंतु कै. आजगांवकर अशा प्रतिकूल टीकेनें कधीं बुजले नाहींत कीं कधीं वंगलेहि नाहींत ! उलट त्यांनीं ' कविचरित्रां'च्या प्रस्तावनांतून चमत्कारांचें जोरदार समर्थन करण्याचें व्रत अखंड चालूं ठेवलें व या कामीं होता नव्हता तो सर्व पुरावाहि सादर करण्यांत त्यांनीं कसूर केली नाहीं. ' हल्लींच्या एकेश्वरी पंथाचे आद्य प्रवर्तक ' आणि ' सगळ्या रॅशॅनॅलिस्टांचे आदिगुरु ' डॉ. सर रामकृष्ण भांडारकर यांनीं प्रो. कोसंबीकृत ' बुद्धलीलासारसंग्रह ' या ग्रंथावर अभिप्राय देतांना चमत्कारांविषयीं स्वतःचें जें अर्धानुकूल मत दिलें आहे त्याचा तर उपयोग आजगांवकरांनीं करून घेतलाच; पण त्याशिवाय सर ॲम्ब्रोज फ्लेमिंग यासारख्या जगद्विख्यात शास्त्रज्ञानें इ. स. १९३५ च्या जानेवारींत ' Victoria Institute of Philosophical Society of Great Britain ' या संस्थेंत अध्यक्ष या नात्यानें केलेल्या भाषणाचाहि त्यांनीं आधार घेतला. मृतास जिवंत करणें इत्यादि येशू ख्रिस्ताच्या चरित्रांतील चमत्काराविषयींचे, " We have no right to assert that these statements are fictitious, unless we have most carefully examined the evidence and found it certainly invalid". हे त्यांचे उद्गार उद्धृत करून कै. आजगांवकर स्पष्टपणें विचारतात : " सर ॲम्ब्रोज फ्लेमिंग यांच्यासारख्या जग-प्रसिद्ध शास्त्रज्ञाच्या मतापुढें आमच्याकडील ज्ञानलवदुर्विदग्ध बुद्धिप्रामाण्यवादी लोकांच्या दुरटुरीस कितपत महत्त्व द्यावयाचें हें वाचकांनींच ठरवावें. साधु मेलेलीं माणसें जिवंत करूं शकतात असें सर ॲम्ब्रोजसारखे शास्त्रज्ञ सांगत आहेत, तर तुकारामबुवांच्या कीर्तनांत मेलेलें मूल जिवंत झाल्याची गोष्ट खोटी कां मानावयाची ? " कै. आजगांवकरांचा हा सवाल बिनतोड होता ह्यांत शंका नाहीं. चमत्कार म्हणजे साधुत्व नव्हे हें त्यांनाहि मान्य होतें असें दिसतें. 'कविचरित्रा 'च्या द्वितीय भागाच्या प्रस्तावनेंत त्यांनीं स्पष्टपणें म्हटलें आहे कीं, "चमत्कारांवरच साधुत्व अवलंबून आहे असें प्रतिपादन करणाराची खरी जागा म्हणजे वेड्यांचें इस्पितळ होय,...त्याप्रमाणें चमत्कारांची शक्यता शास्त्रज्ञांच्या प्रयत्नानें व अनुभवानें दिवसेंदिवस अधिकाधिक सिद्ध होत चालली आहे, याहि गोष्टीकडे खऱ्या तत्त्वजिज्ञासूनें डोळेझांक करून चालावयाचें नाहीं. " इतकें करूनहि आज समाधान












अनुक्रमणिका

होण्यासारखें नव्हतें त्यांना कै. आजगांवकरांनीं 'तान्प्रति न एष यत्नः' असें अखेरचें सांगून टाकलें ! पांगारकर व आजगांवकर दोघेहि भाविक होते, श्रद्धावन्त होते. परंतु पहिल्याची श्रद्धा अंध तर दुसऱ्याची डोळस होती असें म्हणणें भाग आहे. आपणांस कविचरित्रांसाठीं जें साहित्य उपलब्ध होतें तेंहि भगवत्कृपेनें किंवा यदृच्छेनें होतें अशी कै. आजगांवकरांची श्रद्धा होती व ती त्यांनीं महीपतीप्रमाणें अनेक ठिकाणीं बोलूनहि दाखविली आहे. या दृष्टीनें, आपणांस आजगांव येथें एका शेतकऱ्याच्या झोपडींत पैठणचा साधुकवि कृष्णदयार्णव यांची कविता कशी मिळाली किंवा ज्योतिपंत दादा महाभागवतांच्या भागवताचे दोन हस्तलिखित अध्याय जुन्या बाजारांत एका बोहऱ्यापाशीं कसे उपलब्ध झाले, याची त्यांनीं सांगितलेली हकीगत वाचनीय आहे ( भाग ५ वा. प्रस्ता पृ. १३ ).

महाराष्ट्र-कविचरित्र-लेखनाकडे आपली प्रवृत्ति कशी झाली याविषयीं एक सविस्तर निवेदन कै. आजगांवकर यांनीं 'कविचरित्रा'च्या पहिल्या भागाच्या प्रस्तावनेंत केलेलें आढळतें. ते लिहितात : " आमचे वडिल कै. रघुनाथ मुरारी प्रभु आजगांवकर यांस जुन्या कवितेची फार आवड होती ...... त्यांच्या सहवासामुळें मलाहि जुन्या कवितेची आवड उत्पन्न झाली. वयाच्या विसाव्या वर्षांपर्यंत वामन, तुकाराम, श्रीधर, महीपति, सोहिरोबा, मुक्तेश्वर, रामदास वगैरे कवींची बरीच कविता मीं लक्ष्यपूर्वक वाचली व सुमारें १९०२ सालीं मुंबईत 'मरीन लाइन्स हेल्थ कॅंप व्याख्यनमालें'त 'वामन-पंडित' या विषयावर एक बराच मोठा निबंध लिहून तो रा. श्रीकृष्ण नीलकंठ चाफेकर यांच्या अध्यक्षतेखालीं मीं वाचून दाखविला. त्यानंतर पुढील सहा महिन्यांत मुक्तेश्वर, जयराम, रंगनाथ, कृष्णदयार्णव वगैरे कवींवर लहानमोठे निबंध लिहिले व या सर्व निबंधांचें एक स्वतंत्र पुस्तक छापावें असें ठरवून त्या वेळचे मुंबईंतील एक सुप्रसिद्ध व सज्जन नागरिक प्रो. नारायण गुणाजी वेलिणकर यांस भेटलों. ते म्हणाले 'माझा स्वतःचा मराठीचा फारसा अभ्यास नाहीं, म्हणून तुम्ही प्रसिद्ध ग्रंथकार रा. सा. विनायक कोंडदेव ओक यांजकडे जा व त्यांना आपला ग्रंथ दाखवा. त्यांनीं जर अनुकूल अभिप्राय दिला, तर ग्रंथाच्या प्रसिद्धीकरणाची तजवीज मी करीन !' त्याप्रमाणें रा. सा. ओक यांजकडे मी गेलों. ते त्यावेळीं मरीन लाईन्स स्टेशनाजवळील हेल्थ कॅंपांत रहात होते. मी तेथें गेलों त्या वेळीं ते एका सतरंजीवर बसून कांहींतरी वाचीत होते व त्यांचे चिरंजीव रा. गोपीनाथपंत हे जवळच पलीकडे बसले होते. रावसाहेबांस नमस्कार करून व ग्रंथाची हस्तलिखित प्रत त्यांजपुढे ठेवून मी म्हटलें, 'कृपा करून हें पुस्तक आपण वाचून पहावें, व आपला जो काय अभिप्राय होईल तो सवडीप्रमाणें मला कळवावा !' माझें वय पाहून आणि 'महाराष्ट्र-कविचरित्र' हें ग्रंथाचें नांव ऐकून रावसाहेबांस आश्चर्य वाटलें व ते विनोदानें म्हणाले, 'तुमच्यासारखीं मुलें जर असल्या विषयांवर लिहूं लागलीं तर आमच्यासारख्यांनीं काय करावें ? ' तेव्हां त्यांचे चिरंजीव गोपीनाथपंत यांनीं नम्रतापूर्वक त्यांस म्हटलें, 'बाबा, आपण त्यांचा ग्रंथ ठेवून घेऊं व वाचून पाहूं. तो चांगला आहे असें जर आपणांस दिसून आलें तर तसा अभिप्राय देऊं, चांगला नाहीं असें वाटलें तर तसें लिहून देऊं !' 'ठीक आहे' असें म्हणून रा. सा. ओक यांनीं ग्रंथ ठेवून घेतला व पुन्हा पंधरा दिवसांनीं भेटण्यास सांगितलें. त्याप्रमाणें १५ दिवसांनीं मी त्याच ठिकाणीं पुन्हा त्यांस भेटलों. पण या वेळीं सगळें वातावरण साफ बदलून गेलेलें दिसलें. मला पाहतांच रावसाहेबांनीं मोठ्या बहुमानानें मला आपल्या शेजारीं बसविलें व माझ्या ग्रंथाची बरीच तारीफ करून स्वहस्तें अनुकूल अभिप्राय लिहून दिला. या अभिप्रायांत पुढील वाक्यें आहेत :- 'महाराष्ट्र-कविचरित्र हा ग्रंथ चांगला झाला आहे. पुष्कळ शोध करून तुम्हीं जें काय लिहिलें आहे, तें फार वाचनीय आणि विचारणीय आहे. तुमचा प्रयत्न फार स्तुत्य आहे; त्यांत तुम्हांस त्या कवींच्या प्रसादानें व परमेश्वरकृपेनें यश यावें असें मी मनापासून इच्छितों." रावसाहेबांचा हा अभिप्राय मी प्रो. वेलिणकर यांस दाखविला. त्यांनीं

" देवधर्म न मानणारा, साधुसंतांची टवाळी करणारा, व स्वतःच्या बुद्धीस अगम्य असें सृष्टींत कांहींच नाहीं असें समजून हिरण्यकशिपूप्रमाणें स्वतःसच प्रतिपरमेश्वर मानणारा जो एक नवीन कंपू महाराष्ट्रांत हल्लीं निर्माण झाला आहे त्याच्यासाठीं हा ग्रंथ नाहीं " — ( भाग ९ वा, प्रस्तावना, पृ. ८ ).








बाबाजी सखाराम आणि कंपनीचे मालक कै. माधवराव डुकले यांस पत्र देऊन मला त्यांजकडे पाठविलें. कै. डुकले यांनीं रोख १५० रु. देऊन ग्रंथ कायमच्या हक्कासह विकत घेण्यास आपण तयार आहों असें सांगितलें. त्या वेळच्या मानानें हा मोबदला वाजवीपेक्षां थोडासा अधिकच होता. परंतु दुसरीकडे कदाचित् याहून अधिक मोबदला मिळेल अशा समजुतीनें तो सौदा मी नाकारला व त्यावेळीं बडोद्याहून नुकतेच येथें येऊन राहिलेले रा. दामोदर सावळाराम यंदे यांजकडे ग्रंथ घेऊन गेलों. त्यांचें पहिलें कुटुंब त्याचवेळीं निवर्तलें होतें, व यामुळें तें थोडेसे उदासीनच होते. तरी पण, तशा स्थितींतहि माझा ग्रंथ त्यांनीं वर वर चाळून पाहिला व ' ग्रंथ फार लहान आहे, तो आणखी थोडासा वाढवून द्या, म्हणजे छापूं ' असें सांगितलें. त्यानंतर मी मुंबई सोडून कोल्हापूरास गेलों व तेथें सुमारे दोन वर्षें राहिलों. तेवढ्या मुदतींत आणखी कांहीं कविचरित्रें लिहिलीं व सुमारें ५०० छापील पृष्ठें होतील इतका मजकूर लिहून झाल्यावर तो रा. यंदे यांजकडे पाठविला. पुढें मी कोल्हापूर सोडून पुण्यास आलों व त्यानंतर दोन वर्षांनीं १९०८ सालीं कविचरित्राचा हा पहिला भाग प्रसिद्ध झाला. ''

'महाराष्ट्र-कविचरित्र' मालेचा उद्गम याप्रमाणें झाला. तिचा पहिला भाग १९०८ मध्यें झाल्यावर ' केसरी ', ' काळ ', ' मुमुक्षु ', ' सुधारक ' वगैरे पत्रांतून त्यांवर अनुकूल अभिप्राय आले व 'विविधज्ञानविस्तार' आणि 'सरस्वतीमंदिर' या मासिकांतून प्रतिकूल टीकाहि झाली. 'केसरीं'त ' स्फुट सूचना ' या सदराखालीं ' कविचरित्रां 'चा परिचय खुद्द लो. टिळकांच्या हस्तें होण्याचा मान कै. आजगांवकरांना मिळाला. त्यांत लो. टिळकांनीं म्हटलें होतें, '' निरनिराळ्या उपलब्ध साधनांची तारतम्यानें छाननी करून कवीचें संगतवार चरित्र लिहिणें त्याचें ग्रंथांतील निवडक वेंचे देणें व कवीच्या काव्यांचें परीक्षण करून त्याची मराठी वाङ्मयांतील जागा मुक्रर करणें, हें काम मोठ्या मेहनतीचें, मार्मिकतेचें व रसिकतेचें असून ते रा. आजगांवकर यांनीं योग्य रीतीनें चालविलें आहे यांत संशय नाहीं. महाराष्ट्र-कवींच्या चरित्रांचें व काव्यांचें अशा मार्मिक व संकलित रीतीनें समालोचन करण्याचा हा मराठी भाषेंतील पहिलाच प्रयत्न आहे. '' कै. पांगारकर यांनीं आपल्या ' मुमुक्षु ' पत्रांत पुढील अभिप्राय व्यक्त केला : '' हा सत्तावीस कविरत्नांचा हार आजगांवकरांनीं महाराष्ट्र-शारदेच्या गळयांत प्रेमानें, भक्तीनें व आदरानें घातला आहे, तो निरंतर तिच्या गळयांत चमकत राहील अशी खात्री वाटते. सत्कविता कशा पद्धतीनें वाचायला पाहिजे हें या ग्रंथावरून लोकांस चांगलें समजेल. आजगांवकरांची भाषा साधी, प्रेमळ व प्रसंगविशेषीं खोंचदार अशी आहे. '' कवि-चरित्राच्या या पहिल्या भागांत मुकुंदराज, ज्ञानदेव, नामदेव इत्यादि अठरा एकनाथपूर्व कवींचीं चरित्रें आलीं आहेत.

' कविचरित्रा 'चे पहिले तीन भाग कै. दामोदर सावळाराम यंदे यांनीं प्रसिद्ध केले व चौथा भाग, त्यावेळीं कै. यंदे यांनीं दैनिक ' इंदुप्रकाशा 'चें मोठें काम अंगावर घेतल्यामुळें, कै. आजगांवकर यांनीं स्वतः आपल्या ' ज्ञानांजन ' मासिकांत प्रसिद्ध केला. यापुढील चार भागांचें प्रकाशन कांहीं उदार व गुणज्ञ धनिकांचा आश्रय मिळाल्यानेंच शक्य झालें असें स्वतः लेखक सांगतात. या धनिकांत व सहायकांत श्रीमंत राजाराममहाराज छत्रपति, कोल्हापूर, श्रीमंत गायकवाड सरकार, डॉ. नानासाहेब देशमुख, सौ. सरोजिनी नायडू, डॉ. भडकमकर, बॅ. मुकुंदराव जयकर, श्री. बाळासाहेब खेर, श्री. बर्जोरजी फ्रामजी, भरूचा, बॅ. बॅप्टिस्टा, अशीं विविध व्यवसायांतील मंडळी असलेलीं दिसतात. यावरून कै. आजगांवकरांच्या अंगीं लोकसंग्रह करण्याचा गुण कसा होता तें कळून येईल. तसेंच ही कविचरित्रमाला त्यांनीं एकट्यानें लिहून पूर्ण केली असली तरी या कामीं त्यांना अनेक निकटस्थ व तसेंच दूरस्थ माहितगारांची मदत घ्यावी लागली व हें ऋण त्यांनीं प्रत्येक ठिकाणीं आनंदानें मान्य केलेलें दिसतें. या मंडळींत ग्वाल्हेरचे श्री. भालेराव, सोलापूरचे श्री. सामंत वकील, वरोऱ्याचे रा. श्रीहरि देशपांडे, नगरचे श्री. रसाळ, नांदेडचे श्री. गणपतराव सराफ कंधारकर, यांसारखीं फार प्रसिद्ध नसलेलीं पण आस्थेवाईकपणानें माहिती पुरविणारी मंडळीहि आहेत. परंतु यांपैकीं कोणाचाहि साभार नामनिर्देश करावयास कै. आजगांवकर चुकलेले नाहींत. आठव्या भागाच्या प्रस्तावनेच्या शेवटीं ते म्हणतात: ''या ग्रंथांत माझें स्वतःचें असें कांहींच नाहीं; जुन्या ग्रंथांच्या आधारावर हा







सगळा डोलारा उभारलेला आहे. ' एकेक अक्षराची भीक। जीर्ण कवींतें मागोनि देख। मी सर्वज्ञ कविनायक। ऐसें म्हणविलें लौकिकीं॥ ' असे उद्गार महाकवि मुक्तेश्वर यांनीं स्वतःच्या कवितेसंबंधीं जेथें काढले आहेत, तेथें माझ्यासारख्यानें स्वतंत्र ग्रंथरचनेची शेखी मिरविण्यांत काय हंशील आहे ? "

कै. आजगांवकरांच्या वरील उद्गारांत जसा विनय आहे, तसेंच थोडें सत्यहि आहे. कारण त्यांचें हें ' कविचरित्र 'शतक इतिहास या दृष्टीनें आदर्श आहे असें कोणीच म्हणणार नाहीं. आपल्या कविचरित्रांची तुलना डॉ. जॉन्सनच्या " Lives of Poets " शीं करूं नये असें खुद्द कै. आजगांवकर यांनीं एका पहिल्या भागांच्या प्रस्तावनेंत म्हणून ठेवलें आहे ( पृ. ८ ). तेव्हां त्या दृष्टीनें या चरित्रमालेची परीक्षा न करणेंच बरें. परंतु ' कविचरित्र 'काराकडून कांहीं अपेक्षा केव्हांहि असतीलच. त्यांतील मुख्य ही कीं, त्यास काव्य व इतिहास हीं दोन्हीं अंगें चांगलीं अवगत असावीं लागतात. आमच्या मतानें कै. आजगांवकरांच्या बुद्धीचीं हीं दोन अंगें तितकीं परिपुष्ट झालेलीं नव्हतीं. काव्याच्या बाबतींत त्यांच्या अंगीं कै. पांगारकरांची किंवा कै. भाव्यांची अव्वल दर्जाची रसिकता नव्हती आणि इतिहासाच्या बाबतींत ते कै. राजवाड्यांप्रमाणें चोखंदळहि नव्हते. त्यामुळें त्यांचीं ही कविचरित्रें काव्यदृष्टीचें किंवा इतिहासदृष्टीचें संपूर्ण समाधान करूं शकत नाहींत. त्यांत पाल्हाळ, पुनरुक्ति, अनाठायीं अवास्तव भर, प्रमाणबद्धतेचा अभाव, उताऱ्यांचा अतिरेक, गोष्टीवेल्हाळपणा इत्यादि दोष तर आहेतच. पण मुख्य म्हणजे चरित्र किंवा इतिहास लिहावयास लागणारी बुद्धीची तर्कनिष्ठा आणि कविकाव्याची अचूक पारख करणारी मार्मिकता हे दोन्ही गुण लेखकापाशीं होते त्यांहून अधिक प्रमाणांत असण्याची आवश्यकता होती असें आम्हांस वाटतें. रामदासचरित्र तेंच. पण कै. भावे, कै. पांगारकर, कै. राजवाडे किंवा श्री. देव यांनीं सांगितलें म्हणजे वैशिष्ट्यपूर्ण वठतें व आजगांवकरांचें तसें वठत नाहीं, सपक वाटतें याचें कारण हेंच. ' तुकारामचरित्रा 'च्या प्रस्तावनेंत ते लिहितात : " साहित्य तेंच. मालमसालाहि तोच, पण बल्लवाचार्य निराळे, त्यामुळें स्वयंपाकाच्या रुचींत जसें अंतर पडतें त्याचप्रमाणें मूळ पुरावा आणि माहिती यांत कांहीं फरक नसला तरी भाषासरणी, विचारसरणी आणि आवडनिवड भिन्न असल्यामुळें, निरनिराळ्या लेखकांच्या एकाच विषयांवरील वाङ्मयांत रुचीच्या दृष्टीनें वैचित्र्य उत्पन्न झाल्याशिवाय राहत नाहीं " (भाग ९, प्रस्ता० पृ. ६). कै. आजगांवकरांचें हें म्हणणें खरें असलें तरी त्यांनीं चरित्रें – निदान ज्ञानेश्वरतुकारामांसारख्या महाकवींचीं चरित्रें वैशिष्ट्यपूर्ण नाहींत असें म्हणणें भाग पडतें. तीं आबाल सुबोध आहेत, इतकेंच फार तर म्हणतां येईल. परंतु आमच्या मतें त्यांचें मोठेंपण या चरित्रांत नसून तें त्यांनीं परिश्रमपूर्वक माहिती गोळा करून सजविलेल्या अप्रसिद्ध व बारीकसारीक अशा कवींच्या चरित्रांत आहे. किंबहुना ' उपेक्षित-कविचरित्रकार ' ही पदवी त्यांच्या बाबतींत अनेक अर्थांनीं सार्थ होईल, असें आम्हांस वाटतें. कारण ज्ञानेश्वर-तुकाराम सर्वांना ठाऊकच आहेत. पण हरि नारायण, लिंगनाथ योगी, चिदंबरदास राजाराम, रघुपति महाराज, गणपतराव साधु, ठाकुरदास बावा, दादा नाईक भिडे, नगाजी महाराज, पांडुरंग दाढी, नाथ भुजंग अशा एक दोन नव्हे तर चांगल्या पांचपन्नास अप्रसिद्ध कवींची माहिती त्यांनीं कणाकणानें गोळा करून चरित्ररूपानें पुढें केली हें कै. आजगांवकरांचें खरें कार्य होय. ते नसते तर या इतिहासास आपण मुकलों असतों असें ज्याविषयीं म्हणतां येईल अशीं पांचपंचवीस कविचरित्रें तरी त्यांच्या संग्रहांत निश्चितपणें आहेत. मराठी वाङ्मयाच्या इतिहासरचनेस त्यांचा उपयोग किती आहे हें निराळें सांगण्याची जरूरी नाहीं. आपल्या चरित्रग्रंथांत ' फर्स्ट हँड इन्फर्मेशन 'चा अगदीं अभाव आहे असें कोणीं समजूं नये असें कै. आजगांवकरांनीं म्हटलें असलें [ भा. ५ प्रस्ता. पृ. १ ] तरी हें म्हणणें त्यांनी रचिलेल्या लघुकवींपैकीं कांहींच्या चरित्रांस व तें सुद्धां कांहीं अंशीं लागूं पडेल. आजगांवकर हे बव्हंशीं एक संकलनकार होते असेंच कोणीहि म्हणेल. कारण त्यांच्या ग्रंथांतून संशोधन किंवा नवज्ञान असें फार थोडें असून जें आहे तेंहि पुनः कोंकण किंवा गोवें प्रांतातील सामान्य कवींपुरतें मर्यादित आहे. थोडें धाडस करून असेंहि म्हणतां येईल, कीं आजगांवकर हे एक सामान्य बुद्धीचे व सामान्य आटोपाचे असे सामान्य










लेखक होते. परंतु त्यांना सामान्य ठरविण्यांत त्यांचा किंवा त्यांनीं केलेल्या कार्याचा अवमान होतो असें मात्र कोणीं समजूं नये. उलट, आजवरचा अनुभव सर्वांचा असाच आहे कीं सामान्य माणसांच्या हातूनच नेहमीं असामान्य कामें होतात. जे असामान्य आहेत, ते कित्येकदां आळसानें म्हणा किंवा अहंकारानें म्हणा कोळपून जातात आणि जगास त्यांचा उपयोग विशेष होत नाहीं. तेव्हां कै. आजगांवकरांना सामान्य म्हणण्यांत त्यांचा अवमान नाहीं; उलट, एक प्रकारचा गौरव आहे. शिक्षण व परिस्थिति हीं बेतावाताचीं असतांना त्यांनीं कविचरित्रलेखनाचा जो प्रचंड उद्योग करून दाखविला त्यास दाखला द्यावयाचा तर संत-चरित्रकार महीपतिबोवांचाच देतां येईल.

कै. आजगांवकरांशीं आमचा परिचय मुळींच नव्हता म्हटलें तरी चालेल. नाहीं म्हणा-वयास मागील वर्षीं त्यांनीं लिहिलेलें एक सविस्तर पत्र आमचेपाशीं आहे. या पत्रांत त्यांनीं आपण 'महाराष्ट्र-कविचरित्रां'च्या सर्व भागांची मिळून द्वितीयावृत्ति काढीत आहों व त्यासाठीं महाराष्ट्र-सारस्वतास अलीकडे जोडलेल्या 'पुरवणी'ची फार जरूरी आहे, असें लिहून त्यांनीं इतरहि कांहीं गोष्टी सूचित केल्या होत्या. मनाचे आणि शरीराचे सर्व व्यापार थकत आलेले असतांना ते 'कविचरित्रां'च्या द्वितीय आवृत्तीची योजना आंखीत होते व त्यासाठीं जरूर ते परिश्रम करण्याची त्यांची तयारी होती ही एकच गोष्ट त्यांच्या साहित्य-विषयक निष्ठेची साक्ष पटविण्यास पुरेशी आहे. प्रस्तुत लेखकास अनुभव नाहीं, परंतु असें म्हणतात कीं, त्यांच्या अंगीं रसाळ असें वक्तृत्वहि असून त्यांची वाणी संतवचनामृतांत भिजून चिंब झालेली होती. तसेंच हीं संतवचनें त्यांच्या वृत्तींतहि उमटलेलीं दिसत असा निर्वाळा अनेकांनीं दिला आहे. एक 'निरहंकारी, निर्मत्सर, शालीन, सत्प्रवृत्त, निर्वैर व कर्मयोगी सज्जन' असा साहित्यिक गेला या किंवा यांसारख्या शब्दांनीं कै. आजगांवकरांचें गुणगान बहुतेकांनीं केलें आहे. वृत्तपत्रांत सर्वच शब्दांचे अर्थ थोडेफार खालीं येतात ही गोष्ट खरी असली तरी आजगांवकरांच्या अंगीं ज्ञाने-श्वर-तुकारामांच्या ठिकाणीं शोभून दिसणारीं हीं सर्वच संतलक्षणें पूर्णत्वानें असतील असें त्यांच्या लेखनावरून तरी वाटत नाहीं. अगदीं अलीकडे श्री. प्रियोळकर यांनीं संपादित केलेल्या मुक्तेश्वरी-आदिपर्वाच्या निमि-त्तानें त्यांनीं एका वृत्तपत्रांतून या संशोधकावर जी वैयक्तिक आणि बेताल टीका केली ती कोणीहि झालें तरी अश्लाघ्यच म्हणेल. परंतु कवित्व आणि संतत्व हीं नेहमीं एकत्र नांदतात हा सिद्धान्त साफ चूक असून कै. आजगांवकरांच्या कार्याचें परीक्षण या दृष्टीनें करणें केव्हांहि बरोबर होणार नाहीं. ते साहित्यकार होते व त्यांची परीक्षा साहित्यकार म्हणूनच व्हावयास पाहिजे. ते सज्जन होते. परंतु त्याबरोबरच त्यांच्या अंगीं संतत्व चिकटविण्यांत कांहीं अर्थ नाहीं. कदाचित् त्यांनाहि हें आवडलें नसतें.

असो. श्री. आजगांवकरांच्या निधनानें महाराष्ट्र-भाषेचें एक भूषण नाहींसें झालें. प्राचीन मराठी कवि-तेच्या अभ्यासकांवरील त्याचे उपकार फार आहेत. त्यांतून उतराई होण्याचा एक मार्ग म्हणजे आज दुर्मिळ असलेल्या त्यांच्या 'कविचरित्रा'च्या सर्व भागांची एक संशोधित आवृत्ति प्रसिद्ध करणें हा होय. हें केलें तर या आधुनिक महीपतीच्या आत्म्यास संतोष लाभेल!

---

## शासनमुक्त समाजाकडे

आईच्या पोटांतील गर्भांत जें मूल वाढतें त्यास आईकडूनच पोषण मिळतें. परंतु त्याची जाणीव त्या गर्भांत वाढणाऱ्या जीवास नसते. अशाच प्रकारें समाजवादास सर्वोदयाकडून पोषण मिळतें. आम्हांला शासनाकडून किंवा शासनहीनतेकडून सुशासनाकडे जावयाचें आहे. आणि सुशासनांतून शासनमुक्तीकडे जावयाचें आहे. अशा प्रकारें आम्ही एक पाऊल पुढें जाऊं. ज्याप्रमाणें सामान्य असंयमी माणसास गृहस्था-श्रम शिकविल्यानंतर तो गृहस्थ बनतो आणि त्यांत संयम उतरतो, परंतु तो गृहस्थाश्रमांतच स्थिरावला आणि वानप्रस्थाश्रमाकडे न जाऊं लागेल तर त्याची खऱ्या अर्थानें प्रगति होऊं शकणार नाहीं आणि गृहस्थाश्रम त्यास संयमासाठीं साधक झाला होता तो बाधक ठरेल. असंयम दूर करण्यासाठीं गृहस्थाश्रम स्थापन करावयास पाहिजे आणि गृहस्थाश्रमाच्या समोर वानप्रस्थाचा आदर्श ठेविला पाहिजे. त्याचप्रमाणें आजच्या समाज-रचनेंत शासनमुक्ति हें ध्येय समोर ठेवून सुशासन चालवावयास पाहिजे. आणि दुसऱ्या बाजूला शासनमुक्तीसाठीं जनशक्ति संघटित करण्याचा प्रयत्न करावयास पाहिजे.





अनुक्रमणिका

प्रा. देविदास दत्तात्रय वाडेकर

# धर्माचें मानवी जीवनांतील स्थान

'नवभारत'- जुलै ( १९५५ )च्या अंकांत आचार्य शंकरराव जावडेकर यांनीं लिहिलेल्या 'धर्म व समाजक्रांति' या लेखांत एका महत्त्वाच्या प्रश्नाची चर्चा करून त्याबाबत त्यांनीं आपली एक निश्चित भूमिका मांडली आहे. "समाजक्रांतीला धर्माचें अधिष्ठान देणें इष्ट आहे किंवा नाहीं ?" ( पृ. ३२, स्तंभ १ ) असा प्रश्न त्यांनीं उपस्थित केला असून, त्यास उत्तर देण्याच्या निमित्तानें त्यांनीं प्रथम युरोपीय व आशियाई – विशेषतः भारतीय इतिहास व त्यांतील सामाजिक व राजकीय मतप्रणाली यांचा परामर्श घेऊन त्यांनीं असा निष्कर्ष काढला आहे कीं युरोपीय इतिहासांत तेथील कांहीं विशिष्ट बनावामुळें ( म्हणजे तिकडे धर्मसंस्थेनें राज्यसंस्था व धनिकवर्ग यांच्याशीं हातमिळवणी केल्यानें ) धर्म हा क्रांतीच्या आड आला असला तरी व तेथील क्रांतिकार्य हें त्याची धर्माशीं फारकत झाल्यामुळें संहारक बनलें असलें तरी अलीकडील भारतीय इतिहासांत महात्मा गांधींच्या सत्याग्रही सर्वोदयवादाच्या उदयामुळें धर्म व क्रांति यांचा विरोध तर नाहींसा झाला आहेच, परंतु "सामाजिक व आर्थिक क्रांति घडवून आणणें हेंच धर्मकार्य" ( पृ. ४०, स्तंभ २ ) ठरलें आहे. म्हणजे खऱ्या धर्मप्रेरणेची जोपासना हेंच समाजक्रांतीचें साधन होय असें प्रस्थापित झालें आहे, व म्हणून समाजक्रांतीसाठीं धर्माचीच कांस धरली पाहिजे. किंबहुना, समाजक्रांति ही सुद्धां "धर्मासाठीं व मोक्षासाठींच" (पृ. ३९, स्तंभ २) हवी असते. आचार्यांची ही भूमिका स्पष्ट व निस्संदिग्ध अशीच आहे.

या लेखांतील आचार्यांच्या भूमिकेसंबंधीं 'नवभारत'-च्या पुढील ( ऑगस्ट ) अंकांत प्रा. श्र. भि. शहा यांनीं **'धर्म क्रांतिकारक कीं क्रांतिविरोधी ?'** हा हा लेख लिहून आचार्यांचा वरील धर्मविषयक दृष्टिकोण व सिद्धांत खोडून काढण्याचा प्रयत्न केला आहे. आचार्य जावडेकरांनीं "धर्माची तरफदारी करतांना त्यांतील अनिष्ट गोष्टी काढून, त्याला चांगला 'तावून सुलाखून', सोज्ज्वल करून घेतला आहे" हें मान्य करूनहि, प्रा. शहा म्हणतात कीं "धर्म सामाजिक व मानसिक क्रांति घडवून आणण्याचें साधन म्हणून किती प्रभावी होऊं शकेल याची वानवाच आहे." ( पृ. ३९, स्तंभ १ ). किंबहुना, "धर्म हा किती अपायकारक होऊं शकतो याचें हिंदुस्थानची झालेली फाळणी हें मूर्तिमंत उदाहरण आहे." ( कित्ता ) धर्माची आपली कल्पना विशद करतांना आचार्यांनीं महात्मा गांधींचा जो एक धर्माचें स्वरूप सांगणारा उतारा आपल्या पसंतीसह दिला आहे त्यांतील ( ईश्वरादिकांच्या उल्लेखांवरून स्पष्ट होणाऱ्या ) गूढवादी छटेचा उल्लेख करून प्रा. शहा विचारतात : "जी गूढवादी धार्मिक अनुभूति ज्ञानविज्ञानक्रियेचे दरवाजेच बंद करून टाकते तिला क्रांति घडवून आणणारी विमोचक शक्ति म्हणणें कितपत सयुक्तिक होईल ?" आणि धर्मभावनेच्या द्वारां समाजांत क्रांति कशी घडवून आणावी याचें जें गांधीप्रणीत सर्वोदयवादी नवें तंत्र किंवा शास्त्र भारतांत निर्माण झालें आहे त्यापासून इष्ट तो बोध आशियांतील इतर राष्ट्रांचे नेतेहि घेऊं लागले आहेत ( जुलै अंक, पृ. ३७ स्तंभ २ ) हा जो आचार्यांचा अभियोग त्यासहि अनुलक्षून प्रा. शहा चिवटपणें विचारतात : "आशियांत असा कोणता देश आहे कीं ज्यांतील नेत्यांना आचार्यांप्रमाणें धर्म ही एक विमोचक व क्रान्तिकारक शक्ति वाटते ?" ( ऑगस्ट अंक, पृ. ४२, स्तंभ २ ) खुद्द भारतांत काय वस्तुस्थिति आहे ? प्रा. शहा उत्तर देतात : "भारतांत सत्ताधारी पक्षानें गांधीवादाचा व्यवहारांत तरी पूर्णपणें त्याग केला आहे."

आचार्य जावडेकर व प्राध्यापक शहा यांच्या लेखांतील परस्परविरोधी भूमिका या अशा आहेत. या दोन्हींचें समीक्षण करून त्यांचा कांहीं समन्वय साधतां येईल काय तेंच या लेखांत पहावयाचें आहे.

पहिली गोष्ट ही कीं या वादांत 'धर्म' म्हणजे काय याची आपली कल्पना स्पष्ट व निश्चित केल्यानंतरच जीवनांत धर्म हा क्रांतीला अनुकूल किंवा प्रतिकूल यासंबंधीं आपलें मत निश्चित बनवितां येईल. आचार्य जावडेकरांनीं धर्माची आपली कल्पना सांगतांना गांधींच्या कांहीं ( १९२१ व १९४० सालच्या ) उद्गारांचा आश्रय घेतला आहे. त्यांचा निष्कर्ष असा कीं धर्म म्हणजे मानवाच्या मनांतील स्वतःच्या विधात्याशीं असलेल्या संवादसंबंधाची जाणीव (१९२१); अथवा धर्म म्हणजे विश्वाच्या

नीतिव्यवस्थेवरील श्रद्धा (१९४०). यावरून गांधींचा धर्म म्हणजे कोणताहि विशिष्ट पंथ नव्हे, तर ती " मानवी अंतःकरणांतील एक सनातन वृत्ति असून तिची व्याप्ति हिंदुधर्माहून किंवा इतर कोणत्याहि विशिष्ट धर्माहून अधिक असून तिच्यामुळें आपल्या स्वभावांतच क्रांति घडून येते. ... याच अधिष्ठानावर सर्व धर्मांची उभारणी झालेली असून नीतिशास्त्र व अध्यात्मशास्त्र यांचा तो सनातन आधार आहे. या सनातन आधाराच्या अधिष्ठानावर व या सर्वव्यापक सर्वश्रेष्ठ धर्मभावनेला आपल्या जीवनांत मूर्तस्वरूप देण्यासाठींच आपण राजकीय व सामाजिक क्रांतीचें कार्य करीत असून त्यांतूनच नवी सर्वोदयकारी समाजघटना व मानवसंस्कृति यांची निर्मिति होणार आहे, अशी म. गांधींची निष्ठा होती. त्यांच्या या निष्ठेस 'सत्याग्रही सर्वोदयवाद' असें नांव प्राप्त झालें आहे. या विचाराच्या लोकांची धर्मभावना क्रांतिकारक असून त्यांची क्रांतिकारकता धर्म-प्रेरित व अध्यात्म-निष्ठ आहे. " अर्थात् हीच ती स्वतः आचार्यांसहि मान्य असणारी धर्मकल्पना. म्हणजे या गांधीप्रणीत आचार्यमान्य धर्मकल्पनेंत विश्वविधाता वा विश्वव्यवस्था व त्यांशीं मानवाचा संबंध या प्रत्यक्षातीत अंतिम पारलौकिक किंवा परस्पर्शी सार तत्त्वांचा अनिवार्य अंतर्भाव आहे हें उघड आहे. असें असतांना आचार्य त्याच लेखांत (जुलै अंक, पृ. ४०, स्तंभ १) काय म्हणतात तें पहा : " भारतांतील विचारास मिळालेल्या या ( गांधीवादी ) दीक्षेचा परिणाम ( भारतांत ) असा झाला आहे कीं, धर्म म्हणजे पारलौकिकता व मोक्ष म्हणजे संसारनिवृत्ति व पलायनवाद हें धर्मभावनेचें विकृत स्वरूप नष्ट झालें. मानवाचा स्वर्ग **इहलोकांतच** अवतरला पाहिजे आणि मोक्षप्राप्तीचा आत्मानंद समाजांत क्रांतिकारक प्रयत्न करीत असतांना **ऐहिक जीवनांतच** उपभोगितां आला पाहिजे अशी धर्माची व मोक्षाची अभिनव दृष्टि भारतांत निर्माण झाली आहे. " ( जाड ठसा आमचा. ) म्हणजे या उताऱ्यांत पूर्वी धर्माचें सारभूत समजण्यांत आलेलें परलोकस्पर्शित्व या उताऱ्यांत सोडून देण्यांत आलें आहे हें उघड दिसतें ! तेव्हां आचार्यांच्या धर्मकल्पनेंत थोडी धरसोड दिसते असें वाटतें. आणि आधुनिक जगांतील विविधधर्मसंप्रदायी समाजांतहि धर्म हीच खरी समाजक्रांतिकारी प्रेरणा ठरली पाहिजे, असें प्रतिपादन करणाऱ्या विचारसरणींत अशी धरसोड येणें अटळ आहे, असें आम्हांस वाटतें.

याचें कारण असें : धर्माच्या व्याख्येंत देवस्पर्शित्व किंवा परलोकस्पर्शित्व हे धर्माचे व्यवच्छेदक गुण आहेत, असें धर्माच्या इतिहासाचें किंवा धार्मिक जीवनाचें अवलोकन केल्यास आढळेल. मानवाच्या धार्मिक जीवनकलापांत अनेक प्रकारच्या मानवी विचार-भावना-प्रवृत्तींचे व्यापार आढळतील. परंतु त्या सर्व व्यापारांस धर्मस्वरूपी किंवा धार्मिक बनविणारा गुण म्हणजे त्यांचें पराभिमुखत्व. या नामरूपविश्वाच्या मागें कांहीं परतत्त्व वा देवतत्त्व आहे व त्याशीं माझा संबंध आहे ही सारभूत कल्पना सर्व धर्मकल्पनांच्या बुडाशीं असलेली दिसून येईल. धार्मिक जीवन म्हणजे परस्पर्शी किंवा देवस्पर्शी जीवन होय. तदितर जीवनास धार्मिकता चिकटवितां येणार नाहीं. – आणि ही गोष्ट एकदां मान्य केल्यानंतर त्यावरून पुढील पायरी अशी कीं या धर्मांतर्गत परतत्त्वाचा वा देवतत्त्वाचा अनुभव किंवा प्रतीति ही गोष्ट शास्त्रीय किंवा वैज्ञानिक ज्ञानाप्रमाणें सर्वांस सामान्य किंवा व्यक्तिनिरपेक्ष असूं शकत नसल्यानें धर्मजीवनांत किंवा धर्मप्रतीतींत गूढवादाचा प्रादुर्भाव होणें अपरिहार्य ठरतें. धर्मानुभव हा गुढानुभव आहे व तो तसाच राहणार; आणि व्यक्ति-व्यक्तींतून वा पंथा-पंथांतून त्या अनुभवांचें स्वरूप विविधच राहणार. आणि अशा अनुभवांवर विविध-धर्म-पंथानुयायांचें सामाजिक वा राजकीय जीवन अधिष्ठित करूं पाहणें ही गोष्ट कल्पनेला कितीहि रम्य वाटली तरी ती व्यवहारसुकर ठरण्याचा बिलकूल संभव नाहीं. – आणि ही गोष्ट आचार्यांस मनोमन उमगलेली असल्यानें त्यांनीं तत्त्वज्ञानाच्या पातळीवर प्रथमतः धर्मकल्पनेबाबत परस्पर्शी किंवा देवस्पर्शी गांधीमताचा अनुवाद करून नंतर मात्र व्यवहाराच्या पातळीवर आल्यावर त्यांनीं धर्मास ' इहलोकांतच ' किंवा ' ऐहिक जीवनांतच ' आणून बसविलें आहे ! आणि ज्यास समाजजीवनाचें किंवा त्यांतील क्रांतीचें अधिष्ठान करावयाचें **अशा धर्माच्या** बाबतींत हेंच साहजिक व इष्ट आहे, असें वाटतें. कारण, परस्पर्शित्व किंवा देवस्पर्शित्व यानें विशिष्ट असा ' धर्म ' हा नेहमींच ' पंथ 'स्वरूपी किंवा ' संप्रदाय'स्वरूपी राहणार; कारण सर्व धर्मांची प्रतीति गूढवादी असते व ही प्रतीति ... जीव-

# धर्माचें मानवी जीवनांतील स्थान

नाचा परमाधार होऊं शकत असली तरी ती दुसऱ्यास संक्रान्त करतां येत नसल्यानें ती खुल्या, मोकळ्या, व्यक्तिनिरपेक्ष किंवा सर्वसामान्य व सर्वंकष सामाजिक जीवनाचें अधिष्ठान होऊं शकत नाहीं. मात्र ही अनुभूति किंवा प्रतीति नेतृत्वगुणसंपन्न व्यक्तीची असल्यास तिच्या प्रभावामुळें ' पंथ 'जीवनाचें किंवा ' संप्रदाय- ' जीवनाचें किंवा क्रांतीचें ती अधिष्ठान होऊं शकेल व तशी ती झाल्याची धर्मेतिहासांत अनेक उदाहरणें सांपडतात. या इतिहासांत जे अनेक धर्मपंथ उत्पन्न झाले त्यांतील प्रत्येक पंथाच्या जीवनाच्या बुडाशीं कोणातरी संस्थापक महान् व्यक्तीची मौलिक अनुभूति किंवा प्रतीति असते; व ती अनुभूति पंथानुयायांत किंवा सांप्रदायिकांत खुद्द संस्थापकाच्या जीवनांतील तिच्या मौलिक किंवा तेवढया उत्कट किंवा तीव्र स्वरूपांत अवतीर्ण होत नसली तरी ती स्वीकृत श्रद्धेच्या स्वरूपांत आत्मसात् होत असते. आणि अशा रीतीनें धर्मनेत्याची धर्मानुभूति ही संप्रदायाच्या जीवनाचें किंवा त्यांतील क्रांतीचें अधिष्ठान बनते. परंतु ' संप्रदाय ' म्हणजे ' समाज ' नव्हे. संप्रदाय कितीहि मोठा झाला तरी तो अखिल समाजाशीं एकरूप, निदान अलीकडील मानवी इतिहासांत, झाल्याचें उदाहरण नाहीं; आणि तो तसा होणें हें पुढील मानवी इतिहासांत– कीं ज्यांत सर्व मानवी वंश वा समूह अधिकाधिक एकत्र येणार आहेत– अशक्यच दिसतें. तेव्हां परस्पर्शी किंवा देवस्पर्शी धर्म हा पंथस्वरूपीच राहणार व तो विशाल व सर्वसमावेशक वा सर्वंकष समाजजीवनाचें अधिष्ठान होऊं शकणार नाहीं असें वाटतें. राजकीय क्रांतिकार्यास सांप्रदायिक धर्माचें अधिष्ठान दिल्यास त्याचें संप्रदायविशिष्ट शकलें पडण्याचा कसा धोका असतो याचा खुलासा भारताच्या अलीकडील इतिहासांस हिंदुराष्ट्रवाद व मुस्लिम राष्ट्रवाद यांच्या उदयावरून झालाच आहे व त्याचा उल्लेख स्वतः आचार्यांनींहि आपल्या लेखांत केला आहे. आणि याउलट, ' धर्म ' हा समाजजीवनाचें अधिष्ठान बनविणें असल्यास त्याचें परस्पर्शित्व किंवा देवस्पर्शित्व म्हणजे संप्रदायस्वरूप सोडून देऊन त्यास, आचार्यांनीं व्यावहारिक पातळीवरील आपल्या विचारांत केलें आहे तसें, ' ऐहिक ' वा ' इहलौकिक ' मानवी जीवनाचा ' धर्म ' म्हणजे समाजधारणस्वरूपी बनविलें पाहिजे. म्हणजे आचार्य स्वतःच म्हणतात त्याप्रमाणें, " धर्मभावनेचें व मोक्षप्रवृत्तीचें खरें स्वरूप परलोकनिष्ठेंत किंवा पलायनवादांत व्यक्त झालेलें नाहीं तर तें स्वरूप ऐहिक जीवन सुखी व समृद्ध बनवून तें श्रेष्ठ व उन्नत करण्यासाठींच धर्मभावनेचा व मोक्षप्रवृत्तीचा मानवानें आश्रय केला पाहिजे. " ( पृ. ४०, स्तंभ १ ) या विवेचनाचा स्पष्ट अर्थ असा कीं, पुढील मानवी इतिहासांत समाजजीवनाचें किंवा समाजक्रांतीचें अधिष्ठान होऊं शकणारा ' धर्म ' म्हणजे केवळ ' समाजनीति'स्वरूपच होय, 'संप्रदाय'-स्वरूप नव्हे. ( मात्र अशा तऱ्हेनें ऐहिक समाजजीवनांतील खरें अधिष्ठान समाजनीतिरूप धर्म हाच होय अशा तऱ्हेची दृष्टि भारतांत आधुनिक काळांत उत्पन्न झाली आहे, असें वरीलप्रमाणें विधान केल्यावर लगेच ( पृ. ४०, स्तंभ १ ) आचार्यांनीं " प्राचीन व मध्ययुगीन धर्मपुरुषांचा व साधुसंतांचा खरा जीवन-संदेश हाच आहे अशीहि येथील विचारवंतांची व जनतेची खात्री होऊं लागली आहे" असें जें दुसरें विधान केलें आहे तें अनैतिहासिक वाटतें. एक तर या प्राचीन व मध्ययुगीन धर्मपुरुषांची व साधुसंतांची 'धर्म'कल्पना केवळ समाजनीतिस्वरूपी होती हें विधान इतिहासास धरून दिसत नाहीं, कारण ती धर्मकल्पना देवस्पर्शी व संप्रदायस्वरूपी होती असच इतिहास सांगतो. शिवाय, ती धर्मकल्पना समाजनीतिरूपी होती असें आपले विचारवंत व जनता समजते हेंहि विधान वास्तव दिसत नाहीं. )

तेव्हां आचार्यांच्या धर्मविषयक विवेचनांत त्यांनीं स्वतःपुढें खरोखर एक गंभीर शृंगापत्ति उभी केली आहे असें वाटतें. गांधीप्रणीत ' धर्म'कल्पना ( कीं जींतील परस्पर्शित्व हा प्रमुख गुण आहे ) त्यांना स्वीकारावयाची असल्यास, तिला पुढील जगांतील विशाल समाजजीवन वा सर्वांगीण समाजक्रांति यांची अधिष्ठानकल्पना बनविण्याची त्यांची इच्छा त्यांना सोडून दिली पाहिजे; किंवा ' धर्मा'स त्या समाजाचें अधिष्ठान बनविणें असल्यास त्याची गांधीप्रणीत ( परस्पर्शी ) कल्पना सोडून दिली पाहिजे. हीं दोन्हीं शृंगें एकत्र ठेवण्याची त्यांची आकांक्षा त्यांच्या लेखांत भरून उरली आहे. पण तीमुळें त्यांच्या विवेचनांत, पूर्वी म्हटल्याप्रमाणें भरसोड आली आहे, व 'धर्मा'च्या दोन कल्पनांची, त्यांनीं प्रयत्न करूनहि, गल्लत होण्याचें

त्यांना चुकवितां आलें नाहीं ! ' धर्म ' हा एकच शब्द दोन अर्थांनीं न वापरतां, 'संप्रदाय ' या अर्थानें ' धर्म ' हा शब्द वापरून ' धारण ' या अर्थानें ' नीति ' हा शब्द वापरल्यास ही गल्लत चुकवितां येईल. पण ' धर्मा'बद्दलचा द्व्यर्थी संकेत भाषेंत आतां इतका रूढ झालेला आहे कीं ही गल्लत अर्थाबाबतचें विशेष अनुसंधान राखल्याखेरीज चुकवितां येणार नाहीं.

आज गांधीयुगांतील भारतांतहि चालू असलेल्या समाजक्रांतीचें खरें अधिष्ठान गांधीवादी धर्मप्रेरणा होय ही आचार्यांची श्रद्धा प्राध्यापक शहांप्रमाणेंच मलाहि पटत नाहीं. आचार्यांच्या श्रद्धेच्या भ्रामकपणाचें मोठेंच गमक हें कीं भारताच्या आजच्या राजकीय जीवनांतील गांधींचे अद्वितीय व सर्वमान्य व खुद्द गांधीमान्य वारस पंडित जवाहरलाल नेहरू हे गांधींची देवस्पर्शी धार्मिक कल्पनाप्रणाली किंवा भाषा एका शब्दानेंहि कधीं उपयोजीत नाहींत. किंबहुना, राजकीय व सामाजिक जीवनास ( देवस्पर्शी ) धर्माचें अधिष्ठान पाहिजे हें प्रतिपादन ते स्पष्टपणें अमान्यच करतील असें वाटतें. इतकेंच नव्हे तर म. गांधी हयात असतांना भारतीय घटना तयार होऊं लागली तेव्हां म. गांधींची तशी इच्छा असूनहि तींत देवकल्पनेचा कोठेंहि उल्लेख न करण्याचेंच त्यांच्या अनुयायांनीं ठरविलें ! आजचें भारतीय सरकार स्वतःस म. गांधींचे अनुयायी म्हणवीत असूनहि त्यांच्या प्रार्थनादि तंत्रास त्यांनीं आपल्या कार्यप्रणालींत कोठें स्थान दिल्याचें दिसत नाहीं. गांधींच्या इहलौकिक वैयक्तिक वा सामाजिक नीतिकल्पनांचा मात्र पुनःपुनः निदान उच्चार तरी केला जातो. आजच्या भारतीय सामाजिक जीवनांत भूदानयाज्ञिक विनोबाजी यांचा स्वतःच्या क्रांतिकार्यांत मात्र त्यास देवस्पर्शी धर्माचें अधिष्ठान देण्याचा प्रयत्न दिसतो. ही घटना आचार्यांच्या सिद्धांतास मोठाच पुरावा त्यांस वाटल्यास नवल नाहीं. किंबहुना, म. गांधींनीं स्वतःच्या जीवनक्रमांत घडवून आणलेल्या प्रचंड क्रांतिकार्याचें अधिष्ठानहि त्यांच्या 'धर्म'प्रेरणेंतच होतें असेंहि म्हणतां येईल. परंतु सूक्ष्म दृष्टीनें पाहतां, गांधी किंवा विनोबा यांच्या देवस्पर्शी किंवा देवकेंद्री धर्मप्रतीतींत त्यांच्या क्रांतिकार्याचें मूळ शोधणें हें मानसशास्त्रीय दृष्ट्या कितपत बिनचूक होईल याची शंकाच आहे. आपली स्वतःची विशिष्ट स्वरूपाची पारलौकिक देवप्रतीति बाजूस ठेवून व इतर प्रकारची पारलौकिक देवप्रतीति असणाऱ्या किंवा स्वीकारणाऱ्या जनसमूहांचीहि दखल घेऊन, सर्वसामान्य जनसमूहांच्या ऐहिक जीवनाचें व त्यांतील मूल्यांचें त्यांनीं जें सोत्कंठ चिंतन केलें त्यांतूनच या विभूतींचें क्रांतिकार्य स्फुरलें — ही मानसशास्त्रीय मीमांसाच अधिक यथार्थ होईल असें वाटतें. गांधींनीं किंवा विनोबांनीं आपल्या कार्यांत आपआपल्या देवकल्पनेचा किंवा परकल्पनेचा प्रसार करण्याचा ध्यास घेतला नसून आपआपल्या समाजनैतिक कल्पनांचा प्रसारच सर्वसाधारण समाजांत पंथहीन किंवा संप्रदायरहित दृष्टीनें केला आहे. या कार्यांत जे निकट अनुयायी त्यांच्या भोंवतीं जमले त्यांना त्यांनीं आपल्या देवस्पर्शी जीवनांत प्रवेश देऊन आपल्या संप्रदायांत गोंवून घेतलें हें खरें आहे. पण अनुयायांच्या या सांप्रदायिक मेळाव्याबाहेरच्या विशाल समाजाची जाणीव ते कधींहि विसरत नाहींत यांतच त्यांच्या कार्याच्या यशाची गुरुकिल्ली आहे असें मला वाटतें. गांधींच्या मेळाव्यांत हिंदु अनुयायांबरोबर मुसलमानादि इतरसंप्रदायी अनुयायिवर्गहि असे, यांतील रहस्य त्यांच्या सामाजिक क्रांतिकार्याची खरी स्फूर्ति देवकल्पनेंत नसून त्यांच्या संप्रदायदृष्टिरहित समाजनीतिचिंतनांत होती हेंच होय. याच घटनेस त्यांच्या क्रांतिकार्याची प्रेरणा त्यांच्या धर्मचिंतनांत होती असें म्हणावयाचें असल्यास गोष्ट वेगळी. मग तो केवळ एक परिभाषेचा प्रश्न होईल. कारण हें ' धर्म '-चिंतन म्हणजे ' समाजनीति '-चिंतन एवढाच त्यांत अर्थ समाविष्ट होऊं शकेल. गांधींच्या विचारसरणींतील त्यांच्या संप्रदायविरहित ' धर्मा 'चें हें विशाल ' समाजनीति '-स्वरूप आत्मसात् करण्याची दृष्टि ज्या ' धार्मिकां'त नव्हती त्यांनीं आपल्या ' संप्रदाय '-धर्मास विशाल ' समाजनीति '-धर्मापेक्षां श्रेष्ठ स्थान अर्पून, संप्रदाय म्हणजेच समाज हें समीकरण गृहीत धरणारी राज्यरचना केली ! मानवाची प्रगति ' संकुचित संप्रदायाकडून विशाल समाजाकडे ' होत असल्याचें दिसतें, तर या राज्यरचनेंतील विचारसरणीनें ' समाजाकडून संप्रदायाकडे ' अशी दिशा स्वीकारल्याचें दिसतें ! सारांश, ' धर्म ' हा वैयक्तिक किंवा सांप्रदायिक जीवनाचें अधिष्ठान होऊं शकेल व असल्याचें दिसतें. [illegible]धिक





विशाल होत चाललेल्या सामाजिक जीवनाचें किंवा त्यांतील क्रांतीचें अधिष्ठान धर्म नसून समाजभावना व तींतून निर्माण होणारी समाजनीति होय.

या वरील विवेचनावरून आचार्य जावडेकर व प्राध्यापक शहा या दोघांच्या विचारसरणींपैकीं मला स्वतःला प्राध्यापकांची विचारसरणी धर्माचा इतिहास, मानसशास्त्र व तत्त्वज्ञान यांच्या दृष्टीनें अधिक वास्तववादी वाटते. मात्र प्राध्यापकांच्या विवेचनांत 'धर्मा'चा फक्त 'सांप्रदायिक' अर्थच गृहीत धरण्यांत आला असल्यानें 'धर्मा'चा 'नैतिक' अर्थहि अभिप्रेत असूं शकतो ही गोष्ट त्यांच्या विचारांतून निसटली आहे; व त्यामुळें आचार्यांचें व्यावहारिक पातळीवरील 'धर्मा'चें 'ऐहिक' किंवा 'इहलौकिक' विवरण हें आपल्या 'मूल्य'-विवरणाशीं विसंगत नाहीं हें प्राध्यापक शहांच्या लक्ष्यांत आलेलें नाहीं. उदाहरणार्थ, प्राध्यापक शहा म्हणतात : "आधुनिक वैज्ञानिक संस्कृतीनें जोपासलेलीं जीं मूल्यें,–उदाहरणार्थ आर्थिक व सामाजिक पातळीवरील समता, व्यक्तीच्या सर्जनशक्तीला अधिकाधिक स्वातंत्र्य मिळत जावें ही कल्पना, त्याचप्रमाणें कलांच्या मूल्यांचें केंद्र कोठें मानवाच्या बाहेर किंवा पलीकडे नसून तें मानवांतच आहे हा विचार,––हीं सर्व मूल्यें धर्माधिष्ठित तत्त्वज्ञानांत तर्कदृष्ट्या बसूं शकत नाहींत." (ऑगस्ट अंक, पृ. ४०, स्तंभ १) 'धर्मा'चा 'परस्पर्शी' अर्थ न करतां, 'नैतिक' अर्थ स्वीकारल्यास त्या धर्माच्या विचारांत हीं सर्व मूल्यें विचारिलीं जातात हें उघड आहे. असाच 'धर्मा'चा दुसरा अर्थ स्वतः आचार्यांनीं आपल्या लेखांतच 'धर्मा'चें 'इहलौकिक' किंवा 'ऐहिक' जीवनाच्या दृष्टीनें केलेल्या (पूर्वोल्लिखित) विवेचनांत केला आहे ही गोष्ट प्राध्यापक शहांच्या लक्षांत येती तर त्यांच्या लेखांत आचार्यांच्या भूमिकेवर केवळ प्रतिकूल विवेचन केलें गेलें आहे त्यास थोडें विधायक वळणहि लागलें असतें असें वाटतें.

आचार्य व प्राध्यापक यांच्या उपरिनिर्दिष्ट लेखानंतर सप्टेंबरच्या 'नवभारत'च्या अंकांत श्री. पन्नालाल सुराणा यांचा 'क्रांतिकारक व धर्म' हा लेख प्रसिद्ध झाला आहे. या लेखांत श्री. सुराणा यांनीं 'सनातन धर्मभावना समाजक्रांतीला प्रेरणादायी आहे हें आचार्यांचें त्यांच्या लेखांतील प्रतिपादन सर्वसामान्यपणें कोणालाहि मान्य होण्यासारखें आहे" (पृ. ३६, स्तंभ १) असें म्हटलें आहे. परंतु त्यांच्या लेखाची प्रमुख प्रवृत्ति क्रांतिकारकांच्यावरील आचार्यांच्या विवेचनांतील आक्षेपांविरुद्ध क्रांतिकारकांचा बचाव करण्याचा प्रयत्न करणें ही आहे. हा बचाव करतांना श्री. सुराणांचें म्हणणें असें कीं, "क्रांतिकारक धर्मावर आक्षेप घेतात म्हणून ते सनातनधर्मभावनेला विरोध करतात असें मानण्याचें कारण नाहीं." (पृ. ३८, स्तंभ २) "बहुतेक आधुनिक क्रांतिकारकांचा किंवा पुरोगामी विचारवंतांचा या मूळ सनातन धर्मप्रेरणेला विरोध नाहीं. ... त्यांनीं बंड केलें तें विवक्षित प्रस्थापित धर्माविरुद्ध ... जेव्हां ते धर्म जड बनले व सनातनधर्मभावनेला मारक होऊं लागले." (स्तंभ १) आतां हें खरें आहे कीं, कांहीं क्रांतिकारक 'धर्म' या शब्दाला देखील बुजतात. यामुळें "त्यांना जरी सनातन आत्मप्रेरणा हीच खरी क्रांतिप्रेरणा असें वाटत असलें तरी या प्रेरणेला ते 'धर्मभावना' म्हणण्यास तयार होत नाहींत. ...... म्हणून असें वाटतें कीं 'सनातन धर्मभावना' या शब्दाचा आग्रह सोडावा व त्याऐवजीं आचार्यांचाच 'आत्मप्रेरणा' किंवा 'सांस्कृतिक प्रेरणा' किंवा साधा 'सत्प्रेरणा' हा शब्द उपयोगांत आणावा." यावरून श्री. सुराणांना क्रांतीचें अधिष्ठान म्हणून मान्य असणारी धर्मप्रेरणा ही संप्रदायधर्माची प्रेरणा नसून ती केवळ समाजनीतिप्रेरणा आहे हें उघड झालें. इतकेंच नव्हे तर म. गांधी व आचार्य विनोबा यांच्या क्रांतिकार्यांतील त्यांची वैयक्तिक देवस्पर्शी धर्मप्रेरणा जेव्हां त्यांच्या भाषण-लिखाणांतून हिंदु धर्मग्रंथांतील वचनें व उतारे यांच्या द्वारां व्यक्त होते तेव्हां त्यांचा परिणाम इतर धर्मानुयायांवर काय होत असेल? ('रामधून म्हणजे एकपत्नीव्रत, पितृभक्ति या मूल्यांची उपासना असें सामान्य जन समजत असतील का? ...... सर्वसामान्य मुसलमानांना विनोबांचें रामधूननंतरचें भूदानप्रवचन आपल्या हिताचें वाटत असेल काय? – पृ. ३९, स्तंभ १ व २) असा त्यांनीं मूलग्राही प्रश्न विचारून क्रांत्यधिष्ठानरूप धर्मांतून संप्रदायी देवस्पर्शित्वाचा लोप होईल तरच धर्मप्रेरणा ही खरी सर्वांगीण समाजक्रांतिप्रेरणा होईल याच आमच्या ... तील










अनुक्रमणिका

भूमिकेला मान्यता दिली आहे, हेंहि उघड आहे.

वरील विवेचनावरून श्री. सुराणा यांनीं आचार्यांचें धर्म हा क्रांतीचें खरें अधिष्ठान असल्याबद्दलचें ' त्यांच्या लेखांतील प्रतिपादन सर्वसामान्यपणें कोणाला-हि मान्य होण्यासारखें आहे ' असा सामान्य निर्वाळा दिला असला, तरी आचार्यांनीं जी गांधींची देवस्पर्शी किंवा परस्पर्शी धर्मकल्पना स्वीकारली आहे तिला त्यांचा पाठिंबा नाहीं हें उघड आहे. त्यांचा पाठिंबा असलेली ' धर्मप्रेरणा ' ही केवळ ' सत्प्रेरणा ' म्हणजे ' नीतिप्रेरणा ' होय. आचार्यांच्या म. गांधींकडून स्वीकारलेल्या धर्मकल्पनेंत देवस्पर्शित्वाचा अंतर्भाव होतो ही गोष्ट श्री. सुराणांनीं लक्ष्यांत घेतलेली दिसत नाहीं आणि म्हणूनच त्यांनीं आपल्या लेखाच्या आरंभींच आचार्यांच्या प्रतिपादनास सर्वमान्यत्व एकदम अर्पण केलें आहे !

---

## ' नदीचें वळण, एक टेंकडी असें निवांत ठिकाण '

' दि पॅसिफिक स्पेक्टेटर ' नांवाचें एक अमेरिकन त्रैमासिक आहे. अमेरिकेंतील पॅसिफिक किनाऱ्यावरील वीस उच्चशिक्षणसंस्था व विद्वत्सभा यांनीं हें त्रैमासिक चालविलें आहे. या त्रैमासिकाचे संपादक मि. रॉबर्ट सी. नॉर्थ हे गेल्या वर्षीं भारतांत आले असतांना सोलापूरला प्रा. द. रा. बेन्द्रे यांना भेटावयास गेले. प्रा. बेन्द्रे यांच्याशीं त्यांचें जें बोलणें झालें त्यासंबंधीं मि. रॉबर्ट सी. नॉर्थ यांनीं आपल्या ' पॅसिफिक स्पेक्टेटर 'च्या ताज्या अंकांत एक संपादकीय स्फुट लिहिलें आहे. त्यांतून पुढील कांहीं भाग अनुवादून उद्धृत केला आहे. त्यावरून, जागतिक परिस्थितीकडे पहावयाचा एका प्रतिभासंपन्न भारतीचा दृष्टिकोण आणि त्याची विद्वान् अमेरिकनांवर होणारी प्रतिक्रिया यांचें उद्बोधक दर्शन होईल.

" प्रा. बेन्द्रे रहात असलेल्या खोलींत पुस्तकांच्या चळतीच चळती थेट वर छपरापर्यंत लागून त्यांच्या पडायच्या हाथरीपयत ओसंडल्या होत्या. आम्ही त्यांना मुद्दाम भेटायला गेलों म्हणून त्यांनीं आनंद प्रकट केला. पण त्याबरोबरच अमेरिकेचीं ज्या दिशेनें पावलें पडत आहेत, त्यांबद्दल त्यांनीं चिंता व्यक्त केली. तें म्हणाले: ' तुम्हां अमेरिकनांना रशियनांशीं लढूनच जर सोक्षमोक्ष लावायचा असेल, तर कृपा करून आमच्या सारख्या लोकांवर एक खैर करा : आमच्याकरितां कैद्यांच्या छावण्या उघडा. त्या छावण्यांत आम्ही आपण होऊन कैदी बनून राहूं. तेथें तरी आमच्या वांटेला जाऊं नका. वाटलें तर आमच्या छावण्यांभोंवतीं कांटेरी तारा घाला पण आंत कांहीं चौरस मैल भूप्रदेश, ज्यांत एक डोंगर आहे, नदी वळण घेत आहे – असा भूप्रदेश देवाच्या नांवानें मोकळा ठेवा. त्या डोंगरावर बसून आम्हीं आपले तारे पहात बसूं. तिकडे बाहेर तुम्ही अमेरिका आणि रशियन काय हवें तें करा ! '

' प्रा. बेन्द्रे यांच्या मागणीला काल प्रतिकूल आहे. आधुनिक अस्त्रांचें संहारसामर्थ्य एवढें वाढलें आहे कीं, त्यांतून दूरचें सोलापूरहि सुटूं शकणार नाहीं. अणुबॉंबच्या स्फोटानंतर वाऱ्यावरून दिशोदिशांना उधळल्या जाणाऱ्या कणांना टेकड्यांची, नदीच्या वळणांची, कांटेरी तारांची, कशाचीहि तमा नाहीं ! लष्करी, युद्धविषयक कल्पनांतच आतां क्रान्ति घडून येत आहे. राष्ट्राराष्ट्रांतील संबंधांची पूर्वींची भूमिकाच पार बदलण्याची वेळ आतां येऊन ठेपली आहे.

" निःशस्त्रीकरणाची योजना आंखली ती पार पाडण्याकरितां प्रे. आइसेनहॉवर यांनीं हॅरॉल्ड स्टासन यांची आपला सहायक म्हणून नुकतीच नेमणूक केली आहे. इतकी कठीण कामगिरी क्वचितच पूर्वीं कोणावर सोंपविली गेली असेल ! स्टासन आपल्या कामास कशी सुरुवात करणार आहेत कोण जाणे ! पण पहिलें पाऊल म्हणून आम्ही सोलापूरच्या प्रा. बेन्द्रे यांच्याकडे स्टासन यांचें लक्ष वेधूं इच्छितों. प्रा. बेन्द्रे यांची एक निवांत निरामय भूप्रदेश, नदीचें वळण व तारे पहायला एक टेंकडी याबद्दलची जी मागणी त्या मागणीला आमचा यच्चयावत् सर्वांचा पाठिंबा आहे. ज्ञानाच्या मागें लागलेला मानव त्यांतून उद्भूत झालेल्या बऱ्यावाईटांमध्यें अडकून पडला आहे. सबंध पृथ्वीच झपाट्यानें एक प्रकारचा कैदखानाच बनत आहे. या कैदखान्यामध्यें सर्वांनीच आपणां स्वतःला बंदिस्त करून टाकलें आहे त्यांतून दुसऱ्याला घेतल्याशिवाय, आपण एकटे स्वतःच निसटून जाऊं म्हटलें तरी तें शक्य नाहीं ! "








तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

# भारतांतील हिंदुत्ववादी पक्ष

पाश्चात्त्य देशांत ज्याप्रमाणें डावे व उजवे म्हणून राजकारणी पक्षांचें वर्गीकरण केलें जातें, त्याप्रमाणें भारतांतीलहि राजकीय पक्षांचें वर्गीकरण करतां येतें. भारतांत डावे गट म्हणून मार्क्सवादी पक्षांचा व प्रजा-समाजवादी पक्षाचा निर्देश करतां येतो आणि उजवे गट म्हणून सगळ्या लहानमोठ्या हिंदुत्ववादी पक्षांचा निर्देश करतां येतो. हिंदुत्ववादी पक्षोपपक्ष अनेक आहेत. त्यांतील सर्वांत जुना हिंदुमहासभा पक्ष होय; अलीकडे वर्णाश्रम-स्वराज्यसंघ, राष्ट्रीय स्वयंसेवकसंघ, रामराज्य-परिषद् व जनसंघ हे पक्ष अस्तित्वांत आले आहेत. राष्ट्रीय स्वयंसेवकसंघ विधिमंडळांच्या प्रत्यक्ष निवडणुकींत भाग घेत नसला तरी त्याच्या संघटनेचें तत्त्व व पद्धति प्रामुख्यानें राजकीय आहे, असें म्हणतां येतें. हे उजवे गट भिन्नभिन्न कालखंडांत विशेष प्रसंगांच्या निमित्तानें उत्पन्न झाले आहेत. डावे आणि उजवे अशा प्रकारच्या भेदाचीं दर्शक लक्षणें अनेक आहेत. पाश्चात्त्य देशांत डावे व उजवे असे भेद स्पष्टपणें दर्शित करणारीं जीं लक्षणें एका काळीं सांगतां येत होतीं तशीं तीं अलीकडच्या काळांत सांगतां येणें कठीण झालें आहे. तीं एकमेकांत मिसळत चाललेलीं दिसतात. तसे अजून भारतांत डावे आणि उजवे हे भेद बुजत जाण्याची प्रवृत्ति जोरदार दिसत नाहीं. डाव्या गटांचीं लक्षणें मुख्यतः अशीं सांगतां येतात : परंपरागत समाजरचनेवरील श्रद्धेचा अभाव, रूढ समाजरचना बदलण्याची निकड, खाजगी मालमत्तेच्या अधिष्ठानावर उभारलेले वर्गभेद नष्ट करण्याबद्दलचा आग्रह, स्त्री-पुरुषसमानता, मानवी एकता, लोकशाही स्वातंत्र्याचा पुरस्कार, रूढ धर्मसंस्थेबद्दल व तत्संबंधीं रूढीबद्दल उपेक्षा किंवा विरोध इत्यादि. हीं लक्षणें कमीजास्त प्रमाणांत भारतीय डाव्या गटांना लागूं पडतात. समाजवादी किंवा मार्क्सवादी विचार हा ज्यांच्यांत अधिक प्रभावी आहे, ते लोकशाही स्वातंत्र्यास दुय्यम स्थान किंवा महत्त्व संधिसाधुपणानें देतात. भारतांतील उजव्या गटांच्यामध्यें लोकशाही स्वातंत्र्यास तांत्रिक महत्त्व व प्रासंगिक मान्यता दिलेली जरी आढळून आली तरी लोकशाही स्वातंत्र्याच्या तात्त्विक निष्ठेचा त्यांच्यांत पूर्ण अभाव आहे. परंपरागत समाजरचनेमध्यें मौलिक बदल करण्याबद्दलच्या विचाराचें त्यांना वावडें आहे. समाजाच्या आर्थिक उपपत्तीचा ते कधींच स्वीकार करीत नाहींत. आर्थिक व समाजपरिवर्तनसंबंधी दृष्टिकोणाचा अभाव हें भारतांतील उजव्या गटांचें महत्त्वपूर्ण लक्षण आहे. रूढ धर्मसंस्था व परंपरागत समाजरचना यांच्या आश्रयावर स्थिरावलेली हिंदुसंस्कृति किंवा हिंदुत्व हें उजव्या गटांचें मुख्य श्रद्धास्थान होय. उजव्या गटांत राष्ट्रनिष्ठा ही मूलभूत मानली जाते. परंतु ही राष्ट्रनिष्ठा किंवा राष्ट्रीयत्व परंपरागत भारतीय संस्कृतीवरील श्रद्धेचें आधुनिक रूप होय.

कोणत्याहि देशांतील राष्ट्रीयत्वाची मीमांसा करीत असतांना त्या त्या देशांतील संस्कृतीची पार्श्वभूमि गृहीत धरावी लागते. लोकांच्या हृदयांत वसत असलेली स्वदेशांतील एकात्मक राज्यावरील ऐकान्तिक निष्ठा हें राष्ट्रीयत्वाचें मुख्य अंतरंग होय. देशांतील लोकनिष्ठेस पात्र झालेली एकछत्री राज्यसंस्था वगळून राष्ट्रीयत्वाचा अर्थ करतां येत नाहीं. राज्य व राजकारण हा राष्ट्रीयत्वाचा गाभाच होय, राष्ट्रीयतेचा तो जीवनस्रोतच होय, हें जरी खरें असलें तरी सांस्कृतिक परंपरेनेंच राष्ट्र निर्माण झालेलें असतें. समाजसंघटनेचा हेतूहि सांस्कृतिक जीवन जगणें हाच असतो; म्हणून एकछत्री राज्यावरील निष्ठा हें जरी राष्ट्रीयत्वाचें प्रकट स्वरूप असलें तरी परंपरागत संस्कृति हें राष्ट्रीयत्वाचें अंतरंग असतें. आम्ही अमुक आहोंत, याची व्याख्या संस्कृतीचें वर्णन करूनच करतां येते. हे इंग्लिश, हे फ्रेंच, हे जर्मन, हे अमेरिकन इत्यादि निर्देशांत त्यांच्या विशिष्ट जीवनपद्धतीचा, भाषेचा, राहणीचा, मानसिक संस्कारांचा, सामाजिक संस्थांचा, अभिरुचींचा, विशिष्ट भावनांचा व आदर्शांचा अर्थ समाविष्ट झालेला असतो.









अनुक्रमणिका

भारताचें राष्ट्रीयत्व ज्या संस्कृतीवर आधारलेलें आहे, ती संस्कृति विशेषतः हिंदुसंस्कृति होय, असें म्हणावें लागेल. गेल्या शंभर वर्षांतील भारतांतील राष्ट्रीयत्वाचा किंवा राष्ट्रवादाचा इतिहास पाहिला तर त्यांतील भारतीयत्वाची अहंता ही भारताच्या सांस्कृतिक वैभवाच्या इतिहासावर आश्रित झालेली दिसते. उपनिषदांतील व भगवद्गीतेंतील अध्यात्म, बुद्ध, महावीर, शंकराचार्य, तुलसीदास, चैतन्य, तुकाराम इत्यादिकांचें साधुत्व, राम, धर्मराज, अशोक, समुद्रगुप्त, हर्ष, शिवाजी, राणा प्रताप इत्यादिकांचें राज्यकर्तृत्व व शौर्य, वाल्मीकि, व्यास, कालिदास, भवभूति इत्यादिकांचें काव्य व नाट्य इत्यादि प्रकारचा महिमाच गेल्या शंभर वर्षांतील राष्ट्रीय अभिमानाचें स्फूर्तिस्थान बनला आहे. या राष्ट्रीय अभिमानांत भारताचें औदार्यहि येतें. जगांतील अनेक मानववंशांचें भारतानें अनादि कालापासून स्वागत केलें आहे. इराणी, ग्रीक, शक, हूण, तुर्क, मोंगल इत्यादि मानववंशांना येथें आश्रय मिळाला; पार्शी, इस्लाम व ख्रिश्चन इत्यादि परकीय धर्मांनाहि जागा दिली. हें या औदार्याचें गमक मानलें जातें. गेल्या शतकांतील राजकीय इतिहासांत अहिंदूंच्याहि कर्तृत्वाचा लक्षांत भरण्यासारखा भाग आहे. परंतु राष्ट्रीय उत्थानास प्रेरक झालेला सामुदायिक अभिमान हा हिंदु संस्कृतीच्याच एकतेवर आधारलेला होता, असें म्हणण्यास पुष्कळच आधार आहे. भारतीय राष्ट्रीयत्वाच्या इतिहासांत हिंदुत्वाचें कार्यच सर्वांत महत्त्वाचें आहे ही गोष्ट मान्य केल्याशिवाय या इतिहासास यथार्थता येणार नाहीं. म्हणून राजकीय दृष्ट्या भारताचें राष्ट्रीयत्व हें मुसलमान, ख्रिश्चन इत्यादि अहिंदु जमातींचा समावेश करण्याइतकें लवचिक असलें तरी या राष्ट्रीयत्वाचें परिपोषण मुख्यतः परंपरागत हिंदु संस्कृतीनेंच केलें आहे हें मान्य करावें लागतें.

भारतीय राष्ट्रीयत्व म्हणजेच हिंदुत्व होय – या तत्त्वाचा मुख्य द्रष्टा वीर सावरकर होत. भारताचें राष्ट्रीयत्व म्हणजे हिंदुत्व असें समीकरण सावरकरांनीं सविस्तर मीमांसेसह प्रथम मांडलें. देशपूजा किंवा भूमिपूजा ही एक प्रकारची धार्मिक श्रद्धा आहे. देशभक्तीनें जुन्या धार्मिक भक्तीचें स्थान आधुनिक काळांत घेतलें. देशभक्ति ही कल्पना दोनशेंअडीचशें वर्षांपेक्षां अधिक जुनी नाहीं. भारतांतील देशभक्तीचीं बीजें भारताच्या जुन्या धार्मिक इतिहासांत कशीं रोंवलेलीं आहेत, ही गोष्ट सावरकरांनीं निदर्शनास आणली. राष्ट्रीयता हा वस्तुतः ऐहिक संप्रदाय आहे. 'पितृभू' किंवा 'मातृभू' यावरील स्वाभाविक प्रेम ही भावना या संप्रदायाचें मूळ आहे. सावरकरांनीं 'पुण्यभू' ही भावना त्यांत अधिक शोधून भरीस घातली व भारतीय राष्ट्रीयत्वाची मीमांसा पुरी केली. स्वराज्याच्या स्थापनेच्या इतिहासानें दुर्दैवानें या मीमांसेचें समर्थन केलें. भारतास जे पुण्यभू मानीत नाहींत त्यांनीं दगा दिला, ते फुटून निघाले. पाकिस्तान निर्माण झालें. दुर्दैव म्हणण्याचें कारण राष्ट्रीयत्वाचें किंवा देशभक्तीचें पूज्य आलंबन आसेतुहिमाचल व कराचीपासून डाक्यापर्यंत पसरलेला अखंड असा भारताचा भूप्रदेश होय, त्याचें राजकीय अखंडत्व टिकूं शकलें नाहीं. हा राष्ट्रीयत्वाच्या पोटांतील सत्याचाच प्रभाव होय. हिंदु व मुसलमान या दोघांनाहि एका सामर्थ्यशाली सूत्रांत गोंवणारें राष्ट्रीयत्व किंवा भारतीयत्व निर्माण होऊं शकलें नाहीं. राष्ट्रीयत्व म्हणजे वस्तुतः हिंदुत्वच होय, हें सत्य प्रभावी ठरून त्या सत्यानें भयंकर सूड उगवला!

परंपरागत हिंदुत्व हें जुन्या स्वरूपांत सर्व हिंदूंच्या मध्येंहि आपसांत एकजीव प्रबल राष्ट्रीयत्व निर्माण करण्यास समर्थ होऊं शकत नाहीं. समाजांतील ब्राह्मण व अस्पृश्य, अस्पृश्यतेची व ब्राह्मणांच्या श्रेष्ठतेची ग्वाही देऊन बंधुत्वाच्या भावनेनें समरस होऊं शकत नाहीं. बंधुत्वाचा जिव्हाळा निर्माण करण्यास सहजीवन कारण होत असतें. सहजीवन नसलें तर सहोदर बंधू सुद्धां कालांतरानें परके बनतात. परंपरागत हिंदुत्वांतील जातिबंधनें वर्तमानकाळांत बंधुत्वाच्या निर्मितीच्या मध्यें उंच पोलादी भिंती निर्माण करतात. दक्षिण हिंदुस्थानांतील नायर ही बहुजनसमाज असलेली जमात ब्राह्मणांस इंग्रजाइतकी परकी समजूं लागली आहे. कर्नाटकांत लिंगायत व पंजाबांत शीख हे आपणांस इतर जमातींच्या पासून, फ्रेंच व इंग्रज एकमेकांपासून जितके स्वतःस अलग समजतात तितकेच, अलग समजत आहेत. महाराष्ट्रांत मराठे आणि ब्राह्मण इत्यादि जमाती यांचें अंतर हें युरोपांतील दोन राष्ट्रांमधील अंतरांपेक्षां अधिक मोठें बनलेलें [illegible] तात्पर्य,







हें परंपरागत हिंदुत्व वस्तुतः ऐक्य-साधक नसून भेद-बोधक बनलेलें आहे. म्हणून परंपरागत हिंदुत्वामधील ऐक्य-साधक तत्त्व अधिक उजळलें जाण्याकरितां रूढींच्या कोंदट प्रचंड भिंती, जुन्या धर्मसंस्थेचे जरठ बुरुज व संप्रदायांचे कोट नष्ट करण्याची गरज आहे, ही गोष्ट अधिक दूरदर्शी राष्ट्रवादी नेत्यांच्या मनांस फार जाणवली आहे. हिंदूंच्यामध्यें **राजा राममोहन** रॉय पासून म. गांधींपर्यंत जे समाजसुधारक व धर्मसुधारक झाले त्यांनीं परंपरागत हिंदुत्वांतील सामाजिक चालीरीती व संप्रदाय हे सामाजिक दौर्बल्यास कारणीभूत आहेत ही गोष्ट ओळखली. **वीर सावरकर** यांनाहि नवें उजळलेलें हिंदुत्व पाहिजे आहे. जातिभेद, संकुचित धर्मसंप्रदाय व बुद्धिवादविरोधी अंधश्रद्धा यांचें विध्वंसन झाल्याशिवाय सामाजिक एकतेचें सामर्थ्य निपजणार नाहीं, ही गोष्ट हिंदुत्वाच्या ऐक्याच्या स्थापनेची प्रतिज्ञा करण्याऱ्या हिंदुत्ववाद्यासहि मान्य व्हावयास पाहिजे. परंपरेच्या दोषांची शुद्धि झाल्याशिवाय खरेखुरें हिंदु-संघटन होऊं शकणार नाहीं, व त्याशिवाय सांस्कृतिक राष्ट्रीयत्वहि उज्ज्वल स्वरूपांत अस्तित्वांत येणार नाहीं. आज हिंदुसमाजांत अनेक सांस्कृतिक गट आहेत. समाजांतील खालच्या व वरच्या थरांमध्यें पूर्ण सांस्कृतिक फूट आहे, त्याचप्रमाणें भाषावार सांस्कृतिक फूट आहे. भाषिक प्रदेश म्हणजे जणूं काय भिन्न राष्ट्रेंच होत, अशी आजची परिस्थिति आहे. भारतीय राष्ट्राच्या एकतेच्या भावुक भजनानें आणि राष्ट्रध्वजवंदनपूर्वक केलेल्या सांघिक संचलनानें राष्ट्रीय ऐक्य होणार नाहीं. भावनेच्या ऐक्याला वस्तुस्थितीच्या एकतेचा आधार असावा लागतो. वस्तुस्थितींतील भेदांकडे काणाडोळा करून ऐक्यभावनेची आराधना करणारे पायावांचून इमारत रचीत आहेत. ही सर्वस्वी आत्मवंचना आहे. मग त्या आराधनेचें आलंबन भगवा झेंडा असो अथवा तिरंगी झेंडा असो! हे लोक वैचारिक अधिष्ठानावांचून चळवळ चालविणारे आहेत. हे आंधळे रत्नाचा शोध करीत आहेत. हिंदुत्ववादी पक्षांचें हिंदुत्वाच्या नवीकरणाकडे पूर्ण दुर्लक्ष आहे.

हिंदुस्थानांतील हिंदुत्ववादी पक्ष समाजाला राजकीय दृष्ट्या संघटित करीत आहेत; परंतु त्यांच्या विचारसरणींत व कार्यक्रमांत सामाजिक परिवर्तनाची किंवा समाजसुधारणेची मूलभूत गरज मुळींच प्रतिबिंबित झालेली दिसत नाहीं. हिंदुत्व हें बलशाली करण्याकरतां समाजसुधारणेचा कार्यक्रम प्रथम आवश्यक आहे आणि त्याकरितां हिंदुत्वाची व हिंदुधर्माची बुद्धिवादी समीक्षा आधुनिक सामाजिक शास्त्रांच्या आधारें करणें जरूर आहे, या गोष्टीची दखल हिंदुत्ववादी पक्षांना नाहीं. नव्या जगांतील परिस्थितीला तोंड देण्यास नव्या विचारांची व नव्या सामाजिक संस्थांची घडण करणें आवश्यक आहे, या गोष्टीची जाणीव व त्यावर आधारलेला कार्यक्रम यांची उणीव असल्यामुळें हिंदुत्ववादी पक्ष त्यांच्या ब्रीदाप्रमाणें बलशाली हिंदुसमाज निर्माण करण्यांत यश मिळवूं शकणार नाहींत.

हिंदुत्ववादी पक्षांच्या पाशीं स्वतःच्या ध्येयधोरणाची शास्त्रीय मीमांसा किंवा सुसंगत विचारपद्धति यांचा अभाव आहे हें त्यांचें मूलभूत वैगुण्य होय. दुसरें एक महत्त्वाचें या पक्षांचें वैगुण्य म्हणजे समाजांतील दीन, अशिक्षित, अर्धपोटी, निरक्षर व असंस्कृत अशा सामान्य जनांच्या किंवा मागासलेल्या सामाजिक थरांच्या अवनत स्थितीची उपेक्षा हें होय. या वैगुण्यांमुळें सुस्थितींतले उच्चवर्गीय पांढरपेशे आणि धार्मिक व सामाजिक दृष्ट्या प्रतिष्ठा उपभोगणारे सामाजिक थर सोडल्यास इतर बहुजनसमाजाला आकर्षित करणारी विचारसरणी व कार्यक्रम या पक्षांपाशीं नाहीं. सामान्य जनांच्या किंवा बहुसंख्यकांच्या अवनतीची मीमांसा प्रामाणिकपणानें व कळकळीनें करूं लागल्यावर समाजरचनेंतील परिवर्तन आणि आर्थिक कार्यक्रम यांचें महत्त्व पटूं लागतें व मानवी स्वातंत्र्य, समता किंवा लोकशाहीचीं मूल्यें यांचा महिमा दृष्टिपथांत येऊं लागतो.

सामाजिक, सांस्कृतिक व विशेषतः धार्मिक दृष्टीनें हिंदुसमाजावर परधर्मीयांचें किंवा मुसलमानांचें आणि विशेषतः पाकिस्तानचें प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष जें आक्रमण होत असतें, त्याचप्रमाणें हिंदुधर्मविरोधी परधर्मीयांच्या ज्या कारवाया सुरूं असतात त्या सर्वांच्या वर पहारा ठेवून त्यांची सर्वप्रकारची नोंद व दखल घेऊन हिंदुसमाजास व राज्यकर्त्यांस इशारा देऊन सावध ठेवणें हें हिंदुत्ववादी पक्षांचें विशेषतः हिंदु महासभा, राष्ट्रीय स्वयंसेवक-संघ आणि जनसंघ यांचें मुख्य कार्य असतें. हिंदु-हितसंबंधांचें संरक्षण करण्याच्या वाटेतींत










दक्षता बाळगण्यास लागणारा कार्यक्रम किंवा ध्येयवाद भारतांतील डावे गट किंवा कॉंग्रेस पक्ष यांचेपाशीं नाहीं. सामाजिक, राजकीय, सांस्कृतिक व धार्मिक दृष्टीनें हिंदुहितसंबंधांची तपशीलवार माहिती नेहमीं मिळवीत राहून त्या माहितीच्या आधारें देशांत घडणाऱ्या गोष्टींचा अर्थ लावण्याची सुद्धां आवश्यकता आहे. ही आवश्यकता कोणासहि अमान्य करतां येणार नाहीं. मुसलमान व ख्रिश्चन सक्तीनें धर्मांतर करवीत असतील किंवा धर्मप्रसाराच्या किंवा लोकसेवेच्या मिषानें मागासलेल्या वर्गाच्या अज्ञानाचा फायदा घेत असतील तर त्याचा बंदोबस्त करण्याची आवश्यकता आहेच. धर्मभोळेपणा किंवा अंधश्रद्धा यांचें खंडन करणाऱ्या हिंदु सुधारकाच्या दृष्टीनें हिंदूंचें, तीर्थस्थान मोडून मशीद जर बांधली जात असेल तर, ही गोष्ट उपेक्षणीय ठरणार नाहीं. मूर्तिपूजेवरील श्रद्धा सोडणें म्हणजे मूर्तिभंजक होणें नव्हे. हिंदू सुधारक हिंदुधर्मावरील परधर्मीयांच्या आक्रमणाची उपेक्षा करीत असेल तर ते त्याच्या सामाजिक निष्ठेस कमीपणा आणणारें होईल.

**हिंदुत्ववादी पक्षांना** अधिक महत्त्व हें ब्रिटिश अमदानींतील हिंदुमुसलमानांच्या विग्रहामुळें प्राप्त झालें. या विग्रहाला पाकिस्तानच्या निर्मितीमुळें आतां निराळें रूप आलें आहे. त्याला पूर्वी यादवीचें किंवा गृहयुद्धाचें रूप होतें व तो एक सांस्कृतिक संघर्षहि होता. सांस्कृतिक संघर्ष हें रूप त्याचें अजून कायम आहे. परन्तु पाकिस्तान व हिंदुस्थान हीं दोन स्वतंत्र राज्यें बनल्यामुळें आतां दोन राष्ट्रांतील स्पर्धा व संघर्षस्थिति हें नवें रूप त्यास प्राप्त झालें आहे. हिंदुत्ववादी पक्षांत अखंड भारताची स्थापना हा एक आत्यन्तिक ध्येयवाद अस्तित्वांत आलेला आहे. या राजकीय ध्येयवादाची पार्श्वभूमि फार पुरातन आहे. ती म्हणजे सांस्कृतिक संघर्ष होय. हिंदुसंस्कृति व इस्लाम यांचा संघर्ष शेकडों वर्षे सुरू आहे. भारताची फाळणी याच ऐतिहासिक संघर्षाचें एक भयानक फलित आहे. हिंदुसंस्कृतीला बलशाली बनवून तिला आक्रमक स्वरूप आल्याशिवाय अखंडभारताची स्थापना ही ध्येयसिद्धि होणें अशक्य आहे. या ध्येयाला पोषक असें वातावरण उत्तर हिंदुस्थानांत अधिक जोरदार आहे. त्या वातावरणास प्रदीप्त करणाऱ्या निर्वासितांच्या वसाहतीहि तेथें मोठ्या आहेत. तेथें पाकिस्तानचा संबंध फार निकटचा असतो. हिंदुसंस्कृति व अखंड हिंदुस्थान हें हिंदुत्ववादी पक्षांचे राजकीय सत्तेच्या स्पर्धाक्षेत्रांतील हुकमी पत्ते होत. उत्तर भारताचें वातावरण जसें या स्पर्धेस उत्तेजक आहे तसें दक्षिण हिंदुस्थान नव्हे. दक्षिण हिंदुस्थानांतील सामाजिक परिस्थिति एका निराळ्या गृहकलहामुळें हिंदू संस्कृतीच्या पुरस्कर्त्यांस नाउमेद करणारी बनली आहे. ब्राह्मण-ब्राह्मणेतरवाद हा दक्षिण भारतांत दृढमूल झालेला आहे. सध्यां हिंदुत्ववादी पक्ष अल्पमतांत आहेत. राष्ट्रीय स्वयंसेवकसंघ सोडल्यास इतर – हिंदुमहासभा, जनसंघ इत्यादि पक्षोपपक्ष विशेषसे संघटित नाहींत. परंतु हिंदुत्ववादी पक्षांची ज्या सांस्कृतिक भावनेच्या पार्श्वभूमीवर उभारणी झाली आहे, ती भावना मात्र फार खोल व व्यापक आहे. या पार्श्वभूमीचें राजकीय मूल्यमापन करण्याच्या अगोदर या हिंदुत्ववादी पक्षांचें संक्षिप्त वर्णन येथें करतों. हें वर्णन लक्षांत घेतलें असतां त्यांची ऐतिहासिक पार्श्वभूमि लक्षांत येईल.

हिंदुमहासभा ही सर्वांत जुनी आहे. तिचें स्थान आज जवळजवळ जनसंघानेंच घेतलें आहे. परंतु आजच्या सर्व हिंदुत्ववादी पक्षांस हिंदुमहासभेनें स्वतःच्या विचारांचा वारसा दिला आणि मोठमोठ्या नामवंत नेत्यांची परंपराहि प्राप्त करून दिली आहे. कै. मदनमोहन मालवीय, कै. डॉ. मुंजे, कै. साहित्यसम्राट् न. चिं. केळकर, स्वातंत्र्यवीर सावरकर, कै. शामाप्रसाद मुकर्जी इत्यादिकांच्या योगानें हिंदुमहासभेस प्रतिष्ठा लाभून महत्त्व प्राप्त झालें. कॉंग्रेसच्या विरुद्ध सवता सुभा म्हणून मुसलमान नेत्यांनीं मुस्लिम लीग स्थापली, तिची प्रतिक्रिया म्हणून हिंदुमहासभेस महत्त्व प्राप्त झालें. मुस्लीम लीग सुसंघटित पक्ष या नात्यानें कधींच वाढली नाहीं, तीच गत हिंदुमहासभेची. मुस्लीम लीगला महत्त्व हिंदुस्थानच्या फाळणीच्या कालखंडांत आलें. भारताची फाळणी झाली, हें मुस्लिम लीगचें यश होय व तेंच हिंदुमहासभेचें अपयश होय. या अपयशास कॉंग्रेससुद्धां अंशतः जबाबदार आहे. कॉंग्रेसची मुसलमान, ख्रिश्चन इत्यादि जमातींना समाविष्ट करणारी राष्ट्रीयत्वाची भूमिका आधुनिक जगांतील वैचारिक वातावरणास जरी शोभणारी असली तरी येथील मुसलमान जमातीला ती आत्मसात् करतां आली नाहीं. पाकिस्तानिर्मितीनं[illegible]ानांत







राज्यसत्ता आली व तेंच व्यापक राष्ट्रीयत्व कायद्याच्या साहाय्यानें रुजवण्याची जबाबदारी कॉंग्रेसनें पतकरली व हिंदुत्ववादी पक्षांना संपूर्ण जातिवादी ठरविलें. जातिवाद हा राष्ट्रांतील अंतःकलहास किंवा गृहकलहास कारणीभूत होतो म्हणून जातिवादी संघटनांवर कायदेशीर नवीं बंधनें घालण्यांत आलीं. त्यामुळें हिंदुमहासभावादी माणसें नाउमेद झालीं. या जातिवादाच्या आक्षेपांतून सुटका करून घेण्याकरितां जातिबोधक नसलेलें नवें नांव घेऊन हिंदुत्ववादी **जनसंघ** या पक्षाची स्थापना केली. अन्यधर्मीयांनाहि या पक्षाचे सभासद होण्यास अर्थात् मुभा ठेवली. वस्तुतः हिंदुमहासभेचें परिस्थितीच्या दडपणानें झालेलें रूपांतर म्हणजेच जनसंघ होय. जनसंघाला पक्षसंघटना निर्माण करण्याच्या बाबतींत हिंदुमहासभेपेक्षां त्वरित व अधिक यश मिळालें, असें दिसतें. राष्ट्रीय स्वयंसेवकसंघांतील कांहीं निष्ठावंत कार्यकर्त्यांचा पाठिंबा मिळाला हें एक या यशाचें कारण असावें. **राष्ट्रीय स्वयंसेवकसंघ** ही लष्करी शिस्तीची मोठी संघटना आहे. जीवित समर्पित केलेलीं पुष्कळ सुशिक्षित माणसें तिला मिळालीं आहेत. मुसलमानांच्या विरुद्ध सांस्कृतिक संघर्षाच्या तत्त्वावर उभारलेली, आक्रमक राष्ट्रवादाचा अवलंब केलेली आणि पाश्चात्त्य देशांतील हिट्लर-मुसोलिनी इत्यादि फॅसिस्ट राष्ट्रवाद्यांच्या संघटनातंत्राचें अवलंबन केलेली ही संघटना आहे. संघाच्या कार्यक्रमांत प्रत्यक्ष निवडणुकींत भाग घेण्याचा मुद्दा येत नाहीं. इतर राजकीय पक्षाप्रमाणें तो एक राजकीय पक्ष म्हणून वावरत नाहीं. परंतु अखंड भारत निर्मून त्यांत सांस्कृतिक राष्ट्रीयत्वाचें अथवा हिंदुत्वाचें अधिराज्य स्थापणें हेंच या संघाच्या संघटनेचें मुख्य ध्येयसूत्र आहे. गांधीवधापूर्वीच्या १२ वर्षांत संघाची अत्यन्त भराभराट झाली. हिंदूंची एवढी प्रचंड संघटना कधीं कोणी पाहिली नसेल. दुसऱ्या महायुद्धांत हिट्लरच्या विजयाची प्रगति ज्या वेगानें झाली त्याच वेगानें संघाची झाली. गांधीवधोत्तर काळांत संघास वाईट दिवस आले. शतांशानेंहि तो आतां राहिला नाहीं. परंतु आतां त्याची सद्दी संपली असें मात्र कोणी म्हणूं नये. तें अग्निबीज आहे !

हिंदुमहासभा, जनसंघ किंवा राष्ट्रीय स्वयंसेवकसंघ यांच्या सभासदांत अखंड भारताचें तत्त्व मान्य करणारे सनातनी व सुधारक अशा दोन्ही प्रवृत्तींचे लोक येऊं शकतात. सुधारक किंवा जातिभेद न मानणाऱ्या हिंदूंचा ज्यांच्यांत संग्रह होऊं शकत नाहीं, असे सनातनी हिंदूंचे **वर्णाश्रमस्वराज्यसंघ** व **रामराज्यपरिषद्** हे दोन पक्ष होत. वर्णाश्रमस्वराज्यसंघ हा आतां मागें पडला आहे. त्यांचें स्थान रामराज्यपरिषदेनें घेतलें आहे. हिंदूंच्या जातिभेदाचें, उच्चनीचभावाचें व सोवळयाओवळयाचें म्हणजे सर्व जुन्या रूढींचें समर्थन करणारे हे पक्ष आहेत. बालविवाहाच्या विरुद्ध कायदा होऊं नये म्हणून **वर्णाश्रमस्वराज्यसंघ** प्रथम अस्तित्वांत आला. काशी, कलकत्ता, मद्रास इत्यादि शहरांतील सनातनी पंडित, धार्मिक मठांचे आचार्य व जुन्या रुढीस चिकटून राहणारे ब्राह्मण, वाणी वगैरे लोक यांनीं वर्णाश्रमस्वराज्यसंघ स्थापन केला. समाजसुधारणाविषयक चळवळी व तत्संबंधीं कायदे यांना विरोध करणें हा या संघाचा मुख्य कार्यक्रम होय. देशकालपरिस्थितीची फारशी दखल न घेणारे व आपल्याच व्यवसायांत सदा निमग्न असलेले शास्त्री-पंडित या पक्षाचे नेते बनल्यामुळें हा पक्ष आपोआप नामशेष झाला. या पक्षाचें स्थान अधिक बोलक्या, चळवळया व धार्मिक उलाढाली करणाऱ्या व्यक्तींचा भरणा असलेल्या नव्या पक्षानें म्हणजे रामराज्यपरिषदेनें घेतलें. मठपती, संन्यासी, बैरागी, देवळांचे वतनदार, कीर्तनकार, पुराणिक, भिक्षुक व इतर अशा प्रकारचे समाजांत धार्मिक वजन असलेले लोक आणि त्यांच्या परिघांत वावरणारा धनिक, सुखवस्तु किंवा धर्मभोळा व सनातनी प्रवृत्तीचा अनुयायिवर्ग यांचा आधार या परिषदेस मिळाला. लोकशाही राज्याच्याऐवजीं श्रुति-स्मृति-पुराणोक्त पद्धतीचा राजा निर्माण करणें, समाजसुधारणेचे कायदे नाहिसे करणें, वर्णाश्रमधर्माची, जातिभेदाची व स्पृश्यास्पृश्यतेची मर्यादा स्थापन करणें, धार्मिक विधींचें किंवा होमहवन, यज्ञ, नामजप, तीर्थोत्सव, देवोत्सव इत्यादि परंपरांचें पुनरुज्जीवन करणें इत्यादी प्रकारचा कार्यक्रम या परिषदेनें स्वीकारला आहे. सगळेच हिंदुत्ववादी पक्ष मनानें संघराज्यसरकारनें संकल्पित केलेल्या, सर्व हिंदूंना सारखें लागूं पडणाऱ्या विवाह, वारसा इत्यादिसंबंधीं कायद्यांच्या जंत्रीला म्हणजे समान हिंदुसंहितेला ( हिंदुकोड-बिलाला ) विरोधी आहेत. परंतु रामराज्यपरिषद् तर संहिता-विधे-








यकाला उघड व निकरानें विरोध करीत आहे. कोणत्याच हिंदुत्ववादी पक्षास हें विधेयक मान्य नाहीं; म्हणजे हिंदु-समाजाला जुन्या रूढीपासून मुक्त करण्याची त्यांना खरी-खुरी उत्कंठा नाहीं. याचा असा अर्थ होतो कीं, हिंदूंच्या भूत इतिहासकालांत शेंकडों वर्षें झालेल्या अवनतीची वैज्ञानिक मीमांसा करून योग्य तत्त्वबोध घेण्यास हे पक्ष तयार नाहींत. म्हणून ते समाजपरिवर्तनाचा कोण-ताच कार्यक्रम स्वीकारण्यास तयार नाहींत.

**हिंदुत्ववादी पक्षांना** पक्ष या नात्यानें सत्तास्पर्धेच्या राजकारणांत भविष्यकाळीं यश येईल, हें सांगणें कठीण आहे. सामान्य जनांच्या नव्या आकांक्षांना आणि समता, स्वातंत्र्य इत्यादि आधुनिक मूल्यांना महत्त्व न देणारे हे पक्ष असल्यामुळें ते बहुमताचा पाठिंबा कितपत मिळवूं शकतील याबद्दलहि शंका वाटते. परंतु या पक्षांपेक्षां ते ज्या भावनेचें प्रतीक म्हणून अस्तित्वांत आले आहेत ती प्रवृत्ति व भावना अतिशय खोल आहे. ही भावना किंवा प्रवृत्ति म्हणजे परंपरागत संस्कृतीबद्दलची भावना व प्रवृत्ति होय. वाङ्मय, कला, इतिहास, धर्म, आचार आणि अभिरुचि या सगळयांच्यामध्यें मूर्त रूपास आलेली ही भावना असते. त्या भावनेचे विविध संस्कार मानवी मनांत खोल रुजलेले असतात. त्यांचेंच उदात्त रूप भारतीय अध्यात्माचा वारसा, भारतीय आत्मा, भारती-यांचा उदात्त संदेश इत्यादी उदात्त पदावलींनीं व्यक्त होत असतें. ते संस्कार मनाच्या अज्ञात अशा खोल अंतःस्थलांत संचित झालेले असतात. सगळ्या नव्या सामाजिक व राजकीय सुधारणा, राज्य-क्रांत्या व समाजपरिवर्तनें यांच्या उलथापालथीनंतरहि हे संस्कार शाबूद राहिलेले दिसतात. जर्मनींत पहिल्या महायुद्धानंतर तिसरें लोकशाही राज्य निर्माण झालें. लोकशाहीचे महान् उद्गाते त्या लोकशाही स्वातंत्र्याची प्रत्यक्ष स्थापना झालेली पाहून आनंदगीतें गाऊं लागले व त्याच्या ध्यानांत निमग्न झाले. परंतु तेथेंच परंपरेचा खोल दडलेला शेषरूप अभिमान धरणीकंपा-चा धक्का देऊन सहस्र फणांनीं बाहेर आला व हुकूम-शाहीच्या रूपानें त्यानें आपलें मस्तक उन्नत गिरि-शिखराप्रमाणें गगन भेदून वर नेलें. रशियांतहि ३८ वर्षांपूर्वी साम्यवादाच्या स्थापनेची घोषणा झाली. परंतु आतां जुन्या झारशाही साम्राज्याचें एक नवें रूप लाल साम्राज्याचा अवतार घेऊन निर्माण झालेलें त्या ठिकाणीं दिसत आहे. भारतांतील सांस्कृतिक राष्ट्रीयत्वहि नवो-दित लोकशाहीला प्रसंगविशेषीं मागें सारून पुढें येणार नाहीं अशी हमी देण्यासारखें स्थित्यन्तर किंवा सामाजिक परिवर्तन येथें अजून झालेलें नाहीं. हिंदुत्ववादी पक्ष या सांस्कृतिक राष्ट्रीयत्वाची जपणूक करीत आहेत. हें सांस्कृतिक राष्ट्रीयत्व कदाचित् काँग्रेसमध्येंहि विजयी होऊन प्रभाव गाजवूं शकेल. त्याबद्दल नकारात्मक हमी देतां येणें शक्य नाहीं. कारण सांस्कृतिक राष्ट्रीय-त्वाचें अधिष्ठानभूत असलेली भावना ही या देशांतील खोल रुजलेली व्यापक भावना आहे.

प्राचीन व परंपरागत समाजव्यवस्था, संस्कृति व धार्मिक प्रतीकें यासंबंधीं असलेल्या पवित्र भावनेनें किंवा श्रद्धेनें त्या संस्कृतीच्या किंवा त्या धर्माच्या लोकांत एक सामुदायिक उच्च अहंता ( super-ego ) निर्माण झालेली असते. सांस्कृतिक राष्ट्रीयत्व हें याच उच्च व सामुदायिक अहंतेचें स्पष्ट रूप होय. प्राचीन सांस्कृतिक परंपरा, जुनीं धार्मिक प्रतीकें, जुनी समाज-व्यवस्था व त्यांचीं मूल्यें वर्तमानकाळीं मुळापासून बदलत असलेल्या परिस्थितीच्या प्रभावानें निष्प्रभ होत आहेत. विद्यमान परिस्थितीच्या संनिकर्षांत त्या सांस्कृतिक अहंतेला वस्तुस्थितीचें पाठबळ राहिलें नाहीं व राहणें शक्य नाहीं. नव्या पाश्चात्य विद्या व कला, त्याचप्रमाणें अत्यंत आवश्यक व अपरिहार्यपणें स्वीकार्य अशी नवी अर्थशास्त्रीय संघटना यांच्या योगानें-च भारतास ऊर्जित अवस्था येणार, हें एक प्रभावी सत्य आहे. हें सत्य गृहीत धरल्यावर प्राचीन परंपरेचीं मूल्यें, जुन्या श्रद्धा व जुन्या समाजव्यवस्थेंतील सामा-जिक संबंध यापुढें टिकूं शकणार नाहींत हें मानणें प्राप्तच होतें. नव्या विद्या व कला यांच्या शिक्षणाचीं द्वारें सर्वसामान्य जनतेस खुलीं होऊन लोकांची त्यांत प्रगति झाल्यावर जुन्या उच्चनीचभावाच्या व सामाजिक मानमान्यतेच्या मूल्यांचीं कदर सामान्य जनता करणें शक्य नाहीं. चातुर्वर्ण्य व श्रुति-स्मृतिपुराणोक्त आचारधर्म यांचा महिमा नव्या सामाजिक व आर्थिक व्यवस्थेंत विलीन होणार याबद्दल जाणत्या माणसास शंका असण्याचें कारण नाहीं. त्या संस्थांची पूज्यता संपत चालली आहे. जातिभेद शिल्लक आहे, परंतु कोणतीहि विशिष्ट जात








उच्च जातीस उच्च समजण्यास तयार नाहीं. नव्या शिक्षणानें पुराणकथांच्या प्रामाण्यास सुरुंग लागला आहे. त्यामुळें जुनें पावित्र्य व पवित्रस्थानें धोक्यांत आलीं आहेत.

सांस्कृतिक राष्ट्रीयत्वाच्या मुळाशीं असलेल्या उच्च अहंतेला वस्तुस्थितीचा पाठिंबा नाहिसा होत असतांना ती अधिक उत्तेजित कां होत आहे, हा महत्त्वाचा प्रश्न आहे. याचें उत्तर सामाजिक मानसशास्त्राच्या द्वारा मिळूं शकतें. सांस्कृतिक राष्ट्रीयत्व किंवा हिंदुत्वनिष्ठा हिचा मुख्यतः पुरस्कार करणारें नेतृत्व ज्या वर्गांतील किंवा सामाजिक गटांतील व्यक्तींमधून निर्माण होत आहे त्यांच्या अस्वस्थ, ताण पडलेल्या व शिणलेल्या मनःस्थितींत या अहंतेच्या प्रकोपाचें कारण सांपडतें. समाजांतील जुन्या प्रतिष्ठित वर्गांतील वा समाजिक गटांतील या व्यक्ती आहेत. परंपरागत समाजव्यवस्थेंत प्रतिष्ठा, सुरक्षितपणा व स्वास्थ्य लाभलेल्या वर्गांतील वा सामाजिक थरांतील या व्यक्ती आहेत. नव्या सामाजिक, राजकीय व आर्थिक युगांतील घडामोडींनीं जुनी सामाजिक व्यवस्था बदलूं लागली आहे. जुनी घडी विस्कटून गेली आहे. नव्या परिवर्तन घडविणाऱ्या शक्ती त्यांना भेडसावीत आहेत. ' तें अनायासें लाभलेलें स्थैर्य, ती प्रतिष्ठा, ती सहजलब्ध मानमान्यता आणि ती निश्चिन्त मानसिक स्वस्थता आतां संपली वस्तुत ! ' जुन्या समाजव्यवस्थेंत व्यक्तिस्वातंत्र्यास जागा नव्हती; व्यक्ति सामाजिक रूढीच्या बंधनांत सर्व बाजूंनीं जखडलेली होती; तीं बंधनें नव्या परिस्थितींत तुटून पडत आहेत; म्हणून बंधमुक्त होणाऱ्या व्यक्तींना हायसें वाटावयास पाहिजे. परंतु त्याच्या विपरीतच मनःस्थिति होत आहे. याचें मुख्य कारण व्यक्तींना नव्या परिस्थितींत निराधारतेचें भय वाटूं लागलें आहे. त्यामुळें आत्मविश्वास नष्ट झाला आहे. याचीं मुख्यतः तीन कारणें आहेतः ( १ ) दीर्घकालीन संस्कारांच्या योगानें दृढ झालेल्या भावनामय अशा जुन्या पावित्र्यांनीं, पूज्यभावनांनीं व श्रद्धांनीं मनाचें बळ टिकत असें व समाधान रहात असें. ते श्रद्धेचे आधार, भावनामय पावित्र्यें व पूज्यतेचीं तेजोवलयें तुटून पडत असल्यामुळें नेत्र तिमिरांध होतात, निराधारपणा वाटतो व मनोधैर्य नष्ट होतें. (२) जुनी स्थिर कुटुंबसंस्था, आर्थिक तरतूद व सामाजिक प्रतिष्ठा यांचा आधार डळमळीत झाल्यामुळें आणि नवे व्यवसाय व व्यवहार यांच्यांत नित्यस्पर्धा व चंचलता असल्यामुळें मनाला नित्य ताण पडत असतो व त्यामुळें मन शिणतें; शिणलेलें मन स्वास्थ्याचें स्थान शोधीत असतें. (३) समाजांतील बहुसंख्याक लोक पूर्वीच्या समाजस्थितींत अल्पसंतुष्ट राहून युगानुयुगें आपल्या ठराविक व्यवसायचक्रांतून बाहेर पडूं शकत नसत किंवा आपल्या मागासलेपणाबद्दल त्यांना कसलीहि खंत वाटत नसे; त्या बहुसंख्याकांत आतां चलबिचल सुरूं झाली आहे. ते असंतुष्ट बनूं लागले आहेत, अल्पसंख्याक असलेल्या भाग्यवंतांच्या क्षेत्रांत शिरून ते त्यांच्या भाग्याचा हेवा करूं लागले आहेत. म्हणूनहि जुन्या प्रतिष्ठित जमातींतील व्यक्ती अस्वस्थ बनल्या आहेत. त्यांचीं मनें आधार शोधीत आहेत. जुन्या परंपरेच्या संस्कारांच्या पर्वतप्राय ढिगांतून त्यांना आधार व आश्वासन देणारी शक्ति प्रकट झालेली दिसूं लागली आहे. ती म्हणजे प्राचीन अमर, अभयद व सर्व जगांत श्रेष्ठ अशी आध्यात्मिक हिंदुसंस्कृति किंवा महान् हिंदुत्व किंवा दिव्य राष्ट्रपुरुष ! सांस्कृतिक राष्ट्रीयत्वाच्या उदयाची ही मानसिक मीमांसा आहे; हेंच हिंदुत्व होय. हें सांस्कृतिक राष्ट्रीयत्व केवळ हिंदुत्ववादी पक्षांच्या सभासदांच्या मनोभूमींतच वसत नाहीं. तें कॉंग्रेस, समाजवादी पक्ष, सर्वोदयवाले इत्यादि अन्य सर्व गटांतील व पक्षांतील सभासदांच्या व अपक्षीय हिंदु व्यक्तींच्याहि मनोभूमींत वसत आहे. तें अत्यंत व्यापक व गंभीर आहे. वरच्या वर्गांत व विशेषतः मध्यम वर्गांत त्याचें नेतृत्व आहे; खालच्या सर्व वर्गांत त्याचें अनुयायित्व आहे.

खालच्या वर्गांची व वरच्या वर्गांची परंपरागत एकच संस्कृति, समान पूजास्थानें, समान विभूति, समान जीवनमूल्यें, समान धार्मिक भावना व समान तत्त्वज्ञानें असल्यामुळें सांस्कृतिक राष्ट्रीयत्व त्यांच्याहि मनांत वसति करून राहिलें आहे. वर्तमान परिस्थितीनें केवळ वरच्याच सामाजिक थरांना धक्का देऊन विस्कळित व निराधार बनविलेलें नाहीं. ह्या परिस्थितीनें खालच्या थरांतील सामाजिक गटहि खिळखिळे होऊन त्यांचेंहि जीवन अस्वस्थ व निराश्रित झालें आहे. त्यामुळें शरणागतीची भावना व आत्मविश्वासशून्यता त्यांनाहि आली आहे. त्यांचींहि मनें व्यथित झालीं आहेत. त्यांचींहि मनें ह्या सांस्कृतिक राष्ट्रीयत्वाचें आकर्षण वाटण्याइतकीं हळुवार बनलीं आहेत.







( कै. परचुरेशास्त्री यांच्या कांहीं आठवणी )

# ‘सेवाग्रामींचा सन्त’

[ **कै. दत्तात्रेय वासुदेव परचुरेशास्त्री** ( जन्म : १६ आक्टोबर १८८८ – मृत्यु : ९ सेप्टेंबर १९४५ ) हे महाराष्ट्रांतील एक निष्ठावंत गांधीवादी कार्यकर्ते होऊन गेले. सातारा जिल्ह्यांतील सोनी हें त्यांचें मूळ गांव. सांगली येथील हायस्कूलमध्यें मॅट्रिक क्लासमध्यें असतांनाच ते हायस्कूल सोडून वाईस संस्कृत अध्ययन करण्यास गेले. तेथें अध्ययन चालूं असतां त्यांनीं प्राज्ञ पाठशाळेमध्यें कांहीं दिवस अध्यापकाचें काम केलें. १९१४ सालीं ते विवाहबद्ध होऊन जन्मस्थानीं परत आले. १९२३ सालीं मुळशी-सत्याग्रहांत सामील झाले. तेथून शिक्षा भोगून परत आल्यावर, गांधींच्या रचनात्मक कार्यास – विशेषतः ग्रामसेवा व अस्पृश्योद्धार या कार्यास त्यांनीं निष्ठेनें वाहून घेतलें. त्यांनीं ‘ खेडेगांवाची यात्रा ’ या नांवाचें एक पुस्तक लिहिलें. हें सेवाकार्य करीत असतांनाच त्यांना कुष्ठरोगानें पछाडलें. १९३६ सालीं ते वर्धा येथील कुष्ठरोगी-सेवामंडळाच्या आश्रमवासियांत दाखल झाले. पुढें तेथेंच १९४५ मध्यें त्यांचें देहावसान झालें. म. गांधींच्या सांनिध्यांत असतांना, त्यांना गांधीजींच्या व्यक्तिमत्त्वाचा जो अनुभव आला तो त्यांनीं त्यांचे भाचे श्री. कृष्णानंद गोगटे यांना पाठविलेल्या पत्रांतून कळविला. कै. परचुरेशास्त्री यांच्या त्या पत्रांतील गांधीजींच्या कांहीं आठवणींतून पुढील भाग उद्धृत केला आहे. गांधीजींची रुग्णसेवेबद्दलची अपरंपार तळमळ गांधीजींच्या त्या जीवनाभ्यासकांना सुविदितच आहे. कै. परचुरेशास्त्री यांच्या प्रस्तुत आठवणी या गांधीजींच्या तळमळीचें हृदयंगम निदर्शन होत. –– श्री. कृष्णानंद गोगटे हे संख ( द. सातारा ) येथें डॉक्टर आहेत. त्यांनीं कै. परचुरेशास्त्री यांच्या पत्रांतील प्रस्तुत उतारे ‘ नवभारता’कडे प्रसिद्धीस दिल्याबद्दल त्यांचे मनःपूर्वक आभार –– का. सं. ]

एकोणीसशें एकोणचाळीस सालीं मी सातारा सोडला, जम्नोत्रीगंगोत्रीकडील उत्तर काशीची यात्रा भगवंतानें पायीं घडविली. नाना सुखदुःखांचे अनुभव चाखले. जळजळीत अपमानाचे निखारे खाल्ले. आतां काय करायचें उरलें आहे ? संताच्या चरणधूलींत हा देह पडावा ही इच्छा. पण तो संत कुठें हुडकावा ? कांहीं विचार सुचेना ! मार्ग दिसेना, भ्रांत झालों. चकदिशीं डोक्यांत प्रकाश पडला. अरे, हा साक्षात् प्रचंड पुण्यपुंज शुद्धकर्पूरोच्चय सेवाग्रामींचा संत आहे ना ! जीवन्मुक्त संत कुठें आतां हुडकावा ? त्याच्या अलीकडच्या भूमिकेवर असणारा, महारोग्याला मिठी मारणारा हा महायोगीच पुरे आपल्यास. म्हणून येथें आलों.

माझा बापू ! छे ! ‘बाप माझा ब्रह्मचारी’ असें तुक्या ज्या आंजनेयाला गाता झाला तोच हा साक्षात् अवतार समज. सप्टेंबर मास १९४०. मुंबईला उद्यां ऑल इंडिया कॉंग्रेस बैठक. संध्याकाळीं गाडीची घाई. पण ‘ शास्त्रीजी’च्या दीडशेर वजनाच्या लिपोमाचें ऑपरेशन आज चाललेलें. बापूला चैन नाहीं. खुर्ची टाकून १॥ तास म्हातारा शेजारीं ताटकळत बसला होता. वारंवार पुसावें ‘ कैसे है शास्त्रीजी ’ ? डॉक्टर तिघे होते. त्यांनीं पट्ट्या बांधल्या. परचुरेशास्त्री उठून टेबलावर बसला. बापूनें त्याच्या डोक्यावरून प्रेमानें हात फिरवला. ‘ मै अबी भाग जाता हूँ , हां ! चार पाँच दिनोंमें वापस आऊंगा, अच्छे हो जाव ’ असे बोलून मोटारीकडे धावला. काय, किती वर्णूं त्याचें प्रेम !

मला एकदां पूज्य गांधीजी म्हणाले : “ शास्त्रीजी, तुम्ही शास्त्र-ग्रंथ अवलोका. मी हें जिवंत जग नित्य नवें वाचतों आहे. मला पोथीपुस्तक पाहणेस सवडच नाहीं. माझ्या बोलण्याला नी तुमच्या पोथीला जेथें समन्वय असेल तेथें मला सांगा. ” त्या विश्वजनप्रिय, प्रियंधामाचे बोल मी कोठवर तुला लिहूं ! ह्या जडदेह-पंजरांतून त्या लीलाशुकानें भरारी मारून दिनरात्र आगाखान प्रासादशिखरीं घिरट्या घालीत, माझ्या बापूच्या मागें मागें रहावेसें वाटतें. … वर







मीन खेळणारी लहरी होऊन एकरूप व्हावेसें वाटतें. एका महारोग्यावर एका महायोग्याचें प्रेम कसें वसलें हें शब्दानें कसें लिहूं !

मानवाला श्रीभगवंतांनीं एकच एक अमोल व सुखदायी अशी देणगी दिली आहे. ती 'निर्मल, निःसीम, निरपेक्ष प्रेम ' ! पू. बापूंनीं त्याचा प्रसार करून व अनुभव घेऊन मानव्यावर अनंत उपकार करून ठेवले आहेत. पुनश्च त्यांची संगति कधी बरें घडेल ? त्या प्रियधाम प्रेमळाकडे माझें चित्त दिनरात्र वेधून राहिलें आहे. –

( मृत्यूपूर्वीं कांहीं दिवस लिहिलेल्या पत्रांतून कै. परचुरेशास्त्री यांनीं पुढील भावना प्रगट केल्या ).

ॐ आशिषः समुल्लसन्तुतराम् ।

हें जगत् काय आहे ? मृत्यु काय चीज आहे ? हे प्रेमी बंधुभगिनी कोठें जाणार ? हा देह पडल्यानंतर या अनंत विश्वाचा जीवाशीं संबंध काय, कसा, कोणता इत्यादि नाना तरंगांत मानसहंस क्रीडत असतां गेल्या ५० वर्षांचा कौटुंबिक इतिहास कल्पनासृष्टींत एकदम उतरला. वयाच्या १६ व्या वर्षीं घर सोडलें. मध्यंतरीं ४।५ वर्षेंच पुनश्च बंधुभगिनींचा संपर्क घडला. पुनश्च १९१९ सालीं गृहत्याग, आणि रोगामुळें १९३० सालीं सर्वांचा संग सोडून श्रीरामार्पण देह केला. सतत १२ वर्षें वृक्षमूलनिकेतन, स्मशानवनसेवन, नानातीर्थक्षेत्र-भ्रमण, कारानिवास अशी मौज भोगली. त्यांतच अनंत जन्मींचें पुण्य कीं एका महायोग्याशीं या महा-रोग्याचें अतुट प्रेम जडलें. मातृभूमीची सेवा घडावी, या देहाचें बलिदान तिच्या चरणीं व्हावें पण तसें कांहींच घडलें नाहीं, भारतानंद-एक पोलिश गृहस्थ, अमतुस्स-लामदेवी अशा अफाट कुटुंबीप्रेमी व्यक्तींनीं या कुष्ट-दुष्ट-वपु भिक्षूची अपार सेवा केली, त्याला सुखविलें. या अशाश्वत मनुष्यलोकीं प्रिय वस्तूला तरी आपण सोडून जाणार किंवा त्या वस्तू आपणाला सोडणार असा क्षणोक्षणीं प्रत्यय आपणाला येत आहे. हा देह पडला, म्हणजे ज्यांच्यावर आपण निर्मल प्रेम केलें तीं सारीं पुत्रमित्रकलत्र, सुहृद्बंधूभगिनी, मातापिता ही कायम-चींच अस्तंगत व्हायचीं काय ? जे प्रियजन मला आजपर्यंत सोडून गेले त्यांचा पत्ताच नाहीं. बरें, माझें हें शरीर पडल्यानंतर तरी ते जेथें गेले असतील तेथेंच मी जाऊन पुनर्मिलन होणेचा संभव आहे काय ?

## एक आत्मिक अनुभव

पणजींत असतां मी एकदां सिनेमाला जायला निघालों होतों. सिनेमा, नाटकें इत्यादिकांचा मी फारसा शौकी नाहीं. उच्च मनोवृत्तीची जागृति व परिपोष करणारे निवडक सिनेमाच मी पाहत असतों.

जातांना वाटेंत, एका घराच्या फूटपाथवर एक बाई बसलेली पाहिली. झाडूवाले वगैरे असल्यासारख्या वर्गांतीलच ती होती. वस्त्र जुनें व फाटकेंतुटकें होतें. व आपलें लहान मूल तिनें मांडीवर घेतलें होतें. तें मूल खायला देण्याकरतां जीव तोडून तोडून तिच्याकडे मागत होतें; पण तिकडे लक्ष न देतां खिन्न व उदास-वाण्या मुद्रेनें ती बसली होती. ते दिवस आत्यंतिक महागाईचे होते. तेव्हां मी लगेच ताडलें कीं मुलाला देण्याकरतां तिच्यापाशीं कांहींहि नाहीं.

तिची ती स्थिति पाहून माझें मन कळवळलें. व लगेच खिशांतील पाकिटांतून एक रुपया काढून, तिला जवळ बोलावून, मुलाकरितां म्हणून तो मी तिच्या हातावर ठेवला.

प्रथमदर्शनींच ती भांबावल्यासारखी दिसली. जणूं काय तोंपर्यंत मिळालेल्या जगाच्या अनुभवापेक्षां हा तिचा अनुभव निराळा होता ! लगेच भानावर येऊन, सद्गदित कंठानें व अश्रुपूर्ण नेत्रांनी, " सायबा, तुमचें देव बरेंऽऽकरूं " असें शुभचिंतन तिनें मनः-पूर्वक केलें !

या तिच्या कृतज्ञताप्रदर्शनापेक्षांहि, माझ्या हातून घडलेल्या या सत्पात्रीं दानाच्या जाणीवेनें मला असें समाधान झालें कीं तें शब्दांनीं सांगतां येणें कठीण ! अनुभवानेंच जाणावयाचें ! इंद्रियांच्या विविध सुखांचा अनुभव घेतला आहे पण तीं सुखें त्या त्या वेळेपुरतींच ! ती वेळ गेल्यावर संवेदनांच्या पुनरावृत्ती-च्या अभावीं त्यांचा मागमूसहि रहात नाहीं ! पण या सुखाचें तसें नाहीं. या सुखाची जातच निराळी ! इतर सुखांपासून होणारा आनंद केवळ वरवरचा पण हा आनंद अगदीं आंतून ! मनाच्या सुखांतहि ( उदा० प्रेमजन्य ) एक प्रकारचा अहंभाव, अस्मिता, आसक्ति व तज्जन्य अपेक्षा फलाकांक्षा असते तशी यांत नव्हती. बुद्धीचें सुख म्हणूं गेल्यास बुद्धीचा उपयोग त्या कामीं झालेला नव्हता, म्हणून त्याच्याहि वरचें, शुद्ध सात्विक व फलकांक्षा-विरहित आत्म्याचें सुख असें त्याला म्हणावें लागेल.

— शाबाराव कृ. सू. सरदेसाई (पंजिम)










अनुक्रमणिका

# सार-संकलन

**जिनेव्हापरिषदेची फलश्रुति** – जगांतील चार बड्या राष्ट्रांची जी अलीकडे जिनेव्हा येथें परिषद् भरली होती तिच्यासंबंधीं सोव्हिएट युनिअन, अमेरिका व इंग्लंड यांच्या मुख्य प्रधानांनीं आपापल्या राष्ट्रप्रतिनिधींना निवेदनें सादर केलीं. त्या निवेदनांवरून जिनेव्हापरिषदेची फलश्रुति अजमावणें उद्बोधक ठरेल.

मा० बुल्गॅनिन यांनीं 'सुप्रीम सोव्हिएट' पुढें ४।८।५५ रोजीं जो अहवाल सादर केला त्यांतून पुढील भाग घेतला आहे :

"जागतिक परिस्थितींतील ताण कमी करणें आणि राष्ट्राराष्ट्रांच्या पारस्परिक संबंधांत आवश्यक विश्वासाचें वातावरण प्रस्थापित करणें हेंच चारहि राष्ट्रप्रमुखांच्या परिषदेपुढील महत्त्वाचें कार्य होय, या भूमिकेपासून सोव्हिएट सरकारनें आरंभ केला. अशा तऱ्हेचें वातावरण निर्माण झाल्यावांचून वादग्रस्त आंतरराष्ट्रीय प्रश्न सोडविण्यासंबंधीं यथार्थतेनें बोलतांच यावयाचें नाहीं.

"सोव्हिएट प्रतिनिधी आशिया आणि युरोपमधील व अन्य आंतरराष्ट्रीय प्रश्न सोडविण्याच्या मार्गांतील अडचणी कोणत्याहि प्रकारें कमी लेखीत नाहींत व ही गोष्ट त्यांनीं अमेरिका, ब्रिटन आणि फ्रान्स यांतील मुत्सद्द्यांच्या नजरेस आणली होती. परिषदेंत भाग घेणारांनीं या अडचणींचें निराकरण करण्याच्या हेतूनें एकत्र यावयाचें ठरविल्यास परिषदेंतील चर्चेंतून कांहींतरी निश्चित परिणामकारक फलप्राप्ति होण्याची हमी देतां येईल.

"सर्वसामान्य स्वरूपाचा युरोपीय करार हाच युरोपची सुरक्षितता अबाधित राखण्याचा विश्वासार्ह मार्ग होय असें सोव्हिएट-सरकारचें मत होतें आणि अजूनहि आहे. याचाच अर्थ असा कीं सर्व युरोपीय राष्ट्रें आणि अमेरिका यांनीं मिळून एक सामुदायिक सरंक्षणसंघटना प्रस्थापित केली पाहिजे. कांहीं युरोपीय राष्ट्रांनीं इतर युरोपीय राष्ट्रांविरुद्ध लष्करी संघटना उभारण्याऐवजीं सर्वांची मिळून एक सामुदायिक संरक्षणसंघटना उभारली जाणें हेंच सर्व युरोपीय जनतेच्या हिताच्या दृष्टीनें योग्य होय. लष्करी संघटनांनीं आजवर अनेकदां जनतेला युद्धाच्या खाईंत ढकललें आहे.

"जर्मनीच्या एकीकरणाच्या प्रश्नाचा विचार करतांना 'जर्मन डेमोक्रॅटिक रिपब्लिक' अथवा 'फेडरल रिपब्लिक ऑफ जर्मनी' यांच्या मताकडे दुर्लक्ष करून चालणार नाहीं. म्हणजेच प्रत्यक्ष जर्मनीनें भाग घेतल्यावांचून हा प्रश्न सुटूं शकत नाहीं. याचा अर्थ असा कीं आजच्या आंतरराष्ट्रीय परिस्थितींत आणि जर्मनींत निर्माण झालेल्या अंतर्गत परिस्थितींत जर्मनीच्या दोन्ही भागांना यांत्रिक पद्धतीनें एकत्र आणून एकीकरण होणें अशक्य आहे. ह्या वस्तुस्थितीची योग्य दखल घेतल्याशिवाय अशा प्रकारचे प्रयत्न वा योजना यशस्वी होऊं शकणार नाहींत. आजच्या परिस्थितींत शांतता व प्रगति साधण्यासाठीं जर्मनीच्या दोन्ही विभागांनीं एकत्र आल्यानेंच आणि एकमेकांशीं सहकार्य केल्यानेंच जर्मनीचा प्रश्न सावकाशीनें हळुहळु सुटूं शकेल.

"जिनिव्हा येथें जर्मनीविषयीं आमच्या भूमिकांत परस्परांना समान मुद्दे असे कांहींच आढळले नाहींत. तथापि एकमेकांचे विचार जाणून घेण्याचा जो प्रयत्न झाला आणि सोव्हिएट प्रतिनिधींनीं आपली जी भूमिका स्पष्ट केली त्यांत जिनिव्हा परिषदेंतून उद्भवलेल्या प्रश्नांचा विचार करण्यासाठीं ऑक्टोबरमध्यें जेव्हां परराष्ट्रमंत्री एकत्र येतील तेव्हां त्यांना उपयोग होऊं शकेल.

"निःशस्त्रीकरणाच्या प्रश्नाचा विचार करतांना निरनिराळ्या राष्ट्रांच्या या प्रश्नासंबंधींच्या भूमिका शक्य तों जवळजवळ आणणें आणि शस्त्र-सामर्थ्य कमी करण्याबाबत व अण्वस्त्रांवर बंदी घालण्याबाबत निश्चित ऐकमत्य साधणें हें, सोव्हिएटसरकारच्या मतें, खरें कार्य आहे.

"निःशस्त्रीकरणाच्या कोणत्याहि योजनेचें रूपान्तर हें अखेरीस नियंत्रण व निरीक्षणाच्या प्रश्नांतच होतें असें जें अमेरिकेच्या रिपोर्टांत म्हटलें तें योग्यच आहे. शस्त्रांचें नियंत्रण आणि निरीक्षण हा अत्यंत गंभीर प्रश्न आहे. सर्वांना संमत होईल असाच कांहीं ... आपण



अनुक्रमणिका

शोधून काढला पाहिजे.

" जिनिव्हा परिषदेचे परिणाम म्हणून पुढील गोष्टी नमूद करतां येतील :

" एक म्हणजे या परिषदेमुळें राष्ट्राराष्ट्रांमधील ताण निश्चितपणें कमी झाला आहे. टिकाऊ स्वरूपाची शांतता कायमची प्रस्थापित करण्याचें उच्च ध्येय साधण्यासाठीं त्याचा उपयोग होऊं शकेल. सोव्हिएट सरकार हें ध्येय साधण्यासाठीं सर्वतोपरीनें प्रयत्न करील.

" दुसरें, या परिषदेच्या निमित्तानें चार राष्ट्रांतील राज्यकर्त्यांचे आलेले वैयक्तिक संबंध त्यांच्या झालेल्या औपचारिक चर्चेइतकेच महत्त्वाचे व फलदायक ठरण्याचा संभव आहे. हे संबंध अधिक विकसित व दृढ व्हावेत यासाठीं पुढें देखील प्रयत्न करण्याची सोव्हिएट सरकारची तयारी आहे.

" याशिवाय बड्या चौघांच्या आणि अन्य राष्ट्रांच्याहि परस्परसंबंधांत सुधारणा घडून येण्याच्या दृष्टीनें ही परिषद् म्हणजे अत्यंत महत्त्वाचें पहिलें पाऊल होय. यामुळें शीतयुद्धाचा शेवट होईल अशी आशा वाटते. मात्र प्रत्येक बाजूनें त्यासाठीं सद्‌हेतूनें व प्रामाणिकपणानें प्रयत्न केला पाहिजे."

प्रे. आइसेनहॉवर यांनीं अमेरिकन जनतेस उद्देशून जें २५।७।५५ रोजीं भाषण केलें त्यांतून पुढील भाग घेतला आहे :

" शांतता आणि शांततेसाठीं प्रयत्न यांत अनेक गुंतागुंतीचे व गोंधळांत पाडणारे प्रश्न अंतर्भूत झालेले आहेत : उदा०, लहानमोठ्या सर्व राष्ट्रांना न्याय मिळावा, स्वातंत्र्य लाभावें, सर्व राष्ट्रांना सुरक्षितता लाभावी, त्यांच्या आर्थिक जीवनाची भरभराट व्हावी, जगांत सर्वत्र राहणीच्या मानांत सुधारणा व्हावी इत्यादि. त्याचप्रमाणें आपणां सर्वांना शांततेच्या आणि सुरक्षिततेच्या वातावरणांत एकत्र रहाण्याची संधि मिळाली पाहिजे. स्वाभाविकपणेंच अशा प्रकारच्या प्रश्नांचा उकल करतांना दांडगाईनें पुढें मुसंडी मारून जाण्याचा उपयोग नाहीं. निष्कर्ष काढतांना आणि त्याप्रमाणें प्रत्यक्ष कृति करतांना आपण अत्यंत विवेकपूर्ण व सावधगिरीचीच दृष्टि बाळगली पाहिजे. उपेक्षेची वा आत्मतुष्टतेची वृत्ति राखून चालणार नाहीं. त्याबरोबरच आपण सदैव आशावादी असलें पाहिजे, आत्मविश्वास आणि आपल्या कार्याविषयीं श्रद्धा बाळगली पाहिजे. नाहींतर आपल्या अत्यंत उदात्त उद्दिष्टांना आपल्याच नैराश्यामुळें आणि अश्रद्धपणामुळें आपणच बाधा आणूं.

" केवळ एका आठवड्यांतील मैत्रीपूर्ण किंबहुना फलदायक चर्चेमुळें पूर्व आणि पश्चिम यांजमधील अत्यंत मोठा भेद आणि त्यांतून निर्माण होणारे अनेक प्रकारचे प्रश्न चुटकीसरसे नाहींसे होतील असा गैरसमज आपण कधींही करून घेतां कामा नये. हा भेद म्हणजे एका बाजूला व्यक्तिस्वातंत्र्य आणि दुसऱ्या बाजूला हुकूमशाही, एका बाजूला 'सोऽहम्' स्वरूपाची मानवाबद्दलची कल्पना आणि दुसऱ्या बाजूला त्याला राज्याच्या हातांतील एक खेळणें समजण्याची वृत्ति – यांजमधील भेदाइतका प्रचंड आणि तीव्र भेद आहे. अर्थात् या बाबींचा आपण विचार करूं लागलों म्हणजे निराशा वाटणें स्वाभाविक आहे. तथापि केवळ आपल्या सूचना, मार्ग वा श्रद्धा दुसऱ्या पक्षास लागलीच मान्य होत नाहींत म्हणून निराश होण्याचें कारण नाहीं.

" अण्वस्त्रांचें युद्ध हें अखेरीस प्रत्यक्षांत सर्व मानवजातीच्या आत्मनाशास कारणीभूत ठरेल ही जाणीव आतां सर्वांनाच अधिकाधिक होऊं लागली आहे. त्याचप्रमाणें सामोपचाराचीं बोलणीं करतांना प्रचार, दमदाटी वा शिवराळपणा यांचा उपयोग करण्याची जरूरी नाहीं हेंहि समजूं लागलें आहे. त्याबरोबरच शांततेसाठीं आपल्या सुसंस्कृतपणाच्या व न्यायाच्या कल्पनांना बाध न आणतां अमेरिका सर्व प्रकारचे प्रयत्न करील हीहि स्पष्ट जाणीव सर्वांना झाली आहे. आमचे हेतु शुद्ध असून प्रगति करायची आम्हांला तळमळ आहे. सोव्हिएटशीं आणि इतर कुणाशींहि सहकार्यानें वागण्याची आमची पूर्ण तयारी आहे.

" कार्यक्रमपत्रिकेवर असलेल्या विषयांपैकीं जर्मनीचें एकत्रीकरण आणि युरोपची सुरक्षितता या प्रश्नाइतका दुसरा कोणताहि प्रश्न आम्हांस त्रासदायक वाटला नाहीं. प्रथम हे दोन प्रश्न एकमेकांपासून अलग करतां येतील अशी आमची कल्पना होती. तथापि लवकरच एकच प्रश्न म्हणून त्यासंबंधीं विचार केला पाहिजे असें अमेरिकन प्रतिनिधींनीं ठरविलें. पूर्व आणि पश्चिम अशा दोन्ही भागांतील राष्ट्रांना






संरक्षणाची शाश्वती वाटावी याकरितां जर्मन जनतेनें मोकळेपणानें निवडलेल्या सरकारची स्थापना होऊन जर्मनीचें एकत्रीकरण व्हावें असें आमचें मत होतें. वस्तुतः हें एकत्रीकरण युरोपीय सुरक्षिततेच्या चौकटींतच व्हावयास हवें. निःशस्त्रीकरणाच्या बाबतींत विचार करतां मुळांत सगळीकडे शस्त्रांचें परिणामकारक निरीक्षण आणि नियंत्रण होऊं शकेल अशी यंत्रणा निर्माण केल्यावांचून प्रभावी स्वरूपांत कोणतीहि निःशस्त्रीकरणाची योजना पार पाडतां येणार नाहीं असें अमेरिकन सरकारचें मत आहे. अशा प्रकारच्या यंत्रणेसंबंधीं उभय पक्षांना विश्वास वाटला पाहिजे, दुसरी बाजू आपली जबाबदारी पार पाडीत आहे हें स्पष्टपणें समजलें पाहिजे. या भूमिकेवरून ब्रिटन व फ्रान्स यांच्या सहकार्यानें आम्ही अनेक योजना पुढें मांडल्या. यांतील कांहीं जागतिक स्वरूपाच्या होत्या; कांहीं मर्यादित होत्या. तथापि निरीक्षण हाच निःशस्त्रीकरणाचा खरा आधार आहे ही कल्पना त्या सर्वांच्या मुळाशीं होती. यांतीलच एक सूचना म्हणजे शस्त्रविरहित विमानांतून एकमेकांच्या प्रदेशाचे फोटो घेण्याची कल्पना होय. अशा प्रकारचें निरीक्षण शक्य तितकें परिणामकारक करणें हाच हेतु या कल्पनेंत होता. अर्थात् यांतील मुख्य उद्दिष्ट म्हणजे पाश्चात्य राष्ट्रांच्या शांततेवरील निष्ठेबाबत इतरांची खात्री पटविणें हाच होय. तथापि त्याबरोबरच एकदां निरीक्षणकार्यास सुरवात झाली म्हणजे तें हळूहळू अधिकाधिक व्यापक करतां येईल आणि अखेरीस त्या आधारावर खरीखुरी परिणामकारक निःशस्त्रीकरण-योजनाहि उभारतां येईल.

" एकमेकांशीं संपर्क वाढविण्याबाबतदेखील अनेक गोष्टी चर्चेस निघाल्या. सर्व प्रकारच्या 'पडद्यां'-तून पलीकडे विविध प्रकारच्या बातम्या अनिर्बंधपणें गेल्या पाहिजेत याबद्दल आम्ही चर्चा केली. पुस्तकांची देवाणघेवाण त्याचप्रमाणें मोकळेपणाचे व्यापारी संबंध याबद्दल देखील विचारविनिमय केला. तथापि, एका देशांतील नागरिकांना दुसऱ्या देशांत, तेथील जीवनासंबंधीं सर्व प्रकारची माहिती मिळवितां येईल, अशा प्रकारें प्रवास करतां येणें या मुद्द्यांवर आमचें लक्ष्य बरेंच केंद्रित झालें होतें. आणि या बाबतींत पुष्कळच ऐकमत्य झालें.

" स्थायी व न्याय्य स्वरूपाची शांतता प्रस्थापित करण्याच्या मार्गांतील अडचणींना मी कमी लेखूं इच्छीत नाहीं. त्याचप्रमाणें खरेखुरे परिणाम प्रत्ययास यावे यासाठीं जे दीर्घ आणि जिकीरीचें कार्य करावें लागेल त्याचें स्वरूपहि मला कमी लेखावयाचें नाहीं. आपल्या सुरक्षिततेसाठीं आणि जें आपणांस रक्षण करावेसें वाटतें त्याच्या संरक्षणासाठीं सतत त्याग करावयास आपण सिद्ध राहिलें पाहिजे इकडेहि मला डोळेझांक करावयाची नाहीं. तथापि, जगांत सर्वांना शांतता हवी आहे हेंहि मी जाणतो. जिनेव्हांत हजर असलेल्या प्रत्येक व्यक्तीला ही जाणीव होती. आणि म्हणूनच जुने नकारात्मक पाढे पुनः वाचीत बसण्याऐवजीं रचनात्मक प्रयत्न करण्याची निकड उत्पन्न झाली आहे."

**सर ॲंथनी एडन** यांनीं कॉमन्स सभेंत २७।७।५५ रोजीं जें भाषण केलें त्यांतून पुढील भाग उद्धृत केला आहे :

" आम्हाला आंतरराष्ट्रीय संबंधांचें वातावरण सुधारावयाचें होतें; पूर्व आणि पश्चिम यांच्या संबंधांतील ताण कमी करावयाचा होता. निरनिराळ्या प्रश्नाबाबतच्या सभांतून स्पष्टवक्तेपणें पण सलोख्यानें बोलून आम्ही हें साधण्याचा प्रयत्न केला.

" पाश्चात्य राष्ट्रांना जर्मनीला येन केन प्रकारेण नाटोंत सामील करून घ्यावयाचें आहे हें म्हणणें बरोबर नाहीं. या बाबतींत निर्णय घेण्याचा हक्क जर्मनीला देणें हेंच बरोबर होय असें अजूनहि आम्हांस वाटतें. तथापि इतरहि कांहीं बाबी ध्यानांत घेतल्या पाहिजेत हें आम्हास मान्य आहे. रशिया आणि सबंध युरोप यांच्या दृष्टीनें जर्मनीचें एकीकरण धोक्याचें ठरणार नाहीं अशी अपेक्षा बाळगण्याचा त्यांना हक्क आहे.

" आम्हीं सुचविलेला युरोपीय संरक्षणाचा करार हा प्रस्थापित सरहद्दींना मान्यता देत नाहीं; केवळ आक्रमणाचा प्रतिकार करणें एवढीच मर्यादित कल्पना त्यांत आहे. रशियाला कदाचित् अधिक सभासदांचा समावेश करून घेणारा व्यापक स्वरूपाचा करार हवा असावा. तसें असल्यास त्यासंबंधीं देखील विचार करण्याची आमची तयारी आहे. सुरवात साध्या मर्यादित स्वरूपाच्या करारानें होणें [illegible] असें मात्र आम्हांस अजूनहि वाटतें. युरोपच्या [illegible]ची



अनुक्रमणिका



हमी देण्याच्या हेतूनें प्रेरित होऊनच ही सूचना आम्ही केली आहे. त्याबरोबरच जर्मनीलगतच्या दोन्हीं बाजूंच्या देशांतील व त्या शेजारील देशांतील सैन्य व शस्त्रास्त्रबळ निश्चित करणारा करारहि आम्ही सुचविला आहे. अशा प्रकारच्या व्यवस्थेंत संयुक्तजर्मनी हाहि भागीदार व्हावा असें आमचें मत आहे.

" जर्मनीचें एकत्रीकरण आणि युरोपची सुरक्षितता हे प्रश्न सोडविण्याच्या मार्गांत अनेक अडचणी आहेत. तथापि तरी देखील त्यांतून बाहेर पडण्याचा मार्ग शोधीत राहिलें पाहिजे. अडचणींशीं पुरेसें झगडत गेल्यानें, जिनेव्हा – परिषदेनें आंतरराष्ट्रीय क्षेत्रांत निर्माण केलेलें वातावरण कायम राहिल्यास, कालांतरानें, मार्ग सांपडेल असा विश्वास वाटतो.

" आम्ही परिस्थितींतील ताण कमी केला आहे असें मला वाटतें. हेमंत ऋतूंत भरणाऱ्या परराष्ट्रमंत्र्यांच्या बैठकींत महत्त्वाचे प्रश्न हाताळले जावेत याकरितां अनुकूल परिस्थिति आम्ही निर्माण केली आहे. तावडतोब विशेष महत्वाचे निर्णय घेतले जातील असें नाहीं. परंतु मध्यंतरीं जिनेव्हापरिषदेनें एक साधा संदेश जगाला देऊन युद्धाचा धोका कमी केला आहे."

## अमेरिकेचा आशियासंबंधींचा दृष्टिकोण

**अतिपूर्वेकडील राष्ट्रांबाबतचे अमेरिकेचे ॲसिस्टंट सेक्रेटरी वॉल्टर एस्. राबर्ट्सन** यांच्या ८–८–५५ रोजीं केलेल्या भाषणांतून पुढील उतारा उद्धृत केला आहे :

" साम्यवादी आक्रमण व बंडखोरी याहून अधिक महत्त्वाचा कोणताहि प्रश्न अमेरिकेच्या दृष्टीनें आशियांत, विशेषतः आग्नेय आशियांत नाहीं. असें असलें तरी या विशाल प्रदेशांतील जनतेला आणि नेत्यांना साम्यवादाची भीति हा दुय्यम प्रतीचा प्रश्न वाटतो, त्यांचे हितसंबंध आणि भावना 'वसाहतवाद', 'राष्ट्रवाद' आणि तटस्थवृत्ति यावरच केंद्रित झालेल्या आहेत याची आम्हांस जाणीव आहे. हें असें कां असावें या प्रश्नाचें उत्तर शोधण्यासाठीं नुकत्याच स्वतंत्र झालेल्या या प्रदेशांतील बहुतेक राष्ट्रांच्या इतिहासाकडे पाहिलें पाहिजे. या नव्यानें स्वतंत्र झालेल्या राष्ट्रांचे आजचे नेते हे बव्हंशीं त्या त्या राष्ट्रांतील स्वातंत्र्य आंदोलनाचे पुढारी होते. त्यांनीं आणि त्यांच्या देशबांधवांनीं आपलें जीवन स्वातंत्र्यसंपादनार्थ समर्पित केलें आहे. राष्ट्राचें स्वातंत्र्य आणि प्रगति यांच्या मार्गांत 'वसाहतवादी राज्यें' ही एकच अडचण आहे अशी त्यांची दृढ समजूत झालेली आहे. वसाहतवादापासून मुक्त होण्याच्या मार्गांत असलेल्या इतर वा नव्या अडचणी वा धोके यासंबंधीं विचार करण्यास त्यांना वेळहि मिळाला नाहीं. आणि त्यांची तसें करण्याची तयारीहि नव्हती. यामुळें आपला जुना शत्रु-पाश्चात्त्य वसाहतवाद–हा आतां मेला आहे ही गोष्ट स्वीकारणें त्यांना कठिण वाटणें स्वाभाविक आहे.

" आशियाई राष्ट्रांचें आपल्या स्वातंत्र्ययुद्धांवरच लक्ष्य केंद्रित झाल्यामुळें या प्रदेशांतील प्रत्येक राष्ट्राला त्यावर पूर्वी राज्य करणाऱ्या पाश्चात्त्य राष्ट्राचाच परिचय झालेला आहे. इतर त्याच्या लगतच्या राष्ट्रांविषयीं देखील फारशी माहिती नाहीं. सर्व आशियाई लोकांचा कोठल्याहि वसाहतवादाला तत्त्वतः विरोध आहे. परंतु आपल्यालगतच्या राष्ट्रांच्या विकासाकडे त्यांतील फारच थोडे लक्ष घालतात आणि ज्यांच्याशीं अत्यंत निकटच्या सहकार्याचा व्यवहार असावा अशा राष्ट्रांच्या देखील गरजा वा महत्त्वाकांक्षा जाणून घेण्याचा प्रयत्न तर त्याहूनहि थोडे करतात. यामुळें खरीखुरी ऐक्याची भावना फारच मर्यादित प्रमाणांत आढळते. स्वतंत्र आशियाच्या सामुदायिक सुप्त सामर्थ्याचीहि विशेष जाणीव दिसत नाहीं. उलट, प्रत्येक राष्ट्राला आपण एकाकी पडलेले आहोंत असेंच वाटत असावेसें दिसतें.

" अनेक आशियाई लोकांचें लक्ष्य अजूनहि वसाहतवादावरच केंद्रित झालेलें दिसतें. आपल्या राष्ट्रावर युरोपीय परकीयांचा ताबा असणें असा वसाहतवादाचा अर्थ आहे. त्या दृष्टीनें पाहिल्यास पाश्चात्त्य वसाहतवादाला अनेक वर्षांपूर्वीच उतरती कळा लागली हें सत्य आहे. आशियांतील वाढता विरोध आणि साम्राज्यशाही राष्ट्रांतील बदलता दृष्टिकोण ही त्याचीं दोन मुख्य कारणें सांगतां येतील. एका राष्ट्रानें दुसऱ्यावर राज्य करून त्याचें शोषण करावें ही गोष्ट रास्त होय या कल्पनेवर पाश्चात्त्य राष्ट्रांत १९ व्या शतकांतच हल्ला होऊं लागला. आणि तेव्हांपासून ती हळुहळु निश्चितपणें मागें पडत गेली. १९३० च्या








सुमारास वसाहतींना स्वातंत्र्य द्यावें कीं नाहीं हा बहुतेक राष्ट्रांपुढें प्रश्नच राहिला नाहीं, केवळ स्वातंत्र्य केव्हां आणि कसें द्यावें हाच खरा प्रश्न बनला. दुसरें महायुद्ध हें पाश्चात्त्य राष्ट्रांच्या दृष्टीनें खरेंखुरें स्वातंत्र्यार्थ युद्ध होतें. आणि त्यामुळेंच पाश्चात्त्य वसाहतवादाचा त्यांत अंत झाला.

" आशियांतील या नव्या राष्ट्रांचें जागतिक संघटनांत अमेरिकेनें स्वागत केलें आहे. आणि त्यांना आपलें कल्याण साधतां यावें यासाठीं साहाय्य करण्याचे विविध कार्यक्रमहि हातीं घेतले आहेत. सामान्य अमेरिकन नागरिक आजवर जे करीत आले तेंच आतां आम्ही सरकार या नात्यानें करीत आहोंत. जागतिक सुरक्षिततेसाठीं मानवाचें स्वातंत्र्य आणि मानवाचा स्वाभिमान टिकून राहणें आवश्यक आहे. भौतिक कल्याण आणि सामाजिक प्रगति यांची विशिष्ट मर्यादा गांठल्यावांचून हें शक्य नाहीं. ही मर्यादा गाठतां यावी यासाठीं या देशांना साहाय्य मिळणें जरूर आहे. अशी आमची खात्री असल्यामुळें आम्ही हें साहाय्य करीत आलों आणि यापुढेंहि करीत राहूं. साम्यवादाच्या भीतीमुळें आम्ही हें करीत आहोंत हें म्हणणें बरोबर नाहीं. या प्रश्नाबाबतची आमची दृष्टि निश्चित आहे, अभावात्मक नाहीं. "

## चीनमधील अन्नधान्यपरिस्थिति

चीनमध्यें नोव्हेंबरपर्यंत सर्व म्युनिसिपालट्या असलेलीं गांवें, शहरें, औद्योगिक व खनिज उत्पादनकेंद्रें यांना लागू करण्यांत येणारी नवी शिधा-(रेशनिंग)-पद्धति ता. २५ ऑगस्ट १९५५ रोजीं जाहीर करण्यांत आली. या रेशनिंगमध्यें सुमारें दहा कोटी लोकांचा अंतर्भाव होणार आहे. चीनमधील या नव्या शिधापद्धतीबाबत नव चीन वकिलातीच्या न्यूज बुलेटिनमधून पुढील कांहीं भाग उद्धृत केला आहे.

"राज्याकरवीं होणाऱ्या अन्नधान्य खरेदी व पुरवठ्यांत एकमुखी व्यवस्था आणण्याच्या हेतूनें नवा कार्यक्रम आंखण्यांत आला आहे. या व्यवस्थेमुळें शेतकऱ्यांना अन्नधान्याची उत्पादनवाढ करण्यास उत्तेजन मिळेल आणि चीनच्या औद्योगिक विकासाला अनुकूल परिस्थिति निर्माण होईल अशी योजना करण्यांत आली आहे.

" वय, कामाचें स्वरूप आणि निरनिराळ्या प्रदेशांतील आहारपद्धती ध्यानांत घेऊन रेशन ठरविण्यांत आलें आहे. लोकांची नऊ निरनिराळ्या गटांत वर्गवारी करण्यांत आली असून प्रत्येक गटाचें किमान व कमाल रेशन ठरवून देण्यांत आलें आहे. जेथें गव्हाचा आटा हाच आहारांत प्रामुख्यानें आढळतो अशा ठिकाणीं हलकें मेहनतीचें काम करणाऱ्या कामगारांना दरमहा सरासरी ३५ कट्टी ( एक कट्टी म्हणजे अर्धा किलोग्रॅम म्हणजे सुमारें १$\frac{1}{10}$ पौंड ) इतका आटा देण्यांत येईल. सक्त श्रमाचें काम करणारांना ४४ कट्टी आणि विशेष श्रम करणारांना ५५ कट्टी आटा देण्यांत येईल. निरनिराळ्या कचेऱ्यांत काम करणारे लोक, शिक्षक, दुकानांतील कामगार यांना ३१ कट्टी, कॉलेजें व माध्यमिक शाळांमधील विद्यार्थ्यांना ३५ कट्टी आणि सामान्य नागरिकांना २६॥ कट्टी याप्रमाणें आटा देण्यांत यावयाचा आहे. दहा वर्षांच्या आंतील वयाच्या मुलांचे वयाप्रमाणें तीन गट करण्यांत आले आहेत. गव्हाच्या आट्याऐवजीं जेथें तांदूळ घेण्यांत येतो तेथें तांदुळाच्या रेशनचें प्रमाण आट्यापेक्षां थोडेसें कमी आहे. इतर अन्नधान्याचें रेशन मात्र आट्याइतकेंच आहे.

" ग्रामीण विभागांत घरांची तीन प्रकारची विभागणी करण्यांत यावयाची आहे. अतिरिक्त धान्य असलेलीं स्वयंपूर्ण आणि धान्याची गरज असलेलीं घरें असे हे तीन प्रकार होत. योग्य किंमत देऊन सुमारें ८० ते ९० टक्के अतिरिक्त धान्य सरकार विकत घेईल. उरलेलें धान्य शेतकऱ्याजवळ राहूं दिलें जाईल. स्वयंपूर्ण घरांकडून धान्य विकत घेतलें जाणार नाहीं. तथापि त्यांना धान्य विकतहि घेतां येणार नाहीं. ज्यांना धान्याची कमतरता आहे त्यांना खावटीसाठीं सरासरीस कमी पडणारें धान्य दिलें जाईल. अतिरिक्त धान्य असणाऱ्या शेतकऱ्यांच्या बाबतींत अतिरिक्त धान्याचें प्रमाण ठरविण्यासाठीं ' नॉर्मल ' वर्षांचें उत्पादन आधारभूत म्हणून समजलें जाईल. आणि हें उत्पादन एकदां ठरवलें म्हणजे विशेष कारणावांचून ते तीन वर्षें बदललें जाणार नाहीं. मात्र उरलेल्या दोन्ही गटांतील शेतकऱ्यांबाबत दरवर्षी नव्यानें निर्णय घेतला जाईल "

## चीनच्या औद्योगीकरणाचा मार्ग :

' इकॉनॉमिस्ट ' ( लंडन, २७-८-५५ ) वरून पुढील कांहीं भाग उद्धृत केला आहे.

"अनेक वर्षांच्या गुप्ततेनंतर चीनच्या राज्यकर्त्यांनीं आपल्या मागासलेल्या शेतकऱ्यांना आधुनिक औद्योगिक समाजरचनेकडे नेण्याचा मार्ग स्पष्ट केला आहे. खोटे प्रगतिविषयक दावे, आडवळणें किंवा पिछेहाट इत्यादीं गोष्टी लक्षांत घेऊनहि पाश्चात्त्यांनीं दोन महत्त्वाच्या पण अजून अनिश्चित असलेल्या मुद्द्यांवर लक्ष्य केंद्रित केलें पाहिजे. त्यावरच चीनच्या धाडसी प्रयोगाचें यशापयश अवलंबून आहे. हे मुद्दे म्हणजे परकीय सहाय्य आणि चीनचा अंतर्गत प्रयत्न हे होत.

"पुढें कित्येक वर्षेपर्यंत सामान्य जनतेची क्रयशक्ति भोगवस्त्याच्या वस्तूंच्या पुरवठ्याच्या मानानें अधिक प्रमाणांत वाढत जाईल ही गोष्ट आतां अधिकृत रीत्या मान्य करण्यांत येत आहे. यामुळें रशियाइतक्या झपाट्यानें प्रगति करावयाची झाल्यास त्यासाठीं स्टालीनप्रमाणें सामुदायिक शेतीचा प्रयोग जुलमानें केल्यावांचून, आवश्यक तें जास्त धान्य ग्रामीण जनतेकडून चीनच्या राज्यकर्त्यांना मिळवतां येईल कीं काय हा खरा प्रश्न आहे. तथापि चीनच्या अगदीं भिन्न स्वरूपाच्या परिस्थितींत स्टालीनतंत्राचें कितपत तंतोतंत अनुकरण करतां येईल हा एक प्रश्नच आहे. या प्रश्नाच्या उत्तरावरच औद्योगीकरणाच्या योजनेचें, नवचीनच्या राजवटीचें व पर्यायानें अति-पूर्वेकडील राजकारणाचें भवितव्य अवलंबून राहील."

**शांततेसाठीं अणुशक्ति :**

'ऑब्झर्व्हर' (२१।८।५५) वरून पुढील भाग उद्धृत केला आहे :

"अणुशक्तीसंबंधींचें संशोधन गेलीं सुमारें दहा वर्षें अत्यंत गुप्ततेनें चाललेलें होतें. ही गुप्तता कोणाच्याहि विशेष उपयोगी पडलेली नाहीं हा बोध काल रोजीं जिनेव्हा येथें संपलेल्या अणुशक्तीबाबतच्या परिषदेवरून घेतां येण्यासारखा आहे. ब्रिटन, अमेरिका आणि रशिया या देशांतील संशोधन एकाच दिशेनें परंतु स्वतंत्रपणें पुढें जाऊन ज्ञानाची एकच पातळी तिघांनीहि गांठली आहे. मात्र गुप्तपणामुळें शास्त्रज्ञांच्या ठिकाणीं वैफल्याची भावना निर्माण झाली; आणि तेच तेच प्रयत्न दोनदोनदां करावे लागले.

"या सतत वाढत असलेल्या क्षेत्रांतील निरनिराळ्या विभागांत राष्ट्रीय पातळीवरील गुप्तता पुनः येण्याचा संभव सकृद्दर्शनीं दिसत नाहीं. अर्थात संरक्षणाचा प्रश्न ध्यानांत घेण्याची आवश्यकता अजूनहि कायम आहे : तथापि अणुशक्ति उद्योगधंद्यांच्या क्षेत्रांत शिरली म्हणजे व्यापारी गुप्तता मात्र सगळीकडे पसरणें सहज शक्य आहे. आंतरराष्ट्रीय अणुशक्तिसंघटनेनेंच अशा प्रकारच्या गुप्ततेला आळा घालणें हें एक महत्त्वाचें कार्य राहील. परिषदेच्या यशस्वीपणामुळें अशी संघटना निर्माण करण्याची शक्यता कितीतरी बळावली आहे."

---

प्रा. य. र. आगाशे

# मुकुंदराजविषयक संशोधन : समालोचन

मुकुंदराजांच्या 'विवेकसिंधु' ग्रंथाची फार हेळसांड झाली आहे. आतांपर्यंतच्या त्याच्या तीन छापील प्रती पाठशुद्धीच्या दृष्टीनें समाधानकारक नव्हत्या व त्या दुर्मिळ झाल्या आहेत. **श्री. गो. रा. गोगटे** यांनीं आपल्या ग्रंथांत[1] पाठशुद्ध प्रत तयार करण्यासाठीं फार परिश्रम केले आहेत व शक्य ती सर्व साधनसामग्री जमविली आहे. धुळें येथें श्री. नानासाहेब देव यांनीं रामदासी मठांतून संग्रहीत केलेल्या १८ हस्तलिखित प्रती, त्याचप्रमाणें राजवाडे-संशोधन-मंदिरांतील १० प्रती अशा एकूण २८ पोथ्या, कांहीं बाडें, श्री. पाठकशास्त्री यांनीं संपादिलेला मुकुंदमुनिकृत महाभाष्य ग्रंथ इत्यादि सामग्री श्री. गोगटे यांनी सिद्ध करून, 'विवेकसिंधू'चें संशोधन पुरःसर संपादन केलें आहे. पाठचिकित्साशास्त्रा-(Science of Textual Criticism)च्या पद्धतीनें, धुळें वा. दे. मंदिर बाडांक ४९३ च्या 'विवेकसिंधू'च्या प्रतीस अग्रपूजेचा मान दिला आहे. ग्रंथांतील प्रकरणें, ओव्यांचा कमीजास्तपणा व त्यांतील अनेक पाठपाठांतरें यांचा योग्य परामर्श

---

१ 'मुकुंदराजकृत विवेकसिंधु'– (राजवाडे संशोधन-ग्रंथमाला, ग्रंथ २२ वा.) संपादक– गो. रा. गोगटे बी. ए. एलूएल्. बी. वकील भुसावळ. पुरस्कार-लेखक– नामदार डॉ. मा. श्री. अणे, माजी गव्हर्नर बिहार पाटणा. प्रकाशक– भा. वा. भट, चिटणीस राजवाडे सं. मंडळ धुळें. मूल्य ५ रुपये.








घेतला आहे. एतद्विषयक परिश्रमाचें दिग्दर्शन त्यांनीं आपल्या ३८ पानांच्या प्रस्तावनेंतील पहिल्या भागांत केलें आहे. दुसऱ्या भागांत मुकुंदराजांची थोडी माहिती देऊन त्यांच्या स्थलकालाविषयीं विद्वानांचे मतभेद दाखविले आहेत. याविषयीं श्री. गोगटे यांनीं निष्कर्ष काढला आहे तो असा : ( १ ) मुकुंदराज हे ज्ञानेश्वरांचे पूर्वी कांहीं वर्षें व नंतरहि कांहीं वर्षें हयात असावे. ( २ ) या उभयतांच्या आयुष्यांत असा एक कालखंड संभवतो कीं ज्यावेळीं हे दोघेहि स्वतंत्रपणें काव्यरचना करीत होते. ( ३ ) मुकुंदराजांच्या वाचनांत ज्ञानेश्वरांची सर्व कविता आली होती. ‘ शके अकराशें दाहोत्तरू । साधारण संवत्सरू । राजा शार्ङ्गधरू राज्य करी ॥ ’ ही ओवी श्री. गोगटे यांना कोणत्याहि पोथींत आढळली नाहीं. म्हणून तिला ते महत्त्व देत नाहींत. शके १११० मध्यें साधारण संवत्सरहि येत नाहीं. यामुळें श्री. गोगटे मुकुंदराज व ज्ञानेश्वर यांस समकालीन मानतात. याविषयीं आपलें स्वतंत्र मत पुरस्कारलेखक श्री. मा. श्री. अणे यांनीं सविस्तर व सप्रमाण मांडलें आहे.

आपल्या प्रस्तावनेच्या तिसऱ्या भागांत श्री. गोगटे यांनीं, ‘ विवेकसिंधु ’ व रामदासकृत ‘ दासबोध ’ यांतील साम्यस्थळें दाखविलीं आहेत. कांहींच्या मतें ‘ विवेकसिंधू ’ची भाषा ज्ञानेश्वरींतील भाषेइतकी जुनी नाहीं. परंतु या मताची अवास्तवता, दोनहि ग्रंथांतील निवडक शब्दांचें आणि वाक्प्रयोगाचें साम्य व प्राचीनत्व दाखवून श्री. गोगटे यांनी योग्य प्रकारें दिली आहे. अडतीस पानांच्या मर्यादित प्रस्तावनेचा एक विभाग या दृष्टीनें हें ठीक आहे. परंतु ज्ञानेश्वरीचा ज्याप्रमाणें भाषाशास्त्राच्या दृष्टीनें सखोल व सविस्तर असा अभ्यास आतांपर्यंत झाला व आजहि चालू आहे, तसाच ‘ विवेकसिंधू ’च्या भाषेचा स्वतंत्र अभ्यास संशोधनपूर्वक झाला पाहिजे. श्री. गोगटे यांनीं प्रत्येक प्रकरणाचा विषय आरंभीं विशद केला आहे, अर्थावबोधाकरितां तळटीपा दिल्या आहेत. प्रकरणांतील वेदान्तविषयाच्या स्पष्टीकरणार्थ अत्यंत उपयुक्त अशीं अनेक कोष्टकें दिलीं आहेत. तळटीपांमध्यें पाठभेद दाखविले आहेत. सारांश, अभ्यासकाला ‘ विवेकसिंधू ’चें औपनिषदीय तत्त्वज्ञान होईल तितकें सुगम करण्याकरितां लागणारे सर्व परिश्रम श्री. गोगटे यांनीं केले आहेत. थोडीशी उपेक्षा झालेल्या या ग्रंथाच्या बाबतींत त्यांनीं केलेलें हें कार्य प्रशंसनीय आहे.

आतां स्वातंत्र्याच्या आणि देशभाषांना प्राप्त होणाऱ्या या वैभवाच्या काळांत असें वाटतें कीं प्राचीन मराठी भाषेचा मुकुटमणि असा हा ग्रंथ ज्ञानेश्वरीप्रमाणेंच अधिक कौतुकानें आणि ऐश्वर्यानें मुद्रित व्हावा. साहित्य अकॅडेमीसारख्या केंद्रीय सरकारनें काढलेल्या संस्थांचें साहाय्य त्याला मिळावें म्हणजे, या ग्रंथराजाची संशोधनपूर्वक भाषाशास्त्रीय चिकित्सा, सविस्तर पाठपाठांतरचिकित्सा, त्याचा ऐतिहासिक व तुलनात्मक व्युत्पत्तिकोश, मुकुंदराजाचें चरित्र, स्थलकालं-याविषयीं आतांपर्यंत अनेक संशोधकांनीं जीं विविध मतें मांडलीं आहेत, त्यांची चिकित्सा आणि कांहीं निश्चित स्वरूपाचा निर्णय इत्यादि अनेक गोष्टी करतां येतील.

डॉ. मा. श्री. अणे यांनीं प्रस्तुत ग्रंथाला जो पुरस्कार लिहिला आहे, त्याचा थोडक्यांत परामर्श घेणें आवश्यक आहे.

‘ शके अकराशें दाहोत्तरू । साधारण संवत्सरू ।
राजा शार्ङ्गधरू । राज्य करी ॥
ऐसा समयो सर्वोत्तमु । तेथें मुकुंद द्विजोत्तमु ।
विवेकसिंधु मनोरमु । निर्मिता झाला ॥ ’

श्री. गोगटे यांच्या अभ्यासांत ज्या १८/२० पोथ्या आल्या त्यांतील एकाहि पोथींत वरील ओव्या आढळल्या नाहींत. पुनः या ओव्यांतील १११० या वर्षी साधारणसंवत्सर येत नाहीं. तेव्हां या ओव्या क्षेपक आहेत, असें ते मानतात व मुकुंदराज हे ज्ञानेश्वरापूर्वी १०० वर्षें होऊन गेले असें न म्हणतां ते ज्ञानेश्वरसमकालीन होते असें आपलें स्वतंत्र मत नमूद करतात. याबाबतींत श्री. अणे यांनीं ‘ अंभोरक्षेत्र-माहात्म्य ’ या ग्रंथाचे कर्ते श्री. विठ्ठल रावजी ढोक यांनीं दिलेली माहिती व त्यांचें मत आपल्या पुरस्कारांत मांडलें आहे तें लक्षणीय वाटतें. वर उद्धृत केलेल्या ओव्या “ या प्रांतांतील ( मध्यप्रदेश व वऱ्हाड ) व पर प्रांतांतील हस्तलिखित पोथ्यांत ‘ विवेकसिंधु ’रचनेच्या कालासंबंधानें आढळतात ” असें त्यांनीं म्हटलें आहे. त्याचप्रमाणें संवत्सर विसंवादाचेंहि ते निराकरण करून दाखवितात. श्री. ढोक यांचें म्हणणें असें कीं पोथींतील शक शालिवाहन दिला तरी संवत्सराचा निर्देश विक्रमगणनेनुसार त्यांनीं केला असला पाहिजे [illegible]



अनुक्रमणिका





१२४४. त्याला ६० नें भागून शेष ४४. प्रभवादि यादींत ४४ वें संवत्सराचें नांव ' साधारण ' असें येतें. ' भक्तरहस्य ' नांवाच्या सांप्रदायिक ग्रंथांत हरिनाथमहाराज ( मुकुंदराजांचे आजेगुरू ) व स्वतः मुकुंदराज हे गुरुकृपा होईपर्यंत काशीस राहात होते व त्यांच्या आयुष्याचा बराच काळ काशी-क्षेत्रांत गेला असें दिसतें. त्यांनी उपर्युक्त ओंवींत संवत्सराचा नामनिर्देश उत्तर हिंदुस्थानांतील पद्धती-प्रमाणें सहजीं विक्रम संवत्-गणनेनुसार केला असावा. अशा प्रकारें ओवींतील १११० हा शक व साधारण संवत्सर यांत दिसून येणाऱ्या विसंवादाचें निराकरण होतें. आपल्या पुरस्कारांत उद्धृत केलेलें श्री. बोवडे व श्री. ढोक यांचें मत श्री. अणे यांस समाधानकारक वाटतें. यावरून मुकुंदराजांचा काल १०० वर्षें पुढें ढकलण्याचें कारण नाहीं. ' विवेकसिंधु ' या ग्रंथांतील भाषेचें स्वरूपहि चिकित्सापूर्वक पाहिल्यास तें वरील कालनिर्णयाला उपोद्बलक असेंच दिसून येईल. कल्पना-साम्याचा विचार करतां ' विवेकसिंधू 'मध्यें सूत्ररूपानें वा संक्षेपानें आलेल्या कल्पनांचा सुंदर व सरस विस्तार ज्ञानेश्वरींत झाला आहे असें आढळून येईल.

यानंतर दुसरा महत्त्वाचा प्रश्न मुकुंदराजांच्या निवासभूमीचा. त्यांचे गुरु हरिनाथ, रघुनाथ व शिष्य जैतपाल यांचें कार्यक्षेत्र कोठें होतें हा होय. ' विवेक-सिंधू 'च्या १८ व्या प्रकरणांत याविषयीं बरीच माहिती उपलब्ध होते. त्यांपैकीं स्थलनिर्देशक अशी महत्त्वाची ओंवीः

' वैनगंगेच्या तीरीं । अंबा मनोहर नगरी ।
तेथें प्रकटले श्रीहरि । जगदीश्वर ॥ ३८ ॥ '

याविषयीं इतिहासाचार्य राजवाडे यांचें मत स्पष्ट आहे व तें भारत-इतिहास-संशोधक-मंडळाच्या वार्षिक इतिवृत्तांत ( शके १८३५ ) प्रसिद्ध झालें आहे. " ही अंबानगरी म्हणजे भंडाऱ्याजवळील वैन-गंगेच्या तीरचें ' अंभोरें ' हें तीर्थ आहे, तेथें हरिनाथां-ची समाधि आहे ... रामनाथाची समाधि बैतुलजवळ ' खेडलें ' या गांवीं आहे. अर्थात् मुकुंदराज व ( जैत-पाल ) हा बैतुल, छिंदवाडा, अंभोरें या वैनगंगेच्या भोंवतालच्या प्रांतांतील आहे. मुकुंदराजांच्या समाधीचा संबंध जोगाईच्या अंब्याशीं बिलकूल नाहीं... अंबें म्हणजे अंभोरें—भंडाऱ्याजवळील नागपूर प्रांतांतील समजावयाचें. या प्रांतांत मुकुंदराजांची शिष्यपरंपरा अद्यापहि आहे. " श्री. अणे यांच्या पुरस्कारामध्यें या मताचें दृढीकरण झालेलें दिसून येईल. कांहीं मतभेद असले तरी तेंच मत पुढें श्री. डोळके यांच्या लेखांत तावूनसुलाखून निघत आहे.

' महाराष्ट्र-साहित्यपत्रिका ' अंक ९६, ऑक्टो-डिसेंबर १९५० यामध्यें डॉ. तुळपुळे यांनीं, मुकुंदराज हे मराठवाड्यांतील आंबेजोगाईचे असावे, नागपूर प्रांतांतील अंभोऱ्याचे नव्हत असें आपलें मत मांडलें आहे. त्याला आधार म्हणून ' योगेश्वरीमाहात्म्य ' या हस्तलिखित संस्कृत ग्रंथांतून कांहीं उतारे दिले आहेत. हा ग्रंथ त्यांस आंबेजोगाईस मिळाला. त्यांत जैतपाळराजाची प्रचलित असलेली कथा, त्याला मुकुंदराजांचा उपदेश, ' विवेकसिंधु ' व ' परमामृत ' या ग्रंथांचें निरूपण इत्यादि माहिती आहे. ... या जयंतिका नगरींत ( आंबे ), जैतपाळानें मुकुंदतीर्थावर एक मोठा यज्ञ केला. त्या ठिकाणचें नांव अश्वदरी. मुकुंदराजांचा निवास समाधिरूपानें याच ठिकाणीं आहे. जैतपाळ हा कलचुरी घराण्याचा मांडलिक. त्याची राजधानी आंबें. तेव्हां मुकुंदराजांचे गुरु श्रीहरि जेथें प्रकटले ती मनोहर अंबानगरी म्हणजे जोगाई-चें आंबें असें डॉ. तुळपुळें यांनीं मांडलें आहे.

यांत मोठी अडचण म्ह० " वैनगंगेच्या तीरीं । अंबा मनोहर नगरी "। ही ओवी होय. ' विवेकसिंधू 'च्या कांहीं पोथ्यांत वैनगंगेच्या ऐवजी ' बाणगंगा ' असा पाठ आढळतो. बाणगंगा आंबेजोगाईसच आहे, अंभोऱ्यास नाहीं—असा मार्ग त्यांतून डॉ. तुळपुळे दाखवितात. परंतु त्यांचा या मताविषयीं फारसा आग्रह नाहीं. ' योगेश्वरीमाहात्म्या 'चा कर्ता अज्ञात, रचनाकाल अनिश्चित आहे. ग्रंथाचा थाट एकंदर पौराणिक स्वरूपाचा आहे. ऐतिहासिक स्वरूपाचा नाहीं. बाण-गंगा हा पाठहि स्वीकार्य ठरेल असें दिसत नाहीं.

श्री. गोगटे यांनीं प्रस्तुत मताचा फक्त निर्देश केला आहे. श्री. अणे यांनीं पुरस्कारामध्यें याविषयीं सविस्तर विचार केला आहे. ' विवेकसिंधू 'च्या सातव्या प्रकरणांत पुढील ओवी आहे.

' नृसिंहाचा बल्लाळु । त्याचा पुत्र जैतपाळु ।
तेणें करविला रोळु । हा ग्रंथरचनेचा ॥ ' १५५.

ज्याचा ' शिष्यांचा राणा ' म्हणून मुकुंदराजांनीं निर्देश









केला आहे असा जैतपाळ हा केव्हां, कोठें होऊन गेला याविषयीं अधिक माहिती श्री. अणे यांनीं उद्धृत केली आहे. 'अंभोरेक्षेत्रमहिमा' या ग्रंथांत जैतपाळ व मुकुंदराज यांच्या चरित्रावर प्रकाश पाडणारी माहिती, मेघचंद्रकृत 'यक्षदेव - आम्नाय, 'अन्वयसार' आणि 'यक्षदेव-वृद्धान्वय' या ग्रंथांतून तीन महत्त्वाचीं अवतरणें देऊन दिली आहेत. त्यांत 'वैनगंगेतीरीं अंबावतीपुरी।' असे शब्द आहेत.

श्री. अणे यांनीं काढलेला निष्कर्ष असा : (१) जयत्पाळाचें राज्य राजोरा रोहणे झाडीमंडळ या प्रदेशांत होतें. (२) जैतपाळ हा निपुत्रिक असून राज्यत्याग करण्यापूर्वी त्यानें आपला बंधु महादेव याचा मुलगा सारंगधर यास पळवी घेऊन ( दत्तक घेऊन ) त्याच्या स्वाधीन राज्यसूत्रें केलीं. या माहितीमुळें, 'शके अकराशें दाहोत्तर। साधारणनामसंवत्सर। राजा शार्ङ्गधर। राज्य करी॥" या ओंवींत राजा शार्ङ्गधर राज्य कां करीत होता याचा उत्तम अन्वय लागतो.

पुरस्कार (पा. २७) यामध्यें श्री. अणे यांनीं जयत्पालाच्या राज्याचा प्रदेश व विस्तार याची सुस्पष्ट माहिती दिली आहे. "नागपूरपासून तों गोंदिया डोंगरगड स्टेशनपर्यंतच्या मुलुखास झाडी असें नांव आहे. जयत्पालाचें राज्य पूर्वेस वैनगंगेच्या खोऱ्यांत गोंदिया वगैरे भागापर्यंत पसरलें होतें. अंभोरा हें गांव भंडारा जिल्ह्यांत म्हणजे झाडी या प्रदेशांत आहे."

यादववंशांतील जैत्रपाल व जैतुजी या दोनहि पुरुषांचा, ते मुकुंदराजाचे समकालीन होते हें खरें असलें तरी, मुकुंदराजाशीं कांहीं संबंध होता असें म्हणतां येत नाहीं. यादवांच्या साम्राज्यांतील एखादा मांडलिक म्हणून नृसिंह, वल्लाळ व जयत्पाळ यांचा राजवंश वऱ्हाडांत व नागपूर भागांत इ. स. ११८८ चे सुमारास राज्य करीत होता असा पुरावा एखादा ताम्रपट-शिलालेख या स्वरूपाचा उपलब्ध होईल तर बरें असा अभिप्राय श्री. अणे यांनीं व्यक्त केला आहे. हें सर्व प्रतिपादन पूर्वी राजवाडे यांनीं दिलेल्या माहितीशीं सुसंगत असेंच आहे. तेव्हां मुकुंदराज व जयत्पाल यांच्या निवासभूमीचें संशोधन आंबेजोगाई येथें स्थिर न होतां पुनः वऱ्हाड, नागपूर, अंभोरा या दिशेनें वाटचाल करीत आहे असें दिसून येईल.

महा० सा० पत्रिकेंत ( सन १९५३ अंक १०५, १०६, १०८ या अंकांत ) प्रा. सुरेश डोळके यांनीं जी महत्त्वाची माहिती दिली आहे तिचेंहि दिग्दर्शन करणें आवश्यक होय. श्री. गोगटे यांचा ग्रंथ १९५२ मध्यें प्रसिद्ध झाल्यानंतरची ती आहे.

'वैण्यगंगेच्या तीरीं। मणोहर अंबाणगरी। तेथ प्रगटले श्रीहरी। जगदीश्वरू॥' ('विवेकसिंधु' उत्तरार्ध, अ. ११-३७ ) ही ओवी 'विवेकसिंधू'च्या सर्व प्रतींत आढळते. श्री. डोळके यांना विवेकसिंधूच्या कोणत्याहि हस्तलिखित प्रतींत बाणगंगा असा पाठ आढळला नाहीं. वर्धा, हमदापूर, बैतूल, बैतूलबाजार, मोहप्पा, धापेवाडा, मुलावापी, उमरेड, पवनी वगैरे ठिकाणीं त्या मिळालेल्या आहेत. या ओंवींत निर्दिष्ट झालेल्या प्रदेशाचें अत्यंत सूक्ष्म वर्णन त्यांनीं दिलें आहे. सर्व गोष्टींची प्रत्यक्ष पाहणी केली असल्यामुळें त्यांचें प्रतिपादन प्रत्ययकारी वाटतें. वैनगंगेच्या कांठीं अंभोरें व त्याच्याजवळच वैनगंगेच्या प्रशांत प्रवाहांत चैतन्येश्वराचा पहाड उभा आहे. तो वैनगंगा आणि अंब या दोन नद्यांच्या संगमावर आहे. गेल्या पाऊणशें वर्षांपर्यंत अंभोरा येथेंच वसलेलें होतें. श्री. डोळके म्हणतात : "निसर्गानें त्या गांवाला जें सौंदर्य बहाल केलें आहे तें तेथें जाऊन पाहिल्यावरच कळून येईल व 'मनोहर' शब्दाचें स्वारस्य लक्ष्यांत येईल." या चैतन्येश्वराच्या पहाडावरच श्री. आदिनाथ चैतन्येश्वराची 'स्वयंज्योति' आहे. पहाडाच्या खालच्या मजल्यावर मुकुंदराजाचे आजेगुरू श्रीहरिनाथ महाराज यांची समाधि आहे. त्यांनीं बारा 'वरुषें' पाशुपतव्रत करून शंकराला प्रसन्न करून घेतल्याची कथा 'विवेकसिंधू'त आली आहे. (अ. ११-४५-५०). चैतन्येश्वराच्या मंदिराच्या पश्चिमेस दुसरा एक लिंगाकृति उंच पहाड आहे. त्यावर पहाडी किल्ला आहे. पहाडाच्या शिखरावर एक मंदिर असून त्यांत अश्वाधिष्ठित कोलासुराच्या लोखंडी मूर्तीची प्रतिष्ठापना करण्यांत आली आहे. पहाडाच्या पायथ्याशीं अनेक प्राचीन अवशेष आहेत. अश्वदरी म्हणून ओळखली जाणारी गुहा, पद्मकुंडासारख्या कधींहि न आटणाऱ्या विहिरी, घरांचे पायथे, देवतांच्या मूर्ति, इतस्ततः विखुरलेले किल्ल्याचे अवशेष — या सर्वांवरून तेथें मनोहर अंबानगरी असावी याबद्दल संशय रहात नाहीं.

'विवेकसिंधू'च्या अठराव्या अध्यायांत श्रीहरिनाथांच्या यज्ञसमाप्तीचें सुंदर वर्णन आहे. त्यांच्यावर आदिनाथांनीं प्रकट होऊन कृपा केली. हरिनाथांनीं शिवलिंगाची यज्ञस्थलीं स्थापना केली व त्याला चैतन्येश्वर नांव दिलें. चैतन्येश्वर हें नांव कसें साभिप्राय आहे, हें वरील ओंव्यांतील चैतन्य शब्दावरून लक्ष्यांत येईल. श्री. डोळके यांचा याविषयीं निष्कर्ष असा : ' विवेकसिंधूंत वर्णन केलेलें स्वयंज्योतीचें वर्णन चैतन्येश्वराच्या शिवलिंगालाच उद्देशून असल्यामुळें, मुकुंदराजांनीं वर्णन केलेली वैण्यगंगेच्या तीरावरील ' मणोहर अंबानगरी ' म्हणजे वैनगंगेच्या कांठावर असलेलें नागपूर प्रांतांतील अंभोरेंच होय. "

' आदि श्री आदिनाथु। तेथुनि श्री हरिनाथु। तेयाचा सिस्य रघुनाथु। जो गुणसिंधु॥ ३४॥ '

हरिनाथांची समाधि चैतन्येश्वराच्या पहाडाच्या खालच्या मजल्यावर आहे.-ती आंबे जोगाईला नाहीं. श्रीहरिनाथ व मुकुंदराज यांच्या परंपरेंतील अनेक मठ नागपूर-प्रांतांत विखुरले आहेत.

महा० सा० पत्रिका अंक १०६, मध्यें प्रा. डोळके यांनीं श्रीहरिनाथांच्या समाधीविषयीं व त्यांच्या जीवनांतील अनेक घटनांविषयीं अशीच सूक्ष्म चिकित्सा करून त्या वेण्यगंगातीरावर ' मणोहर अंबानगरीलाच ' घडल्या असें दाखविलें आहे. श्रीहरिनाथांची कृपा रघुनाथावर झाली. बाह्य पुराव्यावरून ते अंभोऱ्यापासून सुमारें ५० मैलांवर शशिग्राम – चंद्रनगर आजचें चांदा येथें राहात असावे असें श्री. डोळके म्हणतात.

म. सा. पत्रिका अंक १०८ मध्यें प्रा. डोळके यांनीं जैतपाळ, राजा शार्ङ्गधर आणि मुकुंदराज यांच्या स्थल-कालाविषयीं चर्चा केली आहे. " मुकुंदराजांची समाधि बैतूलजवळील खेडला येथील किल्ल्यांत आहे–खेडला येथील गोंड रजपूत वशांतला नरसिंगराय हा पहिला राजा. जैतपाळ हा रजपूत राजवंशातला शेवटला राजा. किल्ल्यांत जैतपाल व त्याची राणी यांच्या समाधि आहेत. व त्याला जैतपाळचा किल्ला असें म्हणतात. तो राष्ट्रकूट राजांचा शेवटला वंशज असावा असें वाटतें. " श्री. अणे यांच्या मतें जयत्पाळाचें राज्य राजोरारोईणें झाडीमंडळ या प्रदेशांत होतें हें पूर्वी सांगितलेंच आहे.

यानंतर मुकुंदराजांच्या समाधीचा प्रश्न. ती आंबेजोगाईला आहे असा एक पक्ष. परंतु आंबेजोगाईची समाधि दोंदीडशें वर्षांहून जुनी नसावी, असें प्रा. भुसारी यांचें मत आहे. मुकुंदराजांनीं 'विवेकसिंधु' ग्रंथ आधींच लिहिला होता. जैतपाळास ब्रह्मसाक्षात्काराचा उमाळा आला व त्यानें साधुसंतांची तुरुंगांत खानगी केली हें ऐकून मुकुंदराज अंभोऱ्याहून खेडल्याला जावयास निघाले. जयत्पाळांनीं ब्रह्मसमाधि लावली. खेडला – किल्ल्याच्या वरच्या मजल्यावर जयत्पाळ व घोडा या दोघांचीहि समाधि आहे. टेकडीच्या पायथ्याशीं किल्ल्याच्या खालच्या मजल्यावर तटबंदीच्या आंत मुकुंदराजांची समाधि असून तेथें अंभोरा येथील हरिनाथांच्या समाधीप्रमाणें शिवरात्रीला मोठी यात्रा भरत असते ... जैतपाळाचा उद्धार केल्यावर ' श्वासोच्छ्वासाचा श्रम ' लागण्याइतकें म्हातारे झालेले मुकुंदराज यांनीं तेथेंच समाधि घेतली. श्री. डोळके शेवटीं म्हणतात : " जैतपाळाची समाधि, तलाव, जात्यांच्या पाऊ इत्यादि सर्व खुणा खेडल्याच्या किल्ल्यांत असल्यामुळें मुकुंदराजांनीं खेडल्यालाच समाधि घेतली असें माझें मत आहे. "

मुकुंदराजांचा काल शके १११०, त्यांचें राहण्याचें स्थल आणि समाधि, त्यांची गुरुशिष्यपरंपरा व त्यांतील हरिनाथ, रघुनाथ आणि जैतपाळ व राजा शार्ङ्गधर इत्यादि व्यक्ती यांविषयीं कै० राजवाडे, श्री. गोगटे, श्री. ढोक, श्री. अणे, डॉ. तुळपुळे व श्री. डोळके यांनीं केलेल्या संशोधनाचा सारांश भिन्न भिन्न ठिकाणच्या विचारांचें संकलन करून येथें जिज्ञासूंकरतां एकत्र द्यावयाचा प्रयत्न केला आहे. त्यावरून मुकुंदराजविषयक स्थलकालविषयक संशोधनाची कोठवर प्रगति झाली आहे हें लक्ष्यांत येईल. रघुनाथपंडिताविषयींचें संशोधन बरेंच अस्थिर असतांना ग्वालेरचे क्युरेटर श्री. कत्रे यांनीं जशी त्यांत महत्त्वाची भर टाकली, तशीच प्रगति श्री. अणे व श्री. डोळके यांनी केलेल्या सूक्ष्म चिकित्सेमुळें झाली आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. अर्थात् त्यामुळें हा जटिल प्रश्न सर्वस्वीं सुटला असें नव्हे.








## ' नवभारत ' निधि

# -- विनंति --

' नवभारत ' मासिकाप्रीत्यर्थ येत्या डिसेंबर १९५५ अखेरपर्यंत किमान पन्नास हजार रुपयांचा निधि गोळा करण्याचा संकल्प व त्याकरितां एक विनंतिपत्रक 'नवभारता'च्या गेल्या जानेवारी व फेब्रुवारी १९५५ च्या अंकांतून प्रसिद्ध झालेंच आहे. त्या विनंतिपत्रकाखालीं सुमारें ७५ वर सह्या असून, सह्या करणारांमध्यें डॉ. धों. के. कर्वे, डॉ. मु. रा. जयकर, श्री. मा. श्री. अणे, श्री. बा. गं. खेर, श्री. ना. म. जोशी, श्री. स. का. पाटील, प्रा. ध. रा. गाडगीळ, श्री. केशवराव जेधे, श्री. भाऊसाहेब हिरे, न्या. मू. वा. रा. पुराणिक, श्री. दिगंबरराव बिन्दु, श्री. माधवराव बागल, श्री. दा. वि. गोखले, श्री. ग. त्र्यं. माडखोलकर, आचार्य प्र. के. अत्रे, प्रा. शं. वा. दांडेकर, श्री. वि. स. खांडेकर, संत तुकडोजीमहाराज, श्री. ना. ग. गोरे इत्यादि महाराष्ट्रांतील निरनिराळ्या भागांतील निरनिराळ्या क्षेत्रांत कार्य करणारे थोर लोक आहेत.

' नवभारत ' निधीस सर्वांनीं आपल्या शक्त्यनुरूप सढळपणें साहाय्य करावें, शक्य तों प्रत्येकीं निदान शंभर रुपये देऊन या निधीस साहाय्य द्यावें अशी विनंति वर उल्लेखिलेल्या विनंतिपत्रकांत केली आहे. १०० रु. देणगी देणारांस ' नवभारत' मासिक दहा वर्षे मिळत जाईल. या विनंतिपत्रकाला मान देऊन सर्वांनीं ' नवभारत ' निधीस साहाय्य करावें अशी आमची सर्वांना प्रार्थना आहे.

' नवभारत ' निधीला देणगी देणाऱ्यांचीं नांवें दर अंकांतून कृतज्ञतापूर्वक दिलीं जातील.

' नवभारता'च्या गेल्या म्हणजे सप्टेंबर १९५५ च्या अंकांत त्या वेळपर्यंत मिळालेल्या देणग्यांची पोहोंच व देणगीदारांचीं नांवें दिलींच आहेत. त्यानंतर आतांपर्यंत ज्यांनीं देणग्या पाठविल्या त्यांचे आम्ही आभारी आहोंत. त्यांचीं नांवें व रकमा खालीं दिल्या आहेत :

| | रु. |
|---|---|
| श्री. गुलाब कर्णिक ( मुंबई ) | १०० |
| श्री. मो. दि. जोशी, एम्. पी. ( रत्नागिरी ) ( राहिलेला हप्ता ) | ७५ |
| श्री. प्रिन्सिपॉल, पीपल्स कॉलेज, नांदेड | १०० |
| श्री. द. का. कुंटे, (स्पीकर, मुंबई विधानसभा) कौन्सिल हॉल, पुणें १ | १०० |
| प्रा. अ. भि. शहा, पुणें | ५० |
| डॉ. वाय्. बी. दामले, पुणें पहिला हप्ता | ५० |
| श्री. पंढरीनाथ रामचंद्र कानवडे पाटील एम्. पी. ( अहमदनगर ) पहिला हप्ता | २५ |
| | ५०० |
| मागील महिनाअखेर जमा झालेली रक्कम | ३८९३ |
| एकूण | ४३९३ |

' नवभारत ' निधि जमविण्याकरितां पुढील समिति नेमली आहे : त. ती. लक्ष्मणशास्त्री जोशी (अध्यक्ष), न्या. मू. भवानीशंकर नियोगी, श्री. देवकीनंदन नारायण, आचार्य स. ज. भागवत, श्री. बाबुराव जगताप, स्वामी रामानंदतीर्थ, प्रा. गोवर्धन पारीख, प्रा. म. अ. चान्सरकर, श्री. वि. म. बेडेकर (खजिनदार ), श्री. कृ. ना. फडके ( कार्यवाह ), श्री. मा. प. मंगुडकर ( कार्यवाह ).

' नवभारत ' निधि-समितीचें कार्यालय c/o ' नवभारत ' मासिक, ९०६ शिवाजीनगर, पुणें ४ येथें आहे. देणग्या "खजिनदार, ' नवभारत ' निधि-समिति, ९०६ शिवाजीनगर, पुणें ४" या पत्त्यावर पाठवाव्या अशी विनंति आहे.

लक्ष्मणशास्त्री जोशी (अध्यक्ष)
२५।९।१९५५ पुणें ४
कृ. ना. फडके } कार्यवाह
मा. प. मंगुडकर }






Regd. No B. 5177






